# माझी कहाणी

अनुवादक

शरच्चंद्र दामोदर गोखले
बी. ए., डिप्. एस्. एस्. ए.

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २

# माझी कहाणी

[ डॉ. हेलेन केलर यांच्या Story of My Life या पुस्तकाचा अनुवाद ]

अनुवादक

शरच्चंद्र दामोदर गोखले

बी. ए., डिप्. एस्. एस्. ए.

किंमत दोन रुपये

चित्रशाळा प्रकाशन पुणें २.

# पहिलें पान

डॉ. हेलेन केलर यांचें चरित्र भारी स्फूर्तिदायक आहे. त्यांच्या आत्मचरित्राचें मराठी रूपान्तर करण्याची इच्छा आज फलद्रूप होत आहे ह्याचा मला आनंद होत आहे. ह्या मूळ ग्रंथाचे हक्क मिळवून ते विनामूल्य दिल्याबद्दल व त्याकामीं इतर सर्व मदत केल्याबद्दल 'यूसिस' संघटना व विशेषतः श्री. ऑस्टिन, यांचा मी फार आभारी आहें. त्याचप्रमाणें चित्रशाळा प्रकाशन संस्था व विशेषतः श्री. दा. पां. रानडे ह्यांना मी धन्यवाद देतों.

मूळ आत्मचरित्र इतक्या रसाळ व डौलदार शैलीनें लिहिलें आहे कीं, त्याचा अर्थानुवाद झाला तरी शैली यथातथ्य प्रतिबिंबित होणें कठीणच. 'माझी कहाणी' मधील सारी गोडी मूळ लेखिकेची आहे. दोष मात्र माझे आहेत.

हेलेन केलर यांचें जीवन म्हणजे एक सुरस अद्भुत कथा आहे असें वाटतें. त्यांचें तेजस्वी चरित्र आणि भारतांतील आंधळीं मुलें, ह्यांचें चित्र एकत्रित पाहतांच एक सुखस्वप्न माझ्या डोळ्यांपुढें तरळूं लागतें. आमच्या ह्या अभागी मुलांतून एखादी हेलेन केलर नाहीं कां निर्माण होणार ? केवळ तीच आपल्या तपश्चर्येनें ह्या कार्याला उठाव देऊन, आजवर अंधारांत चांचपडणाऱ्या त्या अभागी मुलांचें दुर्दैवी जीवन उजळून टाकूं शकेल.

२०–२–५५
३४८ शनवार पेठ,
पुणें २.

शरच्चंद्र गोखले

# डॉ. हेलेन केलर : व्यक्ति आणि कार्य

फेब्रुवारी १९५५ च्या तिसऱ्या आठवड्यांत डॉ. हेलेन केलर या विख्यात अमेरिकन लेखिका व समाजसेविका भारताला भेट देणार आहेत. डॉ. हेलेन केलर यांच्या भेटीचें महत्त्व केवळ त्यांच्या वैयक्तिक गुणामुळेंच नव्हे तर त्यांच्या युगप्रवर्तक कार्यामुळें वाढलेलें आहे. डॉ. हेलेन केलर ह्या स्वतः आंधळ्या, मुक्या आणि बहिऱ्या होत्या. होत्या असें मी मुद्दाम म्हणतों कारण स्वतःच्या दृढ निश्चयानें व भगीरथ प्रयत्नांनीं त्यांनीं ह्या पंगुपणावर विजय मिळविलेला आहे आणि जगांतील साऱ्या आंधळ्या, मुक्या, बहिऱ्या मागसांपुढें व समाजसेवेच्या ह्या क्षेत्रांतील कार्यकर्त्यांपुढें एक थोर आदर्श घालून दिलेला आहे. सध्यां त्यांचें वय ७५ वर्षांचें असूनसुद्धां त्यांचा उत्साह व त्यांची या कार्याविषयीं निष्ठा तिळमात्र कमी झालेली नाहीं. उलट वाढत्या वयाबरोबर त्यांचा उत्साह व तळमळ चंद्रकलेप्रमाणें वाढत जात आहे.

आपण डोळस आहों, आपल्याला बोलतां येतें, आपल्याला ऐकूं येतें. त्यामुळें ज्या दुर्दैवी मुलांना ह्या शक्ति नसतात, त्यांना काय यातना भोगाव्या लागतात ह्याची संपूर्ण कल्पना आपल्याला सहसा येत नाहीं. क्षणभर आपण डोळे मिटून आंधळे आहों अशी कल्पना केली तर आपल्याला दोन पावलेंसुद्धां पुढें टाकतां येणार नाहींत, मग कादंबऱ्या, सिनेमा, अभ्यास, पदव्या ह्या गोष्टींचें नांवच काढायला नको. समोर काय आहे, कोण आहे हें दिसत नसलें तर आपलें जिणें किती परावलंबी होईल, व वाचन, अभ्यास, मनोरंजन, यांविना आपलें जीवन किती शुष्क होईल ह्याचा आपण विचार करावा. एखादें गोंडस, गुबगुबीत मूल समोर पाहिलें,

किंवा डोंगरावरून कोसळणारा, मोत्याचा चुरा उधळणारा भव्य धबधबा पाहिला कीं डोळ्याचें पारणें फिटल्यासारखें वाटतें. पण एखाद्या अंधशाळेंतील मुलांचे कायम मिटलेले ते निर्जीव डोळे पाहिले कीं ह्या आंधळ्या मुलांचें जीवन म्हणजे कधीं न संपणारी, अंधारी भयाण रात्र आहे याची खात्री पटते. आंधळेपणामुळें त्यांच्या मनाच्या क्षितिजावर तेजस्वी शुक्रतारा कधींच उगवणार नाहीं कां? ज्या वृत्तपत्रांतून ग्रंथांतून, आपण ज्ञानाच्या ओंजळी घटघटां पितों, ते ग्रंथ त्यांना उपयोगी नसल्यानें, ज्ञानाचे दरवाजे कधींच उघडणार नाहींत कां हा विचार मनांत येऊन भारी विषाद वाटतो. भारतामध्यें आज अशी जवळ जवळ वीस लक्ष आंधळीं माणसें आहेत; पण त्यांच्या शिक्षणाकरितां संस्था मात्र सुमारें पस्तीस चाळीसच आहेत. कसा हा प्रश्न सुटणार? बहिऱ्या मुलांचा प्रश्न याहून थोडा वेगळा आणि मुक्या मुलांच्या प्रश्नांशीं संलग्न असा आहे. आपण गप्पा मारीत असतांना आपल्यापाशीं एखादें बहिरें मूल असलें तर त्याच्या चेहऱ्यावरील भाव मोठे बघण्यासारखे असतात. समोरच्या माणसांचे हावभाव त्यांना दिसतात; पण बोलणें ऐकूं येत नाहीं. सारीं माणसें हंसलीं कीं त्यांना समजतें कीं कांहींतरी विनोद झाला. नंतर सर्वांच्या मागून केविलवाण्या रीतीनें तीं मुलें हंसूं लागतात. संगीताचे सुंदर आलाप, पांखरांची किलबिल, साऱ्या साऱ्या नादसौंदर्याला तीं मुलें पारखीं झालेलीं असतात. डॉ. हेलेन केलर यांनीं आपल्या सुंदर आत्मचरित्रांत म्हटलें आहे "प्रत्येक बहिऱ्या मुलाच्या मनामध्यें एक स्तब्धतेचा तुरुंग असतो. त्यांत प्रेमाची लयकार नसते, संगीताचा आलापसुद्धां ती स्तब्ध शांतता भेदूं शकत नाहीं." खरोखर ज्यांना ऐकूं येत नाहीं त्यांच्या मनांत चिरशांततेचा एक प्रचंड तुरुंगच असेल.

मुक्या मुलांची करुणास्पद अवस्था काय सांगावी? भोंवतीं काय चाललें आहे हें दिसतें, समजतें पण बोलायला तर येत नाहीं. 'माझी कहाणी' या पुस्तकांत डॉ. हेलेन केलर म्हणतात, "मी इतर लोकांच्याहून वेगळी आहें हें मला केव्हां कळलें तें नक्की माझ्या लक्षांत नाहीं. पण मला हें माहीत होतें कीं माझी आई व तिच्या मैत्रिणी बोलतांना माझ्यासारख्या खुणा करीत नाहींत. त्या तोंडानें बोलतात. कधीं कधीं बोलणाऱ्या दोन

माणसांच्यामधें मी उभी राही व त्यांच्या ओठांना हात लावून पाही कीं हे लोक बोलतात तरी कसें ? त्यांचें पाहून मी माझे ओठ हलवले, आवाज काढण्याचा यत्न केला, आक्रस्ताळेपणाने हातपाय आपटले, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. मीं लाथा झाडल्या, संतापलें आणि थकवा येईपर्यंत किंचाळलें. पण मला बोलतां येईना. खूप धुकें आल्यावर तुम्ही कधीं बोटींत होतां का ? असें वाटतें कीं कसल्यातरी पांढऱ्या अंधारांत तुम्हांला गुरफटून टाकलें आहे. शिक्षणापूर्वी माझी अवस्था तशीच होती.''

डॉ. हेलेन केलर ह्यांचे वडील संपादक होते. त्यांची आईहि सुसंस्कृत व विद्येची मोठी चाहती होती. अशा कुटुंबांत त्यांचा जन्म दि. २७ जून १८८० मध्यें झाला. कांहीं महिन्यांची असतांनाच हेलेन आजारी पडली आणि त्या आजारांतच तिची दृष्टि, वाचा व श्रवणशक्ति गेली. ह्या पंगुपणामुळें हेलेन भारी हट्टी, एककल्ली व खोडकर झालेली होती. सारखी संतापे, आदळ-आपट करी; कारण विचाराउच्चाराची देवाण–घेवाण करणें तिला शक्यच नव्हतें. शांततेच्या तुरुंगांत, जीवनाची अखंड रात्र, पायांत पंगुपणाच्या बेड्या घालून, पार करण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला होता; पण त्यांच्या प्रेमळ आई–वडिलांनीं त्यांना शिक्षण देण्याचा निश्चय करून, शोधाशोध सुरू केली आणि सुदैवानें ॲनी सुलिव्हॅन ह्या शिक्षिका हेलेनला मिळाल्या. डॉ. हेलेन केलर यांच्या महान् यशाचें सर्वांत मोठें श्रेय जर कोणाचें असेल तर ते ॲनी सुलिव्हॅन यांचें आहे, कारण हेलेनच्या पायांतील पंगुपणाच्या बेड्या तोडायच्याच असा निश्चय करून, श्रद्धापूर्वक शिक्षण द्यायला त्यांनीं सुरुवात केली. पहिल्या प्रथम 'मॅन्युअल आल्फाबेट' च्या पद्धतीनें हेलेन अक्षरें शिकूं लागली. हेलेनच्या हातावर, बाईनीं बोटांनीं खुणा करायच्या व त्या खुणावर अक्षरें बसवायचीं अशी ही पद्धत आहे.

लौकरच ह्या पद्धतीनें हेलेन आणि सुलिव्हॅन बाई खुणांनीं बोलूं लागल्या. नंतर हेलेन 'ब्रेल' वाचायला शिकली. कागदावर सुई टोचली, तर उलट बाजूला उठावाचें टिंब उमटतें. याप्रमाणें टिंबांचीं अक्षरें जुळवून जी लिपि होते, तिला 'ब्रेल' लिपि असें म्हणतात. ह्या लिपीचा अभ्यास केल्यामुळें हेलेनला वाचायला येऊं लागलें. आणि हेलेनचा अभ्यास हसत खेळत चालू झाला. हेलेनला शिकवितांना प्रत्यक्ष वस्तु दाखवून मग शिकवावें लागे.

कारण प्रत्यक्ष स्पर्शाने पाहिल्याखेरीज तिच्या मनांत वस्तूचा ठसा उमटत नसे. ती ‘ पाणी ’ हा शब्द कसा शिकली तें पाहा. त्यांनीं आत्मचरित्रांत म्हटलें आहे. ‘ आमच्या वाडींतल्या विहिरीजवळच्या खोपीवर मधुवेल पसरलेली होती. तिच्या नादानें मी व बाई विहिरीकडे गेलों. कोणीतरी विहिरीवर पाणी काढीत होतें, ते मोटवणांत खळखळून वाहात जाई. पाण्याच्या त्या वेगवान् झोताखालीं बाईनीं माझा हात धरला. माझ्या एका हातावरून पाण्याची शीतल धार वाहात होती आणि त्याच वेळीं दुसऱ्या हातावर बाईनीं खुणांनीं अक्षरें केली— ‘ पा–णी ’. प्रथम सावकाश आणि मग जलद असा तोच शब्द केला. बाईचीं बोटें कोणत्या खुणा, कोणतीं अक्षरें करीत आहेत ह्यावर एकचित्त होऊन मी उभी होतें. विसरलेलें आठवल्याची एक अंधुक जाणीव माझ्या मनांत निर्माण झाली. हरवलेलें सांपडल्याचा विलक्षण रोमहर्षक अनुभव मला आला आणि भाषेचें कोडें मला एकदम उलगडलें. ज्याची शीतल, ओघवती धारा माझ्या हातावरून वाहात होती, तें म्हणजेच ‘ पाणी ’ हें माझ्या लक्षांत आलें. निर्जीव शब्दाचा जिवंत प्रत्यय आला. शब्दाच्या जिवंतपणामुळें माझा आत्मा जागृत झाला. स्वतंत्र झाला. माझ्या मनाला बंधनें होतींच; नाहीं असें नाहीं. आंधळेपणा, बहिरेपणा, मुकेपणा साऱ्या बेड्या होत्या तशाच होत्या; पण त्या केव्हांतरी निखळतील, बंधनें पार होतील असा नवा विश्वास वाटूं लागला. ’’

परंतु केवळ वाचायला लिहायला येण्यानें हेलेनचें समाधान होणें शक्य नव्हतें. तिला बोलायचें होतें. मुक्या मुलीला बोलतां येणार नाहीं अशा कल्पनेनें, हेलेनच्या नातलगांनीं, स्नेह्यांनीं तिला या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण हेलेननें धीर सोडला नाहीं. ती १० वर्षांची असतांना ‘ होरॅस मान ’ शाळेच्या प्रमुख कु. सारा फुल्लर यांच्याकडे बोलायचें शिक्षण घेऊं लागली. कु. फुल्लर यांच्या घशावर व चेहऱ्यावर हात ठेवून त्या उच्चार कसे करतात हें हेलेननें समजावून घेतलें व रात्रंदिवस उच्चारशक्तीची तपश्चर्या सुरू केली. प्रयत्नानें पाषाणहि विरघळतो आणि खरोखरच हळूहळू हेलेनला अडखळत अडखळत, मोडकेंतोडकें कां होईना पण उच्चार करायला येऊं लागले. तुटक तुटक कां होईना; पण ‘ खरंच हें गरम आहे ’ हें पाहिलें वाक्य त्या बोलल्या. त्यासंबंधीं त्या म्हणतात, “ हें

वाक्य म्हणतांना मला झालेला आनंद, वाटलेलें आश्चर्य अविस्मरणीय आहे. हें तर खरेंच कीं सारीं अक्षरें मी मोडकींतोडकीं, बोबडीं म्हणत होतें. पण कसें झालें तरी तो शब्दोच्चार होता. त्यामुळें माझ्या मनाला उच्चाराच्या नव्या शक्तीची जाणीव झाली. त्या तुटक्या अक्षरांतून कां होईना, पण सर्व शिक्षण, सर्व शास्त्रें, सर्व संस्कृति यांच्यापर्यंत पोहोंचण्याचा मार्ग मोकळा झाला. उच्चारशक्ति हें एक वर्णनातीत वरदान आहे. त्यामुळें माझ्या शब्दांना पंख फुटले.'' आजसुद्धां डॉ. हेलेन यांचें बोलणें थोडेसें दोषयुक्तच आहे; परंतु एक मुकी मुलगी जाहीर व्याख्यान देण्याइतपत बोलूं शकली यापरतें आश्चर्य तें कोणतें ?

परंतु हेलेनची इच्छा इतर मुलींच्या बरोबरीनें शिकण्याची होती आणि त्या कल्पनेनें त्यांनीं पदवी संपादण्यासाठीं कॉलेजांत नांव दाखल केलें. कॉलेजांत शिकणें या मुक्या, बहिऱ्या व आंधळ्या मुलीला किती अवघड गेलें असेल याची कल्पनाहि करवत नाहीं. अंकगणित, भूमिति, यांसारख्या विषयांत तर भारी अडचण व्हावयाची. फळ्यावर काढलेल्या आकृति दिसत नाहींत, प्राध्यापकांचें व्याख्यान, शेजारीं बसणाऱ्या सुलिव्हन बाईनीं खुणानीं सांगायचें, सर्व पाठ्यपुस्तकें ब्रेल लिपींत छापलेलीं नाहींत. यासारख्या एक ना दोन हजारों अडचणी ओलांडून त्यांनीं आपली ज्ञानसाधना चालू ठेवली आणि अखेर बी. ए. ( ऑ. ) ची पदवी यशस्वी रीत्या मिळविली. अगदीं सुरुवातीपासूनच हेलेनच्या चित्ताला ज्ञानाची ओढ लागलेली होती. त्यांनीं लिहिलें आहे, " 'प्रकाश, प्रकाश दिसू दे.' ही माझ्या शब्दहीन हृदयाची हांक होती. आणि त्या माझ्या चित्ताच्या तळमळीच्या हांकेमध्येंच माझ्या जीवनाचा प्रकाश होता.''

विसाव्या शतकाच्या सुरुवातीला स्त्रीत्व हीच एक प्रकारची गुलामगिरी होती. त्या काळांत इतकी प्रगति केल्यानंतर साहजिकपणें दुसरी एखादी स्त्री स्वस्थपणें काळ कंठित राहिली असती. परंतु व्यक्तिविकास, स्वतःची प्रगति हें हेलेन केलर यांचें ध्येय नव्हतें. तें त्यांचें साधन होतें. कारण ह्या साधनाच्या योगें आपल्यासारख्या इतर हजारों पंगु मुलांच्या जीवनांत प्रकाश आणण्याचें त्यांनीं कंकण बांधलें होतें. त्यामुळें पदवी घेतल्यानंतर त्यांनीं ह्याच कार्याला आपलें जीवन वाहण्याचें ठरविलें, तेव्हांपासून तो आजपर्यंत

लेख, भाषणें, प्रचार याद्वारां त्यांनीं अंधांच्या प्रश्नाच्या बाबतींत लोकमत जागृत करण्याचा आटोकाट प्रयत्न चालविलेला आहे. हें कार्य चालू असतांनाच त्यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं. त्यांची लिहिण्याची शैली सहज व डौलदार असल्यामुळें त्यांचीं पुस्तकें अत्यंत लोकप्रिय झालीं. पुढें त्यांना 'डॉक्टरेट'ची सन्माननीय पदवीहि देण्यांत आली.

पंगु मुलांत कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांचा दृष्टिकोन पुष्कळदां दया-बुद्धीवर अवलंबून असतो. परंतु हेलेन केलर यांना असें वाटतें कीं आंधळया मुलांना परावलंबी न ठेवतां समाजाचे उपयुक्त घटक बनवायला हवें. त्या दुर्दैवी मुलांना ज्ञानाचे दरवाजे उघडून द्यायला हवेत. हाताच्या बोटामध्यें केवढें कौशल्य सांठविलेलें आहे याची कल्पना द्यायला हवी. निसर्गाचें सौंदर्य, जीवनाची भव्यता आणि जगण्याची गोडी पटवून द्यायला हवी. त्यांचें सारें जीवन समृद्ध करायला हवें. हेलेन केलर यांनीं स्वतःचें जीवन सर्व दृष्टीनें परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. स्पर्शज्ञानानें त्यांना कंपन समजतें आणि त्यामुळेंच पियानोवर अगर व्हायोलिनवर बोटें ठेवून त्या संगीतामधले बारकावेसुद्धां ओळखूं शकतात. एरवीं भावहीन वाटणाऱ्या हाताच्या ओंजळींतून संगीताचे सोनेरी आलाप त्यांनीं मन मानेल तसे लुटले ह्यापरतें आश्चर्य कोणतें? केवळ स्पर्शज्ञानानें त्यांना शिल्पकृतींतलें सौंदर्य प्रतीत होतें हेंच विशेष होय.

स्वतःचा इतका पंगुपणा असूनहि त्यांनीं स्वतःच्या मनावर खेदाची सांवली कधींच येऊं दिली नाहीं. शारीरिक व्यंगामुळें जन्मभर दुःखी होऊन इतरांनाहि दुःखी करणारीं अनेक माणसें आपल्याला आढळतात. परंतु आपल्या दुःखाला आवर घालून, त्यावर शक्यतों विजय मिळवून इतरांच्या दुःखाच्या परिमार्जनाकरितां हातभार लावण्याचें व्रत घेणारीं माणसें फार क्वचित् आढळतात. डॉ. हेलेन केलर यांनीं अशा प्रकारचें व्रत घेऊन, आपलें जीवनाचें तत्त्वज्ञान, त्याला साजेसें शोधलेलें आहे. निराशेच्या चिखलांतून आशेचीं कमळें फुलविण्याची त्यांची धारणा त्यांनीं आपल्या लेखनांत वारंवार व्यक्त केली आहे. त्या म्हणतात, "हें तर खरेंच कीं कांहीं वेळां थंडगार धुक्याप्रमाणें हा एकलेपणा मला अगदीं वेढून टाकतो. जीवनाच्या बंद असलेल्या महाद्वारापाशीं मी एकटीच वाट पाहात बसलेली असते. त्या

बंद दरवाजाच्या पलीकडे प्रकाश आहे, संगीत आहे, स्नेहभाव आहे. पण कदाचित् मला पलीकडे जाण्याची संधीच मिळणार नाहीं. कारण निर्दय आणि निःशब्द दैवानेंच तो रस्ता अडविला आहे. ह्या माझ्यावरच्या धडधडीत अन्यायाबद्दल जाब विचारावा, असें पुष्कळदां वाटतें. माझें मन अजून भावनाशील आणि बेशिस्त आहे त्यामुळें केव्हां केव्हां संतापाच्या भरांत शापवाणी उच्चारावी असेंहि वाटतें; पण ते कडु आणि निरर्थक शब्द ओठापर्यंत येऊन परततात. जिभेनें उच्चारवतच नाहींत आणि न ढाळलेल्या आसवाप्रमाणें ते शब्द तसेच हृदयांत परततात. माझ्या मनावर एका कटु शांततेचें राज्य सुरू होतें. पण इतक्यांत आशा हंसत, नाचत येते आणि हळूच गुणगुणते कीं स्वतःच्या अडचणींना व स्वतःला विसरण्यांतच खरा आनंद आहे. म्हणूनच मी इतरांच्या डोळ्यांतील ज्योतींनाच माझा प्रकाश, इतरांच्या कानावर पडणाऱ्या लयकारीलाच माझें संगीत व इतरांच्या ओठावरील स्मितामध्येंच माझा आनंद मानायचें ठरवलें आहे.'' स्वतःच्या पंगुपणाला विसरून इतरांच्या आनंदांत आनंद मानायची केवढी ही उदारता ! या उदात्त अशा जीवनाच्या तत्त्वज्ञानामुळेंच डॉ. हेलेन केलर यांना हें युगप्रवर्तक कार्य करतां आलें आहे.

डॉ. केलर ह्या उंच, बांध्यानें कणखर व प्रसन्न वृत्तीच्या आहेत. बोलतांना त्यांच्या हाताच्या हालचाली खूप होतात. याचे मुख्य कारण म्हणजे त्यांच्या डोळ्यांची जागा हातानें भरून काढलेली आहे. त्यांची स्मृति अत्यंत चलाख आहे व हस्तांदोलन करण्याच्या पद्धतीवरून त्यांना माणसें ओळखतां येतात.

त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा सर्वांत प्रसन्न भाग म्हणजे त्यांची विनोदबुद्धि. त्यांच्या सहज बोलण्यांतहि वेचक वाक्प्रचार, चपखल म्हणी आणि विनोदाचा शिडकाव केलेला असतो. त्यामुळें कोणताहि विषय असो, बोलण्यांत गुलाबपाण्याचा फवारा उडावा त्याप्रमाणें विनोदवचनांचे तुषार येतात. शेक्सपिअरबद्दल संशोधन करणारे डॉ. फर्नेस एकदां डॉ. हेलेन यांना म्हणाले कीं, ''कॉलेजांतील प्राध्यापक तुम्हांला शेक्सपिअरविषयीं अनेक दंतकथा व सिद्ध झालेल्या गोष्टी सांगतील. त्यावर तुम्ही फारसा विश्वास ठेवूं नका. कारण शेक्सपिअरच्या चरित्राविषयीं आम्हांला अधिकृत माहिती इतकीच आहे कीं

'तो जन्मला, त्याचें बारसें झालें, त्यानें लग्न केलें आणि तो वारला.' ह्यावर हेलेन केलर झटकन म्हणाल्या कीं, 'जगांत करण्यासारख्या साऱ्या जरुरीच्या गोष्टी त्यानें केलेल्या आहेत. आणखी काय हवें?' एखादी गोष्ट माहीत नसली व कोणी त्याची परीक्षा पाहात आहे असें वाटलें तर त्या मिस्किलपणें अंदाजी उत्तर देतात. तुम्ही समजा त्यांना विचारलें कीं तुमच्या कोटाचा रंग काय आहे? (अर्थात् कोणत्याहि अंध माणसाला तें सांगता येणें शक्य नाहीं.) तरीहि त्या तुमच्या कोटावरून हात फिरवून सांगतील कोट काळा आहे. जर तो दुसऱ्या कोणत्या रंगाचा असेल तर विजयी मुद्रेनें तुम्ही म्हणाल, 'छे छे मुळींच नाहीं, तो निळा आहे.' त्यावर त्या शांतपणें म्हणतील, 'तुम्हांला तुमच्या कोटाचा रंग माहीत आहे होय? मग मला उगीच विचारलेंत?'

डॉ. हेलेन केलर ज्या कुशलतेनें आपलें टंकलेखनयंत्र (टाइपरायटर) वापरतात, त्याची वाखाणणी करावी तेवढी थोडीच आहे. वयाच्या अकराव्या वर्षापासून त्या टाइप करीत आहेत. त्यांच्या लेखनांत अवाढव्य गति नसली तरी शुद्धता मात्र फार आहे. त्यांच्या टंकलिखित संहितेमध्यें चुका फार क्वचित् आढळतात. निरनिराळ्या ब्रेल लिपींत लिहिलेलीं अगर उठावाच्या रोमन लिपींत छापलेलीं पुस्तकें त्या वाचतात. हीं पुस्तकें खूप मोठ्या आकाराचीं असून त्यांचीं पानें मुद्दाम हलकीं ठेवलेलीं असतात. कारण नाहींतर वजनामुळेंच ठसे चुरगळून जायचे. एखादे वेळीं अंधारांत सुद्धां आपण गेलों तर त्या वाचत बसलेल्या दिसतात व पानांची सळसळ ऐकूं येते. डॉ. केलर आंधळ्या असल्याची खरी जाणीव त्याच वेळीं होते. ब्रेलच्या अनेक पद्धती प्रचलित आहेत. डॉ. हेलेन ह्यांना साऱ्या पद्धती येतात. परंतु सर्व लोकांनीं इंग्लिश ब्रेल जर वापरायला सुरुवात केली तर अंधांच्या शिक्षणाचें कार्य खूपच सुलभ होईल असें त्यांना वाटे. डॉ. हेलेन यांचें ब्रेल टंकलेखकयंत्र आहे. त्यावर त्या आपलीं टिपणें करतात व त्यावरच आपल्या अंध मित्रांना पत्रें लिहितात. ब्रेल लिपींत छापलेल्या पुस्तकांची संख्या अत्यंत थोडी आहे. कारण ब्रेलमध्यें पुस्तकें छापणें एक तर अत्यंत खर्चाचें असतें व त्या मानानें त्यांचा खपहि कमी असतो, परन्तु सुदैवानें डॉ. हेलेन यांना पुष्कळ स्नेह्यांच्यामुळें अवश्य तीं पुस्तकें नेहमींच मिळालेलीं आहेत.

डॉ. हेलेन केलर ह्या उठावाचीं घड्याळें वापरतात व स्पर्शज्ञानानें वेळेचें भानहि राखूं शकतात.

रॅडक्लिफ कॉलेजांत दुसऱ्या वर्षाला असतांनाच त्यांनीं आपलें पहिलें पुस्तक ' दी स्टोरी ऑफ माय लाइफ ' लिहिलें. त्यानंतर त्यांनीं आजवर सातआठ पुस्तकें लिहिलेलीं असून एक शैलीकार लेखिका म्हणून लौकिक संपादन केला आहे. एकदां लिहिलेलें पुन्हा वाचण्याची सोय त्यांना उपलब्ध नसल्यानें त्या आपलें लेखन भारी परिश्रम घेऊन व कांटेकोरपणें करतात. आजवर त्यांनीं पांच वेळां जगप्रवास केला असून १९४८ सालीं त्या भारतांतहि आल्या होत्या. काव्य व नाट्य यांच्या केवळ वाचनाचीच त्यांना आवड आहे असें नाहीं, तर नाटकांत काम करणेंहि त्यांना आवडतें. नुकतीच त्यांच्या जीवनावर जी चित्रकथिका ( डाक्युमेंटरी ) घेण्यांत आली त्यांत त्यांनीं कामहि केलें होतें.

आजवर त्यांचा अनेक वेळां सन्मान झालेला आहे. ' अमेरिकन फाउंडेशन फॉर दी ब्लाइंड ' ह्या संस्थेकरितां जास्तींत जास्त निधि उभारण्याच्या कामगिरीबद्दल १९३१ सालीं त्यांना ५००० डॉलर्सचें खास बक्षीस देण्यांत आलें. पण हें बक्षीसहि त्यांनीं संस्थेलाच देणगी म्हणून देऊन टाकलें. अमेरिकेच्या राष्ट्रीय शैक्षणिक संघटनेच्या वतीनें १९३८ सालीं त्यांना एक ' सोन्याची किल्ली ' भेट म्हणून देण्यांत आली. अंध मुलांना ज्ञानाचे दरवाजे उघडून देणाराला याहून काय हवें ? पंगु मुलांच्या कल्याणार्थ त्यांनीं केलेल्या कामाचा गौरव करण्यासाठीं १९४१ मध्यें 'इंटरनॅशनल फेडरेशन ऑफ वुइमेन्स क्लब्ज ' ह्या संस्थेतर्फे त्यांना मानपत्र देण्यांत आलें. फिलाडेल्फिया विश्वविद्यालयानें त्यांना "डॉक्टर ऑफ ह्यूमन लेटर्स" व ग्लासगोच्या विश्वविद्यालयानें "डॉक्टर ऑफ लॉज" ही पदवी त्यांना दिली. दोन वर्षांपूर्वीच त्यांना फ्रेंच लीजन ऑफ ऑनर आणि लेबॅनन गोल्ड मेडल ऑफ मेरिट अर्पण करण्यांत आलें. ह्या साऱ्या गौरवानंतरसुद्धां त्यांनीं आपली नम्रता सोडलेली नाहीं.

ज्यांना जगांत आसरा नाहीं, व जे पंगु आहेत, त्यांच्या सेवेंत दिवसाचा जास्तींत जास्त काळ त्या घालवतात. अमेरिकन फाउंडेशन फॉर दी ब्लाइंड या संस्थेच्यासाठीं त्यांनीं वर्षानुवर्षें परिश्रम केले आहेत. आणि त्यामुळेंच

हजारों अंधांना त्या म्हणजे साक्षात् आशेची मूर्तिच वाटतात. डॉ. हेलेन केलर ह्या अतिशय श्रद्धाळू आहेत. ज्या ज्या वेळीं दिवसाचे कामाचे तास संपवून त्या आपल्या मनाच्या अंधाऱ्या बंदिखान्यांत परततात, त्या त्या वेळीं मनावरची निराशेची काजळी घालवायला त्यांना ही श्रद्धाच उपयोगी पडते. निराशा आणि जीवनपराङ्मुखता यांपासून त्यांना श्रद्धेनेंच दूर ठेवलेलें आहे. त्या म्हणतात, " श्रद्धा म्हणजे अशी एखादी दुसरी गोष्ट नव्हे, कीं जी दाखवितां येईल. श्रद्धा ही ज्या विश्वासामधून आपण कार्य-प्रवृत्त होतों, ज्या ध्येयवादानें जीवन घडवूं इच्छितों त्या साऱ्यांचें एक अविभक्त स्वरूप आहे. माझी परमेश्वरावरची आणि जगांतील सत्प्रवृत्ती-वरची श्रद्धा अचल आहे आणि म्हणूनच समुद्रावरून चालत जाणाऱ्या भक्ताला ज्या ईश्वरानें हात दिला, तो माझा पाठीराखा झालेला आहे. माझ्या बांधवांवर विश्वास, त्यांच्यांतील सत्प्रवृत्तीविषयीं आशावाद, आणि ह्या दुःखाच्या आणि त्रासाच्या कंटाळवाण्या रात्रीनंतर सुंदर जग जागें होणार आहे. उषेच्या आरक्त रंगांत मानवी जीवन उमलणार आहे, विकसणार आहे ही श्रद्धा खरी आहे " डॉ. हेलेन केलर यांच्या व्यक्तिमत्त्वा-भोंवतीं, त्यांच्या चारित्र्याचें व धीरोदात्तपणाचें एक तेजोवलय निर्माण झालेलें आहे. त्यांच्या जीवनाचा हेतु व त्यांची कार्यनिष्ठा त्यांच्या प्रत्येक हालचालींत भरलेली आहे.

ह्याच मनःसामर्थ्याच्या आधारावर त्यांनीं गेलीं सत्तर पंचाहत्तर वर्षें क्रूर शांतता आणि भयाण अंधःकार यांत काढलीं. नुसतीं काढलीं इतकेंच नव्हे तर त्या साऱ्या आयुष्यांत विनोदाची फुलबाग, काव्याचे निर्झर आणि सहानुभूतीचे पाझर पाहिले. प्रत्येक वाढत्या वर्षाबरोबर त्यांना नवी शक्ति, नवें ज्ञान प्राप्त होत आहे, आणि त्या पुन्हा तें सारें दुर्दैवी अंधांच्या सेवेसाठीं खर्चीत आहेत. त्यांचा जीवनाविषयींचा आशावाद व ध्येयवाद त्यांच्या पुढील शब्दांत चांगला व्यक्त झाला आहे. " माझें सारें आयुष्य सुखी झालें आहे, कारण मला अनेक स्नेही लाभलेले आहेत. चांगलें काम करण्याची, आवडीचें काम करण्याची संधि मिळालेली आहे. माझ्या पंगुपणाचा मी फार क्वचित् विचार करतें आणि त्याची खंत अगर खेद फारसा मनाला लावून घेत नाहीं. क्वचित् एखाद वेळेला निराशा येते. पण ती किती म्हणतां, फुलबागेंत एखादीच झुळुक यावी त्याप्रमाणें."

हेलन केलर ह्यांच्या साऱ्या मित्रमैत्रिणींना त्यांच्या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाविषयीं, फुललेल्या विनोद–बुद्धीविषयीं भारी आदर वाटतो. सध्यां 'कनेटीकट'च्या रानांत बांधलेल्या एका सुंदर घरांत त्या राहतात. घरापुढच्या बागेंत आठ फूट उंचीचा एक दगडी जपानी दिवा ठेवलेला आहे. त्या दिव्याची ज्योत प्रतीकात्मक असून सदैव तेवत ठेवलेली असते. त्या जिवंत असेपर्यंत तो दिवा कधींच मालवला जाणार नाहीं.

त्या शाळेंत शिकत असतांना त्यांनीं लिहिलें आहे. "मला या शालेय जीवनांत किंबहुना साऱ्या जीवनांतच चार महत्त्वाच्या गोष्टी शिकायच्या आहेत. कोणतीहि घाई अगर गोंधळ न करतां विचार करण्याची संवय, इतरावर निस्सीम प्रेम करण्याचा स्वभाव, प्रत्येक काम उच्च ध्येयानें प्रेरित होऊन करणें आणि ईश्वरावरील अढळ भक्ति" ह्या चार कल्पनांतच त्यांच्या जीवनाचें सार सांठवलेलें आहे.

कांहीं दिवसांपूर्वीं मला लिहिलेल्या एका पत्रांत त्या लिहितात "तुमच्या पत्रांतील भावनामुळें मी भारावून गेलें आहे. तुमच्या देशांतील दारिद्र्य, पंगुपणा व गुन्हेगारी ह्यांनीं पीडलेल्या असंख्य मुलांच्या सेवेसाठीं परिश्रम करणाऱ्या तुम्हां साऱ्या कार्यकर्त्यांच्या स्नेहभावाची मी अपेक्षा करतें आहें. खरोखर ज्या देशांतील लोक इतके उदारहृदयी आहेत, त्या देशांत अंध मुलांसाठीं कार्य करणाऱ्या संस्थांची संख्या इतकी थोडी असावी ह्याचा भारी खेद वाटतो.......

"तुम्हांला ठाऊकच आहे कीं आंधळया, बहिऱ्या व मुक्या मुलांना त्यांच्या विशिष्ट अडचणीनुरूप शिक्षण देणाऱ्या संस्था लागतात व त्यांतूनच मुलांना आरोग्यशाली बनवून, उपयुक्त जीवन जगायला शिकवायला हवें. ह्या कामीं मुंबई राज्यांतील परिवीक्षाधिकारी ( प्रोबेशन ऑफिसर्स ) व संस्थाप्रमुख परिश्रम करीत आहेत ही खरोखरच समाधानाची गोष्ट आहे.

कोणत्या परिस्थितींत तेथील कार्यकर्ते काम करीत आहेत याची मला स्पष्ट कल्पना नाहीं परंतु माझी खात्री आहे कीं समाजसेवेच्या उदात्त ध्येयवादानें त्यांचीं मनें उजळून गेलेलीं आहेत. ह्या अभागी मुलांच्याकडे तुम्ही डोळसपणें पाहात आहां, त्यांच्या गरजांकडे, त्यांच्या हांकेकडे कान

देऊन राहिलां आहांत. ह्या मुलांच्या शिक्षणाची व संगोपनाची (मुलांच्या कायद्यान्वयें) जबाबदारी तुम्हां परिवीक्षाधिकाऱ्यांवर (प्रोबेशन ऑफिसर्स) आल्यामुळें, (सरकारनें) त्यांचें पालकत्व पत्करल्यानें केव्हांतरी त्यांची ह्या शारीरिक पंगुपणाच्या गुलामगिरींतून सुटका होईल व तीं मुलें स्वावलंबी व समाजाचे उपयुक्त घटक बनतील असा मला विश्वास वाटतो."

डॉ. हेलेन केलर यांची ही वाणी अमृतवाणी ठरो व भारतांतील ह्या अभागी मुलांचा प्रश्न सुटो हीच इच्छा.

शरच्चंद्र गोखले





डॉ. हेलेन केलर, प्रेसिडेंट आयझन हॉवर ह्यांच्या मुद्रेवरील भाव स्पर्शानें पाहात आहेत.

# माझी कहाणी

## – १ –

माझ्या आयुष्याची कहाणी सांगावयाला सुरुवात करतांना, मला माझ्या मनावर एक प्रकारचें भीतीचें दडपण आहे असें वाटत आहे. माझें सारें लहानपण स्मृतीच्या सोनेरी धुक्याच्या पडद्यामागें लपलेलें आहे आणि तो पडदा दूर करावयाला मला एक प्रकारचा संकोच वाटतो आहे.

आज आणि काल ह्यांना जोडणाऱ्या कित्येक वर्षांच्या ह्या स्मरणसाखळी-मागें डोकावून पाहिलें, तर पूर्वी प्रत्यक्ष घडलेल्या घटना आणि कित्येक कल्पना-रंजित अनुभव मला एकाच स्वरूपाचे दिसूं लागतात आणि त्यांतून आठवणी वेगवेगळ्या काढणें कठीण वाटतें. प्रत्येक आई आपल्या मुलाचे अनुभव आपा-पल्या कल्पनेनें रंगवीत असते. माझ्या लहानपणच्या पहिल्या एकदोन वर्षांच्या आठवणी अगदीं ठळकपणानें वेगळ्या दिसतात, तर उरलेल्या बाकीच्या आठवणी-वर माझ्या पंगुपणाच्या तुरुंगांची काळसर छाया पडल्यासारखी वाटते. शिवाय असेंहि वाटतें कीं लहानपणच्या आनंदाच्या आणि दुःखाच्या तीव्रतेची धार आतां वयोमानानें बोथटलेली आहे. नवीन कांहीं शिकल्याच्या विजया-नंदामध्यें माझ्या मोठ्या प्रयासानें मिळविलेल्या शिक्षणांतले कांहीं महत्त्वाचे दुवे मी विसरून गेलें आहें. म्हणून ही कहाणी कंटाळवाणी होऊं नये या उद्देशानें मला जे प्रसंग महत्त्वाचे आणि चित्ताकर्षक वाटतात, तेंच मी रेखाटणार आहें.

माझा जन्म २७ जून १८८० मध्यें उत्तर अल्बामाच्या टस्कंबिया ह्या छोट्याशा गांवांत झाला.

माझ्या वडिलांचें बाजूनें म्हटलें तर आमचें पणजोबा म्हणजे 'कास्पर केलर' हे मूळचे स्वित्झर्लंडमध्यें राहणारे आणि त्यांनीं स्वतः अमेरिकेंत जाऊन मेरीलँडमध्यें वसाहत केली. माझे एक स्विस् पूर्वज झूरिच्मध्यें बहिऱ्यांना शिकवीत असत आणि त्यांनीं त्या विषयावर एक पुस्तकहि लिहिलेलें आहे. म्हणतात ना कीं प्रत्येक राजाच्या पूर्वजामध्यें कोणीतरी गुलाम असतोच आणि प्रत्येक गुलामाच्या वंशवेलीमध्यें एखादा तरी राजा होऊन गेलेला असतो. परंतु माझ्या बाबतींतला हा समसमासंयोग विलक्षणच म्हणावयाचा.

अल्बामामध्यें खूप जमीन विकत घेऊन माझे आजोबा तिथेंच स्थायिक झाले. मी असें लहानपणीं ऐकलेलें आहे कीं शेतीसाठीं लागणारें सामानसुमान खरेदी करण्यासाठीं माझे आजोबा वर्षातून एकदां घोड्या-वरून टस्कंबियापासून फिलाडेल्फियापर्यंत जात असत. त्यांनीं या प्रवासा-विषयीं लिहिलेली आणि अतिशय सुरस वर्णनानें भरलेलीं अशीं अनेक पत्रें माझ्या मावशीजवळ आहेत.

माझी आजी ही व्हर्जिनियाचे गव्हर्नर अलेक्झांडर स्पॉट्सवुड यांची नात आणि अलेक्झांडर मूर यांची मुलगी. सुप्रसिद्ध रॉबर्ट ली यांची ती चुलत बहीण लागते.

माझे वडील आर्थर केलर हे कॉनफेडरेट लष्करामध्यें कॅप्टन होते. माझी आई केट ॲडॅम्स् ही त्यांची दुसरी बायको आणि ती त्यांच्याहून वयानेंहि पुष्कळच लहान होती. *

मला आठवते कीं माझी दृष्टि आणि श्रवणशक्ति ज्या आजारांत गेली त्यापूर्वी आम्ही एका छोट्याशा घरांत राहात होतों. ह्या घराला दोनच खोल्या होत्या—एक मोठा चौकोनी दिवाणखाना आणि एक लहान खोली. दिवाणखाना आम्ही वापरीत होतों व लहान खोलींत आमचा नोकर निजत असे. दक्षिण अमेरिकेंत अशी पद्धत आहे कीं वाडीवरच्या आपल्या वस्तीला जोडून असे एखादें छोटेंसें घर बांधायचें म्हणजे कधींमधीं त्या ठिकाणीं जाऊन राहतां येतें. युद्ध संपल्यानंतर माझ्या वडिलांनीं असें घर बांधलें होतेंच. लग्न होतांच माझी आई आणि वडील त्या घरांत राहावयास गेले. या घरांवर चोहों बाजूंनीं द्राक्षांचे वेल चढविले होते आणि त्यांतच वरवर चढणारे

गुलाब आणि मधुकोशाच्या वेलीहि होत्या. लांबून हें घर एखाद्या पुष्पवाटिकेसारखें दिसे. घरापुढें पिवळया गुलाबाच्या आणि स्मिलॅक्सच्या वेलीचा जणूं एक पडदाच उभारला असल्यामुळें घरापुढें असलेले पोर्च एकदम दिसत नसे. हा लताकुंज पांखरांचा मोठा आवडता होता आणि म्हणून ह्या घरांभोंवतीं एकसारखी पक्ष्यांची किलबिल आणि मधमाशांचा गुंजारव चालत असे.

गुलाबाच्या मांडवापासून अगदीं थोड्या अंतरावर आमची वाडी होती. तेथेंच आमच्या घरांतील सर्व मंडळी राहात. त्या वाडीचें नांव 'आयव्ही ग्रीन' असें ठेवलेलें होतें, कारण आमच्या घराभोंवतींचीं सर्व झाडें, कुंपणें आणि छपरें ह्यांवर सुंदर इंग्लिश 'आयव्ही'च्या वेली दाटीदाटीनें पसरलेल्या होत्या. ह्याच वाडींतील जुन्या पद्धतीची फुलबाग म्हणजे माझ्या लहानपणचें नंदनवन होतें.

मला आठवतें की माझी शिक्षिका येण्यापूर्वी सुद्धां, चांचपडत चांचपडत, हाताला टणक लागणाऱ्या कुंपणाच्या अनुरोधानें आणि बागेंत दरवळणाऱ्या सुवासाच्या मागानें प्रथम फुललेली 'व्हायोलेट'ची व 'लिली'ची फुलें मी शोधत असे. एखादे वेळीं मला खूप राग आला म्हणजे माझा तापट चेहरा लपविण्याकरितां आणि शांतपणें एकटी बसण्याकरितां मी तिथल्याच मृदु-शीतल पानांमागें आणि गवतामागें दडत असे. त्या फुलबागेंत स्वैर भटकण्यामध्यें, एका कुंजापासून दुसऱ्या कुंजापर्यंत हिंडण्यामध्यें किती आनंद होता काय सांगावें ! अशीच आंधळेपणानें चालतां चालतां मी एकदम एखाद्या सुंदर लताकुंजाजवळ येई आणि तेथील पानांच्या आणि फुलांच्या वासानें मी वेल ओळखूं पाहात असे. आणि लगेच मला आठवे कीं बागेच्या टोंकाला असणाऱ्या, छोट्या घराच्या उतरत्या छपरांवर सोडलेल्या सुगंधी वेली त्या ह्याच. ह्याच बागेमध्यें एकसारख्या वरवर जाणाऱ्या 'क्लेमॅटिस'च्या वेली; हळूच खालीं वांकून पाहणाऱ्या जाईजुई आणि क्वचितच आढळणारी पण अतिशय गोड दिसणारीं फुलें होतीं. त्या फुलांना फुलपांखरांची लिली म्हणतात, कारण त्यांच्या नाजूक पाकळ्या फुलपांखरांच्या पंखाप्रमाणेंच दिसतात. आणि आमच्या बागेंतील गुलाब; ते तर सर्वांत सुंदर होते. ह्या आमच्या दक्षिणेंतील घरांवर सोडलेल्या सुंदर

गुलाबवेलीइतकें मन भारून टाकणारें गुलाब मी उत्तरेकडे कोठेंच पाहिलेले नाहींत. आमच्या पोर्चसमोर झुबक्याझुबक्यानें गुलाब डुलत. त्यांच्या मोहक सुगंधानें सारें वातावरण दरवळून जाई आणि मग दुसरा कसलाहि वास येईनासा होई. पहाटे त्यांवर दंव पडलें म्हणजे त्या गुलाबाचा स्पर्श इतका मऊ, इतका कोमल, आणि धुंद असावयाचा कीं राहून राहून माझ्या मनांत येई कीं स्वर्गांतील ज्या नंदनवनाच्या गोष्टी ऐकतों, त्यांतील 'अरफोड्ल्' फुलें तीं हींच तर नव्हेत ?

माझ्या आयुष्याची सुरुवात अगदीं साधी, इतर चार सामान्य मुलांच्या-सारखीच होती. पण मी जन्माला आलें आणि साऱ्या घरांवर आधिराज्यच गाजविलें म्हणाना. कारण केलर कुटुंबांतील मी पहिलेंच अपत्य. नेहमीं-प्रमाणें माझें नांव काय ठेवावें ह्याविषयीं घरांत खूपच चर्चा झाली. माझे नांव ठेवण्याचे बाबतींत प्रत्येकाला कांहींतरी सुचवावयाचें होतें. कारण पहिल्यावहिल्या मुलाचें नांव ठेवायचें हा मोठा महत्त्वाचाच प्रश्न नव्हे का ? माझ्या वडिलांनीं मिल्ड्रेड कॅंबेल असें नांव सुचविलें, कारण आमच्या वडिलांच्या दूरच्या मावशीचें नांव तें होतें आणि बाबांना तिच्या-विषयीं अतिशयच आदर होता. एकदां हें नांव सुचविल्यानंतर त्या चर्चेंत वडिलांनीं पुढें भागच घेतला नाहीं. माझ्या आईनें मात्र हा प्रश्न चटकन् सोडविला, कारण तिच्या मतें माझें नांव काय ठेवावें हा सर्वस्वीं तिच्या इच्छेचा प्रश्न होता. तिच्या आईचें नांव हेलेन एव्हरेट असें होतें व माझेहि नांव तेंच ठेवावें असा आईचा आग्रह होता. माझें नांव काय ठेवावें ह्या चर्चेंत बाबांनीं शेवटपर्यंत भाग घेतला नसल्यानें मला घाईघाईत चर्चमध्यें नेण्याच्या गडबडींत ते माझें नांवच विसरले. चर्चमध्यें जेव्हां त्यांना विचारलें कीं मुलीचें नांव काय ठेवावयाचें ? तेव्हां त्यांच्या साधारण लक्षांत इतकेंच होतें कीं मला माझ्या आजीचें नांव द्यावयाचें. शेवटीं त्या गडबड गोंधळांत त्यांनीं माझें नांव हेलेन ॲडम्स असेंच ठेवलें.

मला असें सांगतात कीं लहानपणीं मी पाळण्यांत असतांनाच माझ्या जिज्ञासू आणि माझेंच खरें करण्याच्या हट्टी स्वभावाच्या थोड्या थोड्या खुणा दाखवूं लागले होते. इतर लोक जें जें करतात, तें तें मी करणारच असा माझा हट्ट असे. सहा महिन्यांची असतांना मी ' होकारा ' सारखे

आवाज काढीत असे व एके दिवशीं अगदीं स्पष्टपणानें टी...टी...टी... असें म्हणून मीं सर्वांचें लक्ष वेधून घेतलें होतें. माझ्या आजारीपणानंतरसुद्धां त्या अगदीं पूर्ववयांत शिकलेला एक शब्द मला आठवत असे. तो शब्द म्हणजे 'पाणी' (वॉटर) आणि माझी वाचा गेल्यानंतर सुद्धां जेव्हां मी शब्द उच्चारण्याकरितां धडपडत असे त्या वेळींहि 'वॉ–वॉ' – असा आवाज एकसारखा काढीत असे. ज्या वेळेला मी हातानें लिहूं लागलें त्याच वेळीं मी हा आवाज करण्याचें थांबलें.

असें सांगतात कीं एक वर्षाची असतांना मी चालूं लागलें. एकदां न्हाणें झाल्यावर आंघोळीच्या टबांतून काढून आईनें मला मांडीवर घेतलें होतें. समोरच्या फरशीवर सूर्यप्रकाश आणि पानांच्या सावल्या ह्यांचा गमती जमतीचा नाच चालला होता. त्याकडे माझें लक्ष जातांच मी आईच्या मांडीवरून सुटलें आणि त्या सावल्याकडे धांवलें, परंतु धांवतां येत नसल्यानें खालीं पडलें आणि आईनें उचलून घ्यावें म्हणून रडरड रडलें.

पण दुर्दैवानें हे सुखाचे दिवस फार काळ टिकले नाहींत. पोपट, कोकिळ आणि इतर पांखरांच्या मधुर संगीतानें भरलेला त्या वर्षाचा वसंत ऋतु, फळांनीं समृद्ध आणि गुलाबांनीं धुंद झालेला एक उन्हाळा, एक सोनेरी जांभळा आणि भरजरी शिशिर ऋतु एवढेंच ऋतुवैभव मी माझ्या डोळ्यांनीं पाहिलें. शिशिरानें वृक्षवेलींची संपत्ति–वाळलेलीं सुवर्णरंगी पानें–एका उत्सुक आणि आनंदी मुलीच्या पायावर ओतलीं आणि सारें कांहीं संपलें. उजाड वाटणाऱ्या फेब्रुवारी महिन्यांत मी आजारी पडलें. त्या आजारांत माझे डोळे गेले, मी बाहिरी झालें, मी मुकी झालें. एखाद्या नवजात अर्भकाप्रमाणें संज्ञाहीन होऊन, बेशुद्धीच्या अवस्थेंत मी तापानें फणफणत पडलें होतें. मेंदू आणि पोट ह्यांमध्यें आकसण्याची तीव्र क्रिया झाल्यामुळें हें झालें असें म्हणतात. मी जगणार नाहीं असेंच डॉक्टरांना वाटत होतें. परंतु जितक्या झटकन् आणि अद्भुत रीतीनें मला हा ताप आला होता, तितक्याच झटकन् तो निघून गेला. सकाळीं साऱ्या घरांत आनंदीआनंद पसरला. परंतु कोणालाच—डॉक्टरांना सुद्धां–ही कल्पना आली नाहीं कीं मी कायमची आंधळी, बाहिरी आणि मुकी झालेली आहे !

ह्या आजारपणाच्या आठवणी अजूनहि माझ्या मनांत गोंधळ करतात. विशेषेंकरून मला आठवतें आहे कीं रात्रीं बेरात्रीं वेदनांनीं आणि तापांनीं

विव्हळ होऊन मी जागी होई, त्या वेळीं किती मायाळूपणानें, किती ममतेनें माझी आई मला थोपटीत बसे. त्या आजाराच्या भयाण झोपेंतून प्रथम जाग येतांच, माझे कढत कढत आणि कोरडे कोरडे डोळे मी समोरच्या भिंतीकडे वळविले. म्हणजे दुर्दैव असे कीं ज्या प्रकाशावर माझें अत्यंत प्रेम होतें, तोच प्रकाश टाळण्याकरितां माझ्या आयुष्यांत पहिल्या प्रथम मी भिंतीकडे तोंड केलें. माझ्या आजारीपणांत तो प्रकाश दिवसेंदिवस अधिकाधिक अंधुक होत जात होता. परंतु मी पहिल्या वेळीं प्रकाशापासून तोंड फिरविलें त्या वेळीं झालेल्या यातना आणि मनाचा गोंधळ काय सांगावा ? एखाद्या दिवास्वप्ना-प्रमाणें ह्या साऱ्या आठवणी माझ्या मनांत तरंगत येतात. त्या खरोखरच्या आठवणी असतील कदाचित्. पण मला त्या साऱ्या साऱ्या अगदीं खोट्या वाटतात. हळूहळू मला घट्ट गुरफटणाऱ्या त्या भयाण शांततेची आणि मिट्ट काळोखाची इतकी संवय झाली कीं त्या अंधारापेक्षां वेगळें कांहीं जगांत असूं शकतें हें देखील मी विसरूं लागलें. परंतु माझी शिक्षिका येईपर्यंतच हें सारें चाललें. ती येताच तिनें माझा अंधारांत कोंडलेला आत्मा स्वतंत्र केला. मला आठवतें कीं माझ्या जीवनाच्या पहिल्या १९ महिन्यांत, लांबवर पसरलेलीं हिरवीगार शेतें, निळेंभोर चकाकणारें आकाश, झाडें आणि फुलें मी डोळे भरून पाहिलीं होतीं. त्यामुळें नंतर आलेल्या आंधळेपणाच्या अंधारालासुद्धां त्यांची आठवण बुजाविणें शक्य झालें नाहीं. म्हणतात ना, आपल्या दृष्टीनें एकदां सृष्टि पाहिली कीं ती आपली झाली.



---

* टीपः—आमच्या आईचे आजोबा बेंजामिन ॲडम्स् हे मेसॅच्युसेट्स भागांत न्यू बरी येथें कित्येक दिवस राहात होते. त्यांचा मुलगा चार्ल्स हा तिथेंच जन्मला आणि पुढें तो अर्कान्सस परगण्यांत हेलेना येथें राहावयास गेला. अमेरिकेच्या यादवी युद्धांत तो दक्षिणेंतील संस्थानांच्या वतीनें लढला आणि पुढें सैन्यांत ब्रिगेडियर जनरल झाला. त्यानें एव्हरेट कुळांतील ल्युसी हेलेन हिच्याशीं लग्न केलें. ह्याच घराण्यांत एडवर्ड आणि डॉक्टर एडवर्ड एव्हरेट हेलन ह्यांच्यासारखीं प्रसिद्ध माणसें होऊन गेलीं. युद्ध संपल्यानंतर टेनेसी प्रदेशांतील मेम्फीस या गांवीं हें कुटुंब राहावयास गेलें.

# – २ –

त्या भयंकर आजारीपणानंतर पहिले कांहीं महिने काय घडलें हें मला नीटसें आठवतच नाहीं. मला इतकेंच आठवतें कीं, मी नेहमीं माझ्या आईच्या मांडीवर तरी बसलेली असे, नाहींतर तिच्या पदराला लोंबकळून तिच्या पाठोपाठ घरभर हिंडत असे. माझ्यापुढें येणारी प्रत्येक वस्तु आणि आसपास घडणारी प्रत्येक हालचाल मी हातानें चाचपून पाहात असे. त्यामुळें हळू हळू माझी समज वाढूं लागली. लवकरच माझ्या लक्षांत आलें कीं, एकमेकांच्या भावना आणि विचार एकमेकांला कळण्याकरितां कोणतेंतरी माध्यम आवश्यक असतें; पण मला तर वाचाशक्तीच नव्हती. म्हणून भाषेच्या अभावीं मी थोड्या थोड्या खुणा करूं लागलें. डोकें आडवें हलविलें म्हणजे ‘ नाहीं ’ किंचित् उभें हलविलें म्हणजे ‘ होय ’ , एखाद्याला ओढणें म्हणजे ‘ इकडे ये ’ आणि ढकलणें म्हणजे ‘ जा ’ अशा स्वरूपाच्या ह्या खुणा असत. जर मला पाव हवा असेल तर, मी पाव कापल्यासारखे आणि त्याला लोणी लावल्यासारखे हावभाव करीत असे. जेवणाचे वेळीं आईनें आइस्क्रीम करावें असें मला वाटलें तर मी आइस्क्रीमचें भांडें फिरविल्यासारखा आणि थंडीनें काकडल्यासारखा अभिनय करीत असे. म्हणजे आईच्या बरोबर लक्षांत येई. ह्याशिवाय माझ्या आईनें मला पुष्कळ गोष्टी शिकविल्या होत्या. आईला कांहीं हवें असलें कीं मला तें लगेच कळे आणि माडीवर अगर ती सांगेल तिकडे जाऊन मी ती वस्तु आईला आणून देत असे. आंधळेपणाचा आणि बहिरेपणाचा हा काळ एखाद्या कंटाळवाण्या लांबलचक अंधाऱ्या रात्रीसारखा मला वाटे. माझ्या आईच्या अत्यंत प्रेमळ शिकवणुकीमुळेंच, मी ती भयाण रात्र पार करूं शकलें आहे.

माझ्याभोंवतीं काय चाललें आहे ह्याची बरीचशी जाणीव मला असे. वयाच्या पांचव्या वर्षी, परटाकडून आलेले आपले स्वच्छ कपडे वेगळे ठेवणें, त्यांच्या घड्या घालणें हें मला येऊं लागलें. याच वेळीं माझे कपडे इतरांच्या पासून वेगळे काढायला मी शिकलें. माझी आई आणि मावशी बाहेर जावयास निघाल्या आहेत हें मला त्यांनीं घातलेल्या नव्या कपड्यांवरून कळे आणि प्रत्येक वेळीं मी त्यांच्याबरोबर जाण्याचा हट्ट करीत असे. ज्या ज्या वेळीं आमच्या घरीं कोणी पाहुणे येत, त्या त्या वेळीं मला मुद्दाम बोलावून ओळख करून दिली जाई. पाहुणे निघतांना बहुधा मी हात हालवून त्यांना निरोप देण्याचें काम करीत असे. मला वाटतें ह्या हात हलविण्याचा अर्थ त्या वेळीं मला थोडासा कळत होता. एके दिवशीं घराच्या पुढलें दार उघडल्याच्या आवाजावरून आणि इतर होणाऱ्या हालचालीवरून मी ओळखलें कीं, आमच्या घरीं कोणीतरी पाहुणे आलेले आहेत. माझ्या मनांत चटकन एक कल्पना आली कीं, आपणाहि सणासुदीचा, ठेवणींतला पोषाख करावा. कोणी हांक मारण्यापूर्वीच मी धांवत धांवत माडीवर गेलें. इतर स्त्रिया ज्या प्रमाणें आरशापुढें उभे राहून वेणीफणी करीत त्याप्रमाणें मीहि आरशापुढें उभी राहिले. माझ्या डोक्याला खूप तेल चोपडलें. चेहऱ्यावर पावडरचा एक भला मोठा थर दिला. नंतर मी एक नवीन झगा घातला. डोक्यावरचा 'व्हेल' त्याचा झिरझिरीत झोळ माझ्या तोंडासमोर येईल अशा रीतीनें पिना लावून बसविला, आणि माझ्या छोट्या कमरेभोंवतीं एक भला मोठा कमरपट्टाहि अडकविला. अर्थातच तो पट्टा मागें सैलपणानें लोंबत होता. जवळ जवळ झग्याच्या किनारीला लागत होता म्हणाना. अशा रीतीनें चांगले चांगले कपडे घालून मी पाहुण्यांच्या स्वागताकरितां खालीं धांवत गेलें.

मी इतरांच्यापेक्षां वेगळी आहें हें माझ्या नेमकें केव्हां लक्षांत आलें हें मला नक्की आठवत नाहीं; परंतु माझ्या मास्तरीणबाई येण्यापूर्वी मला खासच तें समजलें होतें. एकमेकांशीं बोलतांना किंवा एकमेकांला सांगतांना माझी आई व इतर माणसें एकमेकांला माझ्यासारख्या खुणा करीत नाहींत, तोंडानें बोलतात हें मला समजलें होतें. कधीं कधीं तर मी दोन बोलणा-रांच्या मध्यें उभी राही व त्यांचे बोलणारे ओठ चाचपून बघे. परंतु तीं माणसें कशीं बोलतात हें मात्र मला कळत नसे आणि मी गोंधळून जाई. मी

ओठ हलवीत असे, आक्रस्ताळेपणानें हावभाव करीत असे, आवाज काढीत असे, पण व्यर्थ. ह्यामुळें केव्हां केव्हां तर माझा संताप अनावर होई आणि मी थकून जाईपर्यंत किंचाळत व हातपाय झाडत बसे.

मी खूप दंगेखोर होते हें मला कळें; नाहीं असें नाहीं. कारण मी संतापलें कीं "इलाला"—माझ्या नर्सेला—लाथा मारीत असे. त्याचें तिला वाईट वाटे हेंहि मला समजे. रागाचा पारा उतरला कीं त्याबद्दल मला फार फार वाईट वाटत असे. पण त्यामुळें माझा संताप कांहीं कमी झाला नाहीं. मला हवी असलेली एखादी गोष्ट मिळाली नाहीं कीं मी लगेच संतापत असे.

त्या काळीं, आमच्या नीग्रो स्वैपाकीण बाईची मुलगी, मार्था वॉशिंग्टन आणि उत्तम शिकारी म्हणून प्रसिद्ध असलेली बेल् नांवाची केसाळ कुत्री ह्या दोघी माझ्या मैत्रिणी होत्या. मार्थाला माझ्या खुणा कळत आणि माझ्या इच्छेप्रमाणें तिला वागवणें मला शक्य होई. तिच्यावर हुकमत गाज-बण्यांत मला मनस्वी आनंद वाटे आणि माझ्याशीं झोंबाझोंबी करण्यापेक्षां माझें ऐकणेंच बरें हें मार्थाला चांगलें समजलें होतें. मी चांगली धष्टपुष्ट आणि चपळ होतें. पुढील परिणामांची मला मुळींच क्षिति वाटत नव्हती. मला माझें मन चांगलें कळे आणि भांडाभांडी करून सुद्धां मी माझाच हट्टीपणा चालवीत असे.

आमचा पुष्कळसा वेळ स्वयंपाकघरांतच जाई. आइस्क्रीम करूं लागणें, कॉफी दळणें, केकवरून भांडणें आणि मागील दारच्या पायऱ्यापाशीं घोटाळ-णाऱ्या कोंबड्या—बदकांना खाऊं घालणें, हे आमचे आवडते छंद होते. त्यांतलीं कांहीं कोंबडीं इतकीं माणसाळलेलीं होतीं, कीं तीं माझ्या हातांतून दाणे टिपत आणि मला त्यांच्या मऊ अंगावर हात फिरवूं देत. एकदां काय झालें कीं एका लहान कोंबड्यानें तर माझ्या हातांतून टोमॅटोच पळविला. कोंबडेबुवांची ती युक्ति आम्हांला एकदम आवडली आणि आम्ही स्वैपाकीण-बाईनीं तयार केलेली एक मोठी ताजी केक घेऊन पळालों आणि ती सर्वच्यासर्व फस्त केली. अर्थातच मी त्यामुळें पुढें आजारी पडलें आणि मला वाटतें त्या कोंबडेबुवालाहि आधाशीपणाचा प्रसाद मिळाला.

गिनी जातीची कोंबडी आपलीं घरटीं कुठेंतरी आडवळणाला बांधतात. उंच वाढलेल्या गवतांतून त्यांचीं अंडीं शोधून काढणें हा माझ्या

आवडीचा उद्योग होता. अंडीं शोधायला जायचें आहे असें मी मार्थाला तोंडानें सांगूं शकत नव्हतें; पण मी माझी ओंजळ जुळवून जमिनीवर ठेवत असे आणि मग मार्थाला त्याचा अर्थ कळायचा कीं कांहींतरी गोलगोल, गवतांत शोधायचें आहे. जेव्हां केव्हां आम्हांला सुदैवानें अंडीं सांपडायचीं, त्या वेळीं मी तिला तीं कधींच घेऊं देत नसे. उलट जोरजोरानें खुणा करून तिला बजावे कीं तिच्या हातून अंडीं पडतील आणि फुटतील.

धान्य सांठवायची कोठी, घोड्यांचा तबेला आणि जिथें सांजसकाळ गाई-म्हशींचें दूध काढीत असत तो गोठा, ह्याचें मला आणि मार्थाला विलक्षण आकर्षण असे. धार काढीत असतांना, गवळी मला गाईच्या पाठीवर हात ठेवूं देत असत आणि या माझ्या आगाऊ चौकसपणाबद्दल गाईसुद्धां पुष्कळदां लाथाडून चांगला धक्का देत.

नाताळची तयारी करणें यासारखी मजा नाहीं दुसरी. हें सारें काय चाललें आहे, कशाकरितां चाललें आहे याची मला कल्पना नसे, पण घरांत चाललेल्या तळणाचे खमंग वास घरभर सुटत आणि आम्ही गप्प राहावें, त्रास देऊं नये म्हणून मधून मधून आमच्या हातावर खायला देत असत, त्यावर मी आणि मार्था खूष होतों. घरच्या कामांत आम्हीं मधें मधें येत होतों; पण त्यामुळें आमच्या आनंदांत कांहींच कमीपणा येत नसे. मग आम्हांला मसाले दळायला सांगत, वड्या करून उरलेला चूर खायला आणि ढवळायला घेतलेले चमचे चाटायला देत असत. इतर मुलें टांगतात म्हणून मीहि आपला पायमोजा टांगून ठेवी; पण त्या समारंभाचें कौतुक म्हणून किंवा आपल्याला काय मिळेल ह्या उत्सुकतेनें सकाळीं लौकर उठावें असें मला कधींच वाटलें नाहीं.

खोड्या काढण्यांत माझ्या इतकीच मार्थाला मजा वाटे. जुलैच्या कडक उन्हाळ्यांत एकदां दुपारीं घराच्या पायऱ्यावर दोन मुली बसल्या होत्या. त्यांत एक मुलगी शिसवी लाकडासारखी काळीभोर होती आणि गुंडाळ्या गुंडाळ्या केलेले तिचे केस टोपल्यासारखे फिस्कारले होते. दुसरी मुलगी गोरीपान असून तिचे केस लांबसडक आणि सोनेरी होते. एक सहा वर्षांची आणि दुसरी नऊ वर्षांची म्हणाना. धाकटी मुलगी आंधळी होती ती मी आणि दुसरी म्हणजे मार्था. बसल्याबसल्या आम्ही कात्रीनें कागदाच्या बाहुल्या

कापत होतों; पण आम्हांला लौकरच त्या खेळाचा कंटाळा आला. बुटाचे बंद आणि जवळ लोंबणाऱ्या मधुकोषाच्या वेलीचे सारे कोंब कापल्यावर माझी कात्री मार्थाच्या गुंडाळ्या गुंडाळ्यासारख्या वेण्यांकडे वळली. प्रथम मार्थानें विरोध केला; पण मग तिनें तें मान्य केलें. पण लौकरच मार्थाच्या लक्षांत आलें कीं हा खेळ पाळीपाळीनें खेळायला हवा. लगेच तिनें कात्री हिसकावली आणि माझ्या वेणीचा एक पेड कापला. तिनें उरलेले सगळे केससुद्धां कापले असते, पण इतक्यांत आई आली आणि आमचा खेळ संपला.

'बेल्' नांवाची कुत्री ही माझी दुसरी मैत्रीण. ती आळशी आणि म्हातारी होती आणि माझ्याबरोबर भटकण्यापेक्षां शेकोटीपाशीं अंग ताणून झोंपणें तिला आवडे. माझ्या खुणा तिला शिकवायचा मी खूप प्रयत्न केला; पण ती मठ्ठ कुत्री तिकडे लक्षच देत नसे. केव्हां केव्हां ती एकदम उभी राही, अंग झाडे आणि एकटक नजरेनें पाहात स्थिर उभी राही. भक्ष्य पाहिल्यावर कुत्रे करतात अगदीं तसेच. 'बेल्' असें कां करीत असें हें मला कळत नसे; पण ती माझें ऐकत नाहीं एवढें मात्र कळे. ह्यानें मी गोंधळून जाई आणि आमची एकतर्फी ठोसाठोसी सुरू होई. बेल् आपलें आळसावलेलें अंग झाडून, पाय ताणून, मी तिच्या दृष्टीनें किती तुच्छ आहे हें दाखविणाऱ्या शिंका देई आणि शेकोटीच्या दुसऱ्या बाजूला जाऊन पुन्हा निजे. मी मात्र निराश होऊन मार्थाला शोधायला जाई.

त्या काळच्या भयाण, शांत, ध्येयशून्य आणि अंधाऱ्या जीवनाची तीव्रता दाखवणाऱ्या कांहीं आठवणी अगदीं ठळकपणें माझ्या स्मरणांत आहेत. त्या थोड्याच पण भारी तीव्र आहेत.

एकदां मी माझ्या 'एप्रनवर' पाणी सांडलें आणि तो वाळविण्याकरितां शेगडीपाशीं पसरला. माझ्या मनाप्रमाणें तो लौकर वाळेना म्हणून मी तो पुढें ओढला आणि त्या गरम गरम राखेवरतीच टाकून दिला. निखाऱ्यांतून लौकरच जाळ निघूं लागला आणि मी त्यांत सांपडलें, माझें सारे कपडे पेटले आणि मीं एक किंकाळी फोडली. ती ऐकून आमची म्हातारी दाई व्हिनी धांवून आली आणि तिनें माझ्या अंगावर कांबळें टाकून मी गुदमरण्याइतकें मला लपेटून टाकलें. पण त्यानें तो जाळ विझला. सुदैवानें माझे हात आणि केस सोडल्यास मी फारशी भाजलें नव्हतें.

ह्याच सुमाराला मला किल्लीचा उपयोग समजला. एकदां सकाळीं मीं माजघरांत आईला कोंडून कुलूप लावलें. तिथें तिला बिचारीला जवळजवळ तीन तास अडकून राहावें लागलें, कारण सारे नोकर घराच्या दुसऱ्या भागांत होते. आई सारखें दार आंतून ठोकीत होती आणि मी दाराला टेकून बाहेर पायरीवर बसलें होतें. दार ठोकण्याचे धक्के मला बसत आणि मी कुत्सितपणें हसे. ह्या माझ्या खोडकरपणामुळें आईबापांची खात्री झाली कीं लौकरांत लौकर माझ्या शिक्षणाची व्यवस्था करायला हवी. माझ्या मास्तरीणबाई कु. ॲनी सुलिव्हॅन ह्या आल्यानंतर लौकरच त्यांनाहि त्यांच्या खोलींत बंद करायचा मी मौका साधला कु. सुलिव्हॅन ह्यांना कांहींतरी दे म्हणून आईनें सांगितलें होतें ते मी घेऊन वर गेलें आणि परत येतांना झटकन् दार लावलें, कुलूप घातलें आणि कपड्याच्या कपाटाखालीं किल्ली लपविली. शेवटीं कु. सुलिव्हॅन ह्यांना शिडी लावून खिडकींतून काढावें लागलें. मी मात्र मनांतल्या मनांत दुष्ट आनंदानें हसत होते. यानंतर कित्येक महिन्यांनीं मीं ती किल्ली परत दिली.

मी पांच वर्षांची असतांनाच आम्हीं आमचे गुलाबांनीं झाकलेलें छोटेसे घर सोडून नव्या मोठ्या घरांत राहायला गेलों. त्या वेळीं आमच्या घरांत आई-बाबा, दोन थोरले सावत्र भाऊ, मी व धाकटी बहीण मिल्ड्रेड इतके लोक होतों. माझ्या वडिलांच्याबद्दलची माझी पहिली आठवण म्हणजे वर्तमान पत्राच्या पडलेल्या पसाऱ्यांतून मी त्यांच्याकडे गेलें आणि त्यांच्या तोंडापुढें एक छापलेल्या कागदाचा तुकडा धरला हीच होय. तोंडापुढें वर्तमानपत्र धरून वडील काय करीत असतात याचें मला त्या वेळीं कोडेंच वाटे. मी त्यांचा चष्मा लावून त्यांची नक्कल करत असे; पण मला कांहीं तें कोडें कित्येक वर्षें सुटलें नाहीं. नंतर नंतर वर्तमानपत्रें म्हणजे काय हें कळलें आणि माझे वडील तशाच एका वर्तमानपत्राचे संपादक होते हेंहि मला समजलें.

माझे वडील मोठे प्रेमळ आणि कुटुंबासंबंधीं जिव्हाळा बाळगणारे होते. शिकारीचा काळ सोडला तर ते सहसा घर सोडून बाहेर जात नसत. ते एक प्रसिद्ध शिकारी होते, आणि नेमबाज म्हणून त्यांनीं मोठा लौकिक संपादन केला होता. घराच्या खालोखाल त्यांचे, शिकारी कुत्री आणि बंदुका यांवर प्रेम होतें. ते अत्यंत आतिथ्यशील होते, आणि खरं म्हटलं तर दोष वाटावा इतक्या पराकोटीला त्यांचा हा गुण गेला होता. बरोबर पाहुणा

न आणतां ते परत आले असें क्वचितच होई. त्यांच्या बागेचा त्यांना फार अभिमान वाटे आणि असें म्हणतात कीं आमच्या जिल्ह्यांतील सर्वांत चांगली कालिंगडें व स्ट्रॉबेरी आमच्याच बागेंत होत. माझे वडील पाहिल्या बहराचीं द्राक्षें आणि निवडक बेरी आणून मला देत. एका झाडापासून दुसऱ्याकडे, एका वेलीपासून दुसरीकडे ते मला नेत त्या वेळचा त्यांचा प्रेमळ स्पर्श, आणि मला आनंद देणाऱ्या प्रत्येक गोष्टीविषयीं त्यांना वाटणारी उत्सुकता यांची मला स्पष्ट आठवण आहे.

ते गोष्टी सांगण्यांत मोठे पटाईत होते आणि मी भाषा शिकल्यानंतर ते त्यांच्या सुरस दंतकथा माझ्या हातावर खुणांच्या अक्षरांनीं जुळवून दाखवत आणि योग्य वेळीं तीच गोष्ट मी पुन्हा सांगितली कीं त्यांना बेसुमार आनंद होई.

१८९६ सालीं उत्तर अमेरिकेंत उन्हाळ्याच्या अखेरीचे सुंदर दिवस मी घालवीत होते; पण त्याच वेळीं वडिलांच्या मृत्यूची बातमी मला मिळाली. ते थोडेच दिवस आजारी होते, थोडासाच काल यातनांत गेला आणि अखेर सारें संपलें. माझ्या जीवनांतलें पहिलें दुःख आणि मृत्यूशीं माझा आलेला पहिला संबंध तो हाच.

माझ्या आईविषयीं मी लिहूं तरी काय ? माझ्या अंतःकरणांत ती इतकी भरून उरली आहे कीं तिच्याविषयीं कांहीं बोलणेंसुद्धां मला जड झालें आहे.

बरेंच दिवस माझी लहान बहीण मला परकी वाटे. मला कळलें होतें कीं आतां मी कांहीं आईची एकुलती एक लाडकी उरलें नाहीं. त्यामुळेंच तिचा मला मत्सर वाटूं लागला. ज्या मांडीवर मी बसत असे त्यावर ती सदासर्वदा बसायची आणि त्यांतच आईचा सारा वेळ तिच्याकरितांच जाऊं लागला. एक दिवस कांहीं तरी झालें आणि माझ्या मत्सराच्या आगींत अपमानाचें तेल पडलें.

त्याच वेळीं नान्सी नांवाची माझी एक फार लाडकी पण फार फार वापरलेली एक बाहुली होती. माझ्या प्रेमाचा पाऊस आणि रागाचा वर्षाव त्या बिचारीवर होत असे आणि त्यामुळें ती अगदीं खराब आणि फाटायला झाली होती. माझ्याजवळ तसें म्हणाल तर खूपच बाहुल्या होत्या. कांहीं बोलत, कांहीं रडत, तर कांहीं डोळ्यांची उघडझाप करीत; पण बिचाऱ्या

नान्सीवर माझें जेवढें प्रेम होतें तितकें दुसऱ्या कुठल्याच बाहुलीवर नव्हतें. तिचा स्वतंत्र पाळणा होता आणि तिला झोके देऊन झोपवण्यांत मी तासन् तास घालवीत असे. ती बाहुली आणि तो पाळणा यांना मी डोळ्यांत तेल घालून जपत असे पण एकदां त्या पाळण्यांत माझी धाकटी बहीण झोपलेली मीं पाहिली. त्या वेळीं धाकट्या बहिणीविषयीं मला अजिबात प्रेम वाटत नव्हतें. उलट मत्सरच होता आणि त्यांतच हा प्रकार पाहतांच मी संतापानें लाल झालें. मी धांवत धांवत जाऊन तो पाळणा उलटून टाकला. आईनें धांवून बेबीला झेललें नसतें तर ती केव्हांच मेली असती. दृष्टि नाहीं, आणि ऐकायचीहि शक्ति नाहीं. या दोन्हींमुळें निर्माण होणाऱ्या भयाण शांततेच्या दरींतून जातांना मायाळू शब्दांतून किंवा वागण्यांतून निर्माण होणाऱ्या मैत्रीची आणि सौहार्दाची मला कशी कल्पना येणार? पण नंतर लौकरच मिल्ड्रेडची आणि माझी गट्टी जमली आणि आम्हां दोघींच्या अंतःकरणांत एकमेकांविषयीं ओलावा निर्माण झाला. ती आणि मी गळयांत गळा घालून जीवनाचा रस्ता चालू लागलों. तिला अर्थातच माझी हातावर खुणांच्या अक्षरांनीं लिहिण्याची कला येत नव्हती आणि मलाहि तिचे बालिश बोबडे बोल समजत नव्हते.



# – ३ –

हळू हळू बोलण्याची व इतरांना माझे विचार सांगण्याची माझी वृत्ति बळावूं लागली. मला ज्या थोड्या खुणा माहीत होत्या त्या लौकरच अपुऱ्या पडूं लागल्या. मला काय सांगायचें आहे, हें मला खुणांनीं सांगतां येईनासें झालें कीं मी संतापे, रागावे. मला जणूं वाटे कीं कुठल्या तरी दुष्ट अदृश्य हातांनीं मला घट्ट मिठी मारली आहे आणि मग तिच्यांतून सुटण्याचा मी जीवतोड प्रयत्न करीत आहे. मी खूप धडपडत असे–त्याचा उपयोग होई असें नाहीं. परंतु धडपडण्याचा स्वभावच माझा. आणि या साऱ्या धडपडीचा शेवट म्हणजे मी थकून जाई आणि मला रडूं कोसळे. मग आई जवळपास असली तर तिच्या कुशींत मी शिरे–आणि असहाय्य होऊन झालेलें वादळ विसरे. पुढें पुढें तर दुसऱ्यांशीं बोलण्याची, दुसऱ्यांना कांहीं सांगण्याची आवश्यकता वाटूं लागली आणि असे आदळआपटीचे, मनस्तापाचे प्रसंग वरचेवर दररोज येऊं लागले. कांहीं वेळां तर दर तासानें असें होई.

माझ्या आईबाबांना ह्याचें भारी वाईट वाटे आणि काय करावें हेंच त्यांना कळेनासें होई. आमच्या घराच्या जवळपास एखादी आंधळ्या किंवा बहिऱ्या मुलांना शिकवण्याची शाळा नव्हती. शिवाय आमचे टस्कंबिया गांवसुद्धां अशा आडवाटेला होतें कीं इतक्या लांबून एकाच मुलीकरितां, कोणी शिकवायला येईल असें वाटत नव्हतें. शिवाय मी तर बहिरी, मुकी आणि आंधळी. खरं म्हणाल तर मला शिकतां येईल यावर आमच्या कित्येक नातलगांचा आणि स्नेह्यांचा विश्वासच बसत नसे; पण माझ्या आईनें डिकन्सचें 'अमेरिकन नोट्स' हें पुस्तक वाचलें होतें. त्यांतली लॉरा ब्रिग्मन ही मुकी आणि आंधळी होती; पण तरीहि तिनें शिक्षण घेतलें होतें असें अंधुक अंधुक

आईला आठवत होतें. आणि तेवढाच आईच्या आशेला आधार वाटे. पण आईला हेंहि आठवे कीं बहिऱ्या आणि मुक्या मुलांना शिकविण्याची ज्यानें पद्धत शोधली तो डॉ. हो केव्हांच वारला होता आणि मग मात्र ती निराश होई. त्याची शिक्षणपद्धति बहुधा त्याच्या मृत्यूनंतर नाहींशी झाली असावी असें तिला वाटे आणि जरी कोणाला ती माहीत असली तरी आल्बामांतील एका खेड्यांत राहणाऱ्या छोटया मुलीला त्या पद्धतीनें कोण शिकविणार ?

मी सहा वर्षांची असतांना, इतरांनीं असाध्य म्हणून निराश होऊन सोडलेल्या कांहीं आंधळ्या मुलांना बरे करणाऱ्या बाल्टिमोरमधील एका नेत्ररोग-विशारदाची कीर्ति माझ्या वडिलांनीं ऐकली आणि माझ्या डोळ्या-वर इलाज करण्याकरितां मला ताबडतोब बाल्टिमोरला नेण्याचें त्यांनीं ठरविलें.

त्या गमतीदार प्रवासाची मला अजून आठवण आहे. आगगाडींत मी कित्येक लोकांशीं ओळख केली. एका बाईनें मला खेळायला खोके भरून शिंपा दिल्या. माझ्या वडिलांनीं त्यांना भोकें पाडून दिलीं. त्या शिंपा मी ओवत बसे. पुढें ह्या खेळांत मी कित्येक दिवस रमलें होतें. ह्या गाडी-वरचा तिकिट-चेकरसुद्धां मोठा मायाळू होता. तो तिकिटें तपासायला, त्यांना भोंकें पाडायला जेव्हां जेव्हां गाडींत फिरे तेव्हां तेव्हां त्याचा कोट धरून मी त्याच्यामागें जाई. तिकिटांना भोकें पाडणाऱ्या त्याच्या 'पंच'शीं मी खेळणें म्हणूनच खेळत बसे. बाकावर एका कोपऱ्यांत अंगाची घडी करून मी बसे आणि लहानशा जाड कागदावर मजेशीर भोंकें पाडीत तासन्तास घालवीत असे.

माझ्या मावशीनें मला टॉवेलाच्या जुन्या तुकड्यांची एक बाहुली करून दिली होती. त्याला ना आकार ना उकार. नाक, तोंड, डोळे, कान नसलेल्या त्या निराकार वस्तूच्या चेहऱ्याची कल्पना करणें मुलांना स्वप्नांतसुद्धां शक्य झालें नसतें. त्या बाहुलीच्या दुसऱ्या कोणत्याहि दोषापेक्षां, तिला डोळे नाहींत हें माझ्या ध्यानांत फार चटकन आणि ठळकपणानें आलें. मी कित्येक लोकांना पुन्हा पुन्हा ही गोष्ट सांगितली; पण माझ्या बाहुलीला कोणीच डोळे देऊं शकत नव्हते. मग एकदम मला एक कल्पना सुचली आणि

बाहुलीच्या डोळ्याचा प्रश्न सुटला. मी पटकन् बाकावरून उतरलें आणि बाकाखालीं चांचपडत चांचपडत मावशीचा झगा शोधला. ह्या झग्याच्या किनारीला मोठमोठे मणि शिवलेले होते. मी त्यांतले दोन मणि ओरबडून काढले आणि खुणा करून मावशीला सांगितलें कीं माझ्या बाहुलीच्या डोळ्यांच्या जागीं ते शीव. मावशीनें माझे हात उचलून तिच्या डोळ्याला लावले आणि मी तिच्या खुणेला उत्तर म्हणून होकारार्थी मान हलविली. मावशीनें ते मणि बाहुलीच्या डोळ्याच्या जागीं शिवले आणि ते पाहतांच माझा आनंद गगनांत मावेनासा झाला; परन्तु त्या बाहुलीवरचें माझें मन लगेंच उडालें. त्या सबंध प्रवासांत मीं एकदांहि धुसफूस केली नाहीं, कारण माझीं बोटें आणि मन निरनिराळ्या नव्या नव्या गोष्टींत सारखें गुंतलेलें असे.

बाल्टिमोर येथें डॉ. चिशोल्म यांनीं मोठें छान आदरातिथ्य केलें. माझ्या डोळ्यांबाबत मात्र त्यांना कांहींहि करतां आलें नाहीं. परन्तु त्यांनीं माझ्या वडिलांना सांगितलें कीं मला शिकणें अगदीं शक्य आहे आणि आंधळ्या मुक्या मुलांच्या शाळा व त्यांचे तज्ज्ञ शिक्षक याबाबत अधिक माहिती घेण्यासाठीं आम्हीं वॉशिंग्टनमधल्या डॉ. अलेक्झांडर ग्रॅहॅम बेल यांस भेटावें हें उत्तम. निराशेच्या दुःखानें आणि गैरसमजानें भारावलेल्या अंतःकरणानें माझे वडील मला घेऊन वॉशिंग्टनला निघाले. त्यांच्या मनोवेदनांची मला कल्पनाच नव्हती, उलट एका गांवाहून दुसऱ्या गांवाला जाण्याच्या गडबडींत मला मजाच वाटत होती. अपंग मुलांना शिकवण्याच्या कार्यात अद्‌भुत यश मिळविणारे डॉ. बेल यांच्याविषयीं त्यांच्या चहात्यांना अतिशय कौतुक वाटे. ज्या सहानुभूतिपूर्ण व मायाळू वागण्यानें त्यांनीं अनेकांचीं मनें जिंकलीं होतीं, त्या त्यांच्या प्रेमळ स्वभावाची जाणीव मला पहिल्या भेटींतच झाली. त्यांनीं मला मांडीवर घेतलें. त्यांच्या घड्याळाशीं खेळूं दिलें व माझ्यासाठीं त्याचा गजरहि करून दाखविला. माझ्या खुणा त्यांना चटकन् कळत होत्या हें पाहून मला त्यांच्याविषयीं एकदम आपलेपणा वाटूं लागला. परन्तु ह्या पहिल्या भेटींतूनच ज्ञानाचे दरवाजे हळूहळू उघडणार आहेत, मी अंधारांतून प्रकाशांत जाणार आहे, एकलकोंडया जीवनांतून मैत्रीच्या मोकळ्या वातावरणांत जाणार आहे, स्नेह, प्रेम व ज्ञान ह्यांत न्हाऊन जाणार आहे ही मला कल्पनासुद्धां नव्हती.

ज्या ठिकाणीं डॉ. ‘ हो ’ यांनीं अंधांच्या शिक्षणाचा महान् प्रयोग केला त्या बोस्टनच्या परकीन्स अंधशाळेचे प्रमुख श्री. ॲनाग्नोस ह्यांना पत्र लिहावें आणि मला शिकवूं शकेल अशा योग्य शिक्षकाचा तपास करावा असा सल्ला डॉ. बेल यांनीं दिला. माझ्या वडिलांनीं लगोलग पत्र लिहिलें आणि थोड्या दिवसांतच श्री. ॲनाग्नोस यांचें उत्तर आलें कीं योग्य अशी शिक्षिका त्यांच्या पाहण्यांत आहे. हें सारें १८८६ च्या उन्हाळ्यांत झालें, परन्तु पुढच्या मार्च महिन्यापर्यंत कु. सुलिव्हॅन येऊं शकल्या नाहींत.

अशा रीतीनें पुराण-कथेंतल्याप्रमाणें मी ‘ इजिप्तच्या अंधारांतून ’ बाहेर येऊन ‘ सिनाई ’ पुढें उभी राहिलें. इथेंच ईश्वरी शक्तीनें माझ्या आत्म्याला स्पर्श केला आणि दृष्टि दिली. त्यायोगें मी ही आश्चर्यजनक सृष्टि पाहूं शकलें. त्या पवित्र पर्वतावरून मग आकाशवाणी झाली कीं ज्ञान हें प्रेम, प्रकाश आणि दूरदृष्टि आहे.’’



# – ४ –

ज्या दिवशीं, माझ्या शिक्षिका, कु. ॲनी सुलिव्हॅन आमच्या घरीं आल्या तो दिवस माझ्या जीवनांतला सर्वांत महत्त्वाचा दिवस आहे. आम्हां दोघींमध्यें इतका फरक आहे कीं या दिवसानें आमचीं आयुष्यें कशीं जोडलीं याचा मला विस्मय वाटूं लागतो. मला सातवें वर्ष लागण्याला तीन महिने कमी होते त्या दिवशीं म्हणजे ३ मार्च १८८७ रोजीं जीवनाचें नवें पर्व सुरू झालें.

त्या महत्त्वाच्या दिवशीं दुपारीं, मी आतुर मनानें पोर्चमध्यें उभी होतें. माझ्या आईच्या खुणावरून व घरांत चाललेल्या गडबडीमुळें आज घरांत कांहीं तरी विशेष आहे ह्याची मला अंधुक जाणीव होती आणि म्हणून मी पुढील दारीं गेलें आणि पायऱ्यावर उभी राहिलें. सूर्याचे कवडसे मधु-वेलीच्या दाट जाळींतून घुसले होते आणि त्याचा प्रकाश माझ्या तोंडावर पडला होता. दक्षिणेकडून येणाऱ्या सुंदर वसंत ऋतूचें स्वागत करण्यासाठीं वेलीचे कोंब आणि मोहोर आसुसला होता. माझीं बोटें नकळतच त्या पाना-कोंबाच्या परिचित स्पर्शानुरूप, त्यावर घोटाळत होतीं. भविष्यांत कोणता विस्मय, कोणता आनंद माझ्या वांटयाला आला आहे हें मला कळत नव्हतें. कित्येक आठवडे, मी राग आणि कडवटपणाच्या फेऱ्यांत सांपडलें होतें. आणि माझ्या आवेशापूर्ण झगड्यानंतर मनाला एक प्रकारची ग्लानि आली होती.

खूप धुकें आलेल्या वेळीं तुम्ही कधीं बोटीवर होतां का ? त्या वेळीं असें वाटतें कीं कसल्या तरी पांढऱ्या अंधारांत तुम्हांला गुरफटून टाकलें आहे. आणि तुमचें व्याकुळ आणि उत्सुक जहाज, आवाजाच्या अनुरोधानें चांचपडतें आहे. कांहीं तरी घडावें म्हणून धडधडत्या अंतःकरणानें तुम्ही वाट

पाहात असतां. शिक्षणापूर्वी माझी अवस्था अशीच होती. आयुष्याला दिशा नव्हती, आवाजाची चाहूल नव्हती आणि आसरा कुठें आहे, किती लांब आहे ह्याची जाणीवहि नव्हती. " प्रकाश, प्रकाश दिसूं दे " ही माझ्या हृदयाची शब्दहीन हाकाटी होती आणि त्या तळमळीच्या हाकेबरोबरच प्रेमाचा प्रकाश माझ्यावर पडला.

जवळ येणाऱ्या पावलांचा आवाज ऐकला. आई येते आहे या कल्पनेनें मीं हात पुढें केले. आणि कोणी तरी ते हातांत घेतले. मला उचलून अगदीं जवळ घेतलें. मला साऱ्या गोष्टी शिकवायला, दाखवायला आणि त्यापेक्षांहि म्हणजे माझ्यावर नितान्त प्रेम करायला हें नवें माणूस आलें होतें.

माझ्या शिक्षिका आल्यानंतर दुसऱ्या दिवशीं त्यांनीं मला त्यांच्या खोलींत बोलावलें आणि एक छान बाहुली दिली. सुप्रसिद्ध पर्किन्स अंध-शाळेच्या मुलांनीं ती मला भेट म्हणून पाठविली होती आणि लॉरा ब्रिग्मन या सुप्रसिद्ध अंध-महिलेनें तिच्यासाठीं कपडे करून दिले होते. अर्थात् हें मला नंतर कित्येक दिवसांनीं समजलें. मी थोडा वेळ तिच्याशीं खेळल्यानंतर, कु. सुलिव्हॅन ह्यांनीं हळूच माझ्या हातावर 'बा–हु–ली' असा शब्द बोटांच्या खुणांनीं करून दाखवला. त्या बोटांच्या खेळाची मला फार गंमत वाटली आणि मी लगोलग तसेंच करण्याचा प्रयत्न करूं लागलें. अखेर जेव्हां मला तीं अक्षरें बरोबर करतां येऊं लागलीं तेव्हां माझें मन बालिश आनंदानें आणि अभिमानानें न्हाऊन गेलें. मी खालीं आईकडे धांवत धांवत गेलें आणि माझे हात वर करून आईला 'बा–हु–ली' असा शब्द करून दाखविला. मी काय करतें आहे, तो शब्द आहे किंवा नाहीं याची मला खात्री नव्हती; पण माकडाप्रमाणें मी त्या बोटाच्या खेळाची नक्कल करीत होतें. लौकरच मला पुष्कळसे शब्द करतां येऊं लागले. अर्थातच सगळ्यांचा अर्थ माझ्या पूर्ण ध्यानांत येत नसे. मी शिकलेल्या अगदीं पहिल्या शब्दांत 'पिन्,' 'कप,' 'हॅट,' हीं नामें आणि 'ऊठ,' 'बस,' 'चाल,' हीं क्रियापदें होतीं असें आठवतें. माझ्या शिक्षिकेजवळ बरेच दिवस शिकल्यावर माझ्या ध्यानांत आलें कीं प्रत्येक गोष्टीला एक एक नांव असतें म्हणून.

एक दिवस मी माझ्या नव्या बाहुलीशीं खेळत असतांना सुलिव्हॅन बाईनीं माझ्या मांडीवर माझी जुनी मोठी बाहुली ठेवली आणि माझ्या हातांत, 'बाहुली' असा शब्द केला. दोन्ही बाहुल्यांना 'बाहुली' हेंच नांव आहे हें त्यांना मला शिकवायचें होतें. त्याच दिवशीं सकाळीं मी आणि सुलिव्हॅन बाई यांचा 'भांडें' आणि 'पाणी' यावर वादविवाद झाला होता. त्या मला ते दोन्ही शब्द कसे वेगळे आहेत हें समजावून सांगत होत्या; पण मी पुन्हा पुन्हा घोंटाळा करीत होतें आणि शेवटीं कंटाळून सुलिव्हॅन बाईनीं तो नादच सोडला होता. बाहुलीच्या बाबतींत तसेंच झालें. त्या पुन्हा पुन्हा समजावून सांगत होत्या; पण त्यामुळें माझ्या रागाचा पारा वर गेला आणि मीं ती नवी बाहुली उचलून फरशीवर आपटली. फुटलेल्या बाहुलीचे तुकडे तुकडे माझ्या पायाशीं पडलेले पाहून मला फार आनंद झाला. मला बाहुली फुटल्याचा खेद किंवा रागाबद्दल खंतहि वाटली नाहीं. त्या बाहुलीबद्दल मला प्रेमच वाटत नव्हतें. सुलिव्हॅन बाईनीं सारे तुकडे केरसुणीनें बाजूला केले. आमच्या तंटयाचें मूळ झालेली ती बाहुली गेल्याबद्दल मला मनांतल्या मनांत समाधान वाटलें. बाईनीं माझी हॅट आणून दिली आणि मला कळलें कीं आपल्याला कोवळया उन्हांत फिरायला जायचें आहे. जर शब्दहीन भावनेला विचार म्हणतां येत असेल तर हा विचार मनांत येतांना मला आनंदाच्या उकळया फुटूं लागल्या.

वाडीच्या विहिरीवरच्या खोपीवर पसरलेल्या मधुवेलीच्या सुगंधाच्या नादानें आम्ही त्या खोपीकडच्या पायवाटेनें निघालों. कोणीतरी विहिरीवर पाणी काढीत होते. पाण्याच्या त्या झोताखालीं बाईनीं माझा हात धरला. माझ्या एका हातावरून पाण्याची शीतल धार वाहात होती आणि दुसऱ्या हातांत बाईनीं अक्षरें करून दाखवलीं "पा–णी." प्रथम सावकाश आणि मग जलद केली. बाईंचीं बोटें कोणत्या खुणा, कोणतीं अक्षरें करता-हेत यावर एकचित्त होऊन मी आपली उभी होतें. एकदम, आपण कांहीं तरी विसरल्याची अंधुक आठवण जागी होऊं लागली–चुकती आठवण जागी झाल्याचा, सांपडल्याचा विलक्षण रोमहर्षक अनुभव आला–आणि भाषेचें कोडें मला एकदम उलगडलें. 'पा–णी' म्हणजे ज्याची शीतल, ओघवती आणि विस्मयजनक धारा माझ्या हातावरून वाहात होती तेंच,

हें माझ्या लक्षांत आलें. त्या शब्दाच्या जिवंतपणामुळें माझा निद्रित आत्मा जागृत झाला, स्वतंत्र झाला. आशा, आनंद आणि प्रकाश ह्यांनीं माझ्या मनांत प्रवेश केला. माझ्या मनाला, आत्म्याला, बुद्धीला, बंधनें होतींच, नाहीं असें नाहीं. आंधळेपणा, बहिरेपणा, मुकेपणा साऱ्या बेड्या जशाच्या तशा होत्या; परंतु त्या निखळतील, बंधनें पार होतील हा विश्वास वाटूं लागला.

खोपीवरून मी परत आलें ती शिकण्याच्या दुर्दम्य इच्छेनेंच. प्रत्येक वस्तूला नांव आहे. आणि प्रत्येक नांवामागें नवा विचार जन्माला येतो हें माझ्या लक्षांत आलें. परत येतांना वाटेंत ज्या ज्या वस्तूला मी स्पर्श केला ती ती वस्तु जीवनेच्छेनें थरथरत आहे असें मला वाटलें. कारण मी प्रत्येक वस्तु मला मघाशीं प्राप्त झालेल्या दिव्य दृष्टीनें पाहात होतें. दारांत येतांच, मी फोडलेल्या बाहुलीची मला आठवण आली. मी चांचपडत कोपऱ्यांत गेलें आणि बाहुलीचे तुकडे उचलले. ते सारे तुकडे जोडायचा निष्फळ प्रयत्न केला आणि माझ्या डोळ्यांत पाणी तरारलें. मीं काय केलें याची खरी कल्पना आली आणि पहिल्याप्रथम मला दुःख झालें; पश्चात्ताप झाला !

त्या दिवशीं मी पुष्कळ नवे शब्द शिकले. सगळे कांहीं मला आठवत नाहींत; पण 'आई' 'बाबा' 'ताई' 'बाई' हे शब्द मात्र आठवतात. जादूच्या कांडीप्रमाणें ह्या शब्दाशब्दांतूनच माझ्या अनुभवाचा मोहोर फुलणार होता. अनुभूतीचा विश्वविस्तार होणार होता. त्या दिवशीं माझ्याहून आनंदी मुलगी कोणी असणें शक्यच नव्हतें. त्या रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या, सारा दिवसभर घडलेल्या घटना आणि शेवटीं त्यांतून मला झालेला मनस्वी आनंद ह्याची मी मनांतल्या मनांत पारायणें करीत होतें. त्या दिवशीं पहिल्या प्रथमच मी दुसऱ्या दिवसाची आतुरतेनें वाट पाहात झोपीं गेलें.



— ५ —

माझ्या मनाला जागृति आली, हुरूप वाटूं लागला. त्यानंतरच्या म्हणजे १८८७ च्या उन्हाळयांतल्या कितीतरी आठवणी माझ्या लक्षांत आहेत. त्या उन्हाळयांत, केवळ हातांनीं चांचपडत शोधायचें, आणि त्या वस्तूचें नांव समजावून घ्यायचें हाच माझा उद्योग होता. जसजशीं मी अधिक अधिक वस्तूंचीं नांवें आणि उद्योग समजावून घेऊं लागलें तसतसा, मी आणि माझ्या भोंवतालचें जग ह्यांतील भेद मावळत चालला.

ज्या वेळीं पेरणीचा हंगाम आला त्या वेळीं सुलिव्हॅन बाई मला शेतावर घेऊन गेल्या. तिथें बीं पेरण्यासाठीं नांगरट चालली होती. नंतर त्यांनीं मला टेनेसी नदीच्या कांठाकडे नेलें. तिथल्या मऊ, उबदार गवतावर बसून मी सृष्टीच्या औदार्याचे पहिले धडे शिकले. सूर्याच्या आणि पावसाच्या कृपेमुळे झाडें कशीं उगवतात. तीं दिसायला सुंदर असतात. खायला मधुर फळें देतात. पांखरें घरटीं कशीं बांधतात आणि ह्या शेतावरून त्या शेतावर कशी फिरतात, कशीं जगतात, खार, हरिण, सिंह आणि प्रत्येक पशुपक्षी आपआपलें अन्न कसें मिळवतात, निवारा कसा शोधतात. सारें सारें शिकलें. जसजसें हें सर्व मला समजूं लागलें तसतशी भोंवतालच्या जगांतील गंमत कळूं लागली. गणितांतील बेरजा व वजाबाक्या आणि भूगोलाच्या शास्त्राप्रमाणें पृथ्वीचा आकार कसा आहे हें शिकण्यापूर्वींच सुलिव्हॅन बाईंनीं मला सुगंधानें दरवळणाऱ्या रानांवनांतलें सौंदर्य, गवताच्या प्रत्येक पात्यांत असणारें सौंदर्य, माझ्या छोट्या ताईच्या मऊ हातावरच्या रेषा, चढउतार आणि गालावरची खळी ह्यांतलें सौंदर्य समजावून दिलें होतें. माझे पहिले पहिले सारे विचार निसर्गाच्या सुरांत सूर मिळवून जुळवले होते. कारण फुलें, पांखरें आणि मी सारी एकाच सृष्टीचींच लेकरें होतों ना ?

ह्याच वेळीं आलेल्या एका अनुभवानें मला कळलें, कीं निसर्गाची करणी सदासर्वदा दयाळू असतेच असें नाहीं. एक दिवस मी आणि बाई खूप लांबवर फिरायला गेलों होतों. सकाळची वेळ मोठी प्रसन्न होती, पण हळू हळू हवा गरम होऊं लागली आणि उकडूं लागलें; म्हणून आम्ही परतलों. वाटेंत दोनतीन वेळां झाडाखालीं आम्ही थांबलों; परंतु शेवटचा टप्पा म्हणून घरापासून थोडया अंतरावर असलेल्या भल्यामोठ्या चेरीच्या झाडाखालीं आम्ही थांबलों. थंडगार सावली आणि त्यांतच झाड खालवर वाढलेलें होतें. त्यामुळें बाईच्या मदतीनें मी सहज वर चढलें आणि फांदीवर एका बेळक्यांत जागा करून बसलें. झाडावर इतकें थंडगार वारे वाहात होते कीं सुलिव्हॅन बाई म्हणाल्या, फराळ तिथें बसूनच करावा. मीहि झटकन होय म्हणालें आणि त्या घरीं जाऊन खायचें घेऊन येईपर्यंत, तिथेंच फांदीला घट्ट धरून बसायचें कबूल केलें.

पण क्षणार्धात त्या झाडांत एकदम बदल झाल्यासारखें मला वाटलें: हवेंतला उकाडा एकदम नाहींसा झाला. उकाडयावरून मला प्रकाश असल्याचें समजे. वातावरणांतली उष्णता पार पळाली आणि आभाळ भरून आल्याचें मला समजलें. जमिनींतून एक विलक्षण दर्प येत होता. मला हें ठाऊक होतें कीं असा वास आला म्हणजे वादळ होतें आणि एका अनामिक भीतीनें माझ्या मनांत ठाण मांडले. मला अगदीं एकटें एकटें साऱ्या लोकांपासून दूर, स्थिर अशा भूमातेपासून दूर, अधांतरीं असल्यासारखे वाटत होतें. एका अनोळखी आणि प्रचंड अशा वातावरणांत मी सांपडलेलें होतें. झाडाला घट्ट धरून, जीव मुठींत घेऊन, काय घडतें तें मी पाहात होतें तोंच पावसाची थंडगार धार माझ्यावर कोसळली. बाई परत येण्याची मी सारखी वाट पाहात होते; पण सर्वांत जास्त म्हणजे मला झाडावरून खालीं उतरायचें होतें.

त्यानंतर क्षणभर सारें शांत होतें; पण लगेंच सारीं पानें थरारून गेलीं. सारें झाड जणूं कांकडून थरथरत होतें. आणि असा सोसाट्याचा वादळी वारा घोंघावत आला म्हणता कीं जीव खाऊन मी त्या फांदीला घट्ट चिकटून बसलें नसतें तर त्या सपाट्यांत केव्हांच उडून खालीं पडलें असतें. तें झाडहि उभे राहण्याकरितां धडपडत होतें. लहान लहान फांद्या तुटून

माझ्याभोंवतीं सारख्या पडत होत्या. आपण खालीं उडी टाकावी असा एक विचार माझ्या मनांत आला; पण मी भीतीनें घट्ट धरून बसलें; पण मग तशीच हळूहळू खालीं सरकत घसरत येऊं लागले. भोंवतालच्या बारीक फांद्यांचे चाबकासारखे फटकारे बसत होते. झाड एकसारखें कांकडत होतें. जणूं त्यावर कसला तरी आघात झाला होता आणि त्याची वेदना झाडाच्या साऱ्या अंगाअंगांतून वाहात मी बसलेल्या फांदीपर्यंत झोंबत होती. माझी उत्कंठा शिगेस पोंचली होती आणि तें प्रचंड झाड एकदम खालीं कोसळणार असें मला वाटत होतें. तोंच सुलिव्हॅन बाईनीं माझे हात धरले आणि मला खालीं उतरवलें. मीं एकदम त्यांना मिठी मारली. पुन्हा एकदां जमिनीला पाय लागल्याच्या आनंदानें मी कांपत होतें. मी एक नवा धडा शिकलें होतें कीं कधीं कधीं सृष्टीसुद्धां आपल्या लेकरांच्याविरुद्ध घनघोर युद्ध पुकारते आणि मृदु स्पर्श करणारा तिचा हात केव्हां केव्हां विश्वासघाती असतो.

यानंतर कित्येक दिवसपर्यंत मीं झाडावर चढायचें नांव काढलें नाहीं. त्या नुसत्या कल्पनेनेंच मला भीति वाटत असे; पण मिमोसा झाडाच्या गोड गोड बोलावण्याच्या मोहानें शेवटीं त्या भीतीवर जय मिळविला. एका वसंत ऋतूंत सकाळीं मी एकटीच लताकुंजांत वाचीत बसलें होतें. आणि भोंवतालच्या हवेंत पसरलेल्या सुगंधाची मला अचानक जाणीव झाली. मी त्या मत्त गंधानें मोहून उभी राहिलें आणि अगदीं सहजगत्या हात पुढें केले. वसंत ऋतूच्या देवता आत्तांच लताकुंजांत येऊन गेल्या होत्या, असें मला वाटलें. 'काय असावें हें?' मी स्वतःशींच म्हणालें. आणि मग माझ्या लक्षांत आलें कीं हा मिमोसा झाडाच्या मोहोराचा दरवळ आहे. कुंपणाच्याजवळ वाट फुटते तिथें हा मिमोसाचा वृक्ष होता हें मला माहीत होतें म्हणून मी चांचपडत चांचपडत तिथपर्यंत गेलें. हो. तिथेंच होता तो. कोवळ्या उन्हांत चकाकत होता. त्याचें अंग त्या मोहोरानें लवलें होतें जणूं आणि त्याच्या लवलेल्या फांद्या उंच वाढलेल्या गवतांना कुरवाळत होत्या. त्याहून सुंदर, कांहीं या जगांत आहे कां नाहीं कोण जाणे. कुठल्याहि पार्थिव स्पर्शाला तो मोहोर बुजत होता. जणूं स्वर्गातला कल्पवृक्ष आणून कोणीतरी पृथ्वीवर लावला होता. झाडाखालीं पडलेल्या पाकळ्यांच्या खचांतून वाट काढीत

मी त्या प्रचंड खोडाकडे गेलें. क्षणभर तशीच उभी राहिलें आणि मग त्यावर असलेल्या दुबेळक्यांत पाय देऊन मी झाडावर चढलें. तिथेंच राहणें शक्य नव्हतें कारण फांद्या बऱ्याच जाडजूड होत्या आणि हाताला बोचत होत्या. पण आपण कांहींतरी वेगळे आणि पराक्रमाचें काम करीत आहों ह्या कल्पनेनें मन हरखलें होतें आणि मी वरवर चढतच राहिलें. अगदीं वर एक दुबेळक्यांत पूर्वी कोणीतरी बसायला फळी मारून जागा केली होती तिथें जाऊन मी बसलें. आतां ती फळी त्या झाडाचाच एक भाग झालेली होती. मी कितीतरी वेळ त्या झाडावर बसून राहिलें होतें. जणूं कांहीं एखाद्या गुलाबी ढगावर स्वार झालेली अप्सराच. त्यानंतर अनेकदां मी त्या माझ्या कल्पवृक्षावर बसून तासन्तास सुखांत घालवले आहेत. आणि तिथेंच मी कित्येक सुखद विचारांच्या गुंजनांत आणि भविष्याच्या उज्ज्वल स्वप्नें पाहण्यांत मन रमवलें आहे.



## — ६ —

ह्या शिक्षणानें मला सर्व भाषांच्या शिक्षणाची किल्लीच मिळाली होती आणि त्याचा उपयोग करून मी शिकायला आतुर झालें होतें. ज्या मुलांना ऐकूं येतें त्यांना भाषा शिकायला फारसे प्रयास पडत नाहींत. इतरांच्या तोंडांतून बाहेर पडणारे शब्द वरच्या वर कानांनीं झेलायचे व शिकायचे; पण बहिऱ्या मुलांना सावकाश आणि त्रासदायक पद्धतीनें शिकावें लागतें. अर्थात् पद्धत कोणतीहि झाली तरी त्याचा उपयोग मात्र मोठा चांगला होतो. एखाद्या वस्तूचें नांव समजावून घेण्यापासून, तों वाचनापर्यंत हळू हळू पायरी–पायरीनें मूल शिकतें आणि पहिल्या अस्पष्ट उच्चारलेल्या स्वरापासून तों विचारांची गरुडभरारी एका वाक्यांत सांगणाऱ्या शेक्सपियरच्या वचनापर्यंत त्या मुलांची प्रगति होते.

प्रथम प्रथम बाई जेव्हां एखादी गोष्ट शिकवायच्या तेव्हां मी फारसे प्रश्न विचारीत नसे. कारण माझ्या कल्पना अस्पष्ट होत्या आणि शब्दांचा सांठाहि फार तोकडा होता. परंतु जसजसें ज्ञान वाढूं लागलें, मी अधिक अधिक शब्द शिकूं लागलें, तसतसा माझा चौकसपणा वाढूं लागला. मी पुन्हा पुन्हा एखाद्या विषयाबद्दल प्रश्न विचारून अधिक माहिती घेण्याचा प्रयत्न करीत असे. एखादे वेळीं नव्या शब्दानें माझ्या मनावर पूर्वीच उमटलेल्या एखाद्या अनुभवाचें प्रतिबिंब पुन्हा दिसूं लागे.

ज्या सकाळीं मी बाईंना ‘ प्रेम ’ या शब्दाचा अर्थ विचारला, ती सकाळ अजूनहि माझ्या लक्षांत आहे. त्या वेळीं मला फारसे शब्द माहीत नव्हते. मला त्या दिवशीं बागेंत ‘ व्हायोलेट्चीं ’ पहिलीवहिलीं फुलें सांपडलीं आणि बाईंना देण्याकरितां मी तीं घेऊन आलें होतें. बाईंनीं मला

जवळ घेतलें आणि पापा घेण्याचा प्रयत्न केला; पण त्या वेळीं आईखेरीज दुसऱ्या कोणीहि माझा मुका घेतलेलें मला खपत नसे. बाईनीं मायाळूपणानें मला कवटाळून घेतलें आणि माझ्या हातावर शब्द केले. "हेलेनवर माझें प्रेम आहे." "प्रेम म्हणजे काय?" मीं विचारलें. बाईनीं मला अधिकच जवळ ओढलें आणि माझ्या हृदयाकडे बोट दाखवीत त्या म्हणाल्या, "प्रेम इथं आहे." त्या वेळीं पहिल्या प्रथम माझ्या हृदयाचें स्पंदन मला समजलें; पण बाईच्या उत्तरामुळें मी जास्तच गोंधळून गेलें. कारण कोणत्याहि वस्तूला प्रत्यक्ष हात लावून पाहिल्याशिवाय मला तिचें स्वरूप कळतच नसे.

बाईच्या हातांतल्या व्हायोलेट फुलांचा मीं वास घेतला आणि अर्धवट शब्दांनीं, अर्धवट खुणांनीं बाईना विचारलें कीं "हा सुवास म्हणजे प्रेम का?" बाई म्हणाल्या, "नाहीं." पुन्हा मीं विचार केला. कोवळ्या उन्हांत आम्ही बसलों होतों तेव्हां उन्हाच्या दिशेनें बोट करून मीं म्हटलें, "बाई, हें ऊन म्हणजे प्रेम नाहीं का?" त्या वेळीं मला सूर्यापेक्षां कांहींहि सुंदर वाटत नव्हतें. कारण त्याच्या उष्णतेनेंच झाडें वाढतात; पण सुलिव्हॅन बाईनीं नकारार्थी मान हलविली. मग मात्र मी खट्टू झालें. माझ्या मनाचा फारच गोंधळ उडाला. प्रेम म्हणजे काय? हें सुलिव्हॅन बाई कां दाखवीत नाहींत हेंच मला कळेना.

दोनतीन दिवसांनीं मी मणि ओवायचा खेळ खेळत होतें. वेगवेगळ्या आकाराचे मणि एका विशिष्ट क्रमानें ओवून खेळायचें असतें यांत. दोन मोठे, मग तीन लहान मग पुन्हा मोठे असे. मी त्यांत खूपच चुका केल्या होत्या. सुलिव्हॅन बाईनीं त्या मला पुन्हा पुन्हा दाखवल्या होत्या; पण शेवटीं मी एक अगदीं ढोबळ चूक केली आणि मग क्षणभर मन एकाग्र करून मणि कोणत्या पद्धतीनें ओवायचे ह्यावर बाईनीं दिलेल्या धड्याची आठवण केली आणि मणि कसे ओवावे हें ठरवलें. बाईनीं माझ्या कपाळाला हळू स्पर्श केला आणि खुणांनीं, स्पष्टपणानें शब्द केले. "वि–चा–र कर."

माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. माझ्या डोक्यांत चाललेल्या घडामोडीचें नांव म्हणजे 'विचार' आणि प्रथमच एका कल्पनेचा अर्थ स्पष्टपणानें माझ्या ध्यानांत आला.

बराच वेळ मी गप्प बसलें होतें. माझ्या पुढ्यांत पडलेल्या मण्यांचा मी विचारच करीत नव्हतें. मी 'प्रेम' म्हणजे काय हें शोधायची धडपड करीत होतें. कारण 'कल्पना' म्हणजे काय ? हें माझ्या लक्षांत आलें होतें. त्या वेळीं दिवसभर सूर्य ढगाआडच होता, आभाळ काळवंडलें होतें, थोडासा पाऊसहि झाला होता. पण इतक्यांत ढगाआडून सूर्य वर आला आणि प्रकाशाचा तेजस्वी झोतच्या झोत खोलींत आला. मी पुन्हा एकदां बाईना विचारलें, 'हा झोत म्हणजेच प्रेम का ?'

बाई म्हणाल्या, 'सूर्य वर येण्यापूर्वी आभाळांत ढग होते ना ? तशासारखें कांहींसें प्रेम असते' आणि नंतर आतिशय सोप्या शब्दांत त्यांनीं प्रेमाची कल्पना मला समजावून सांगितली; पण त्याचाहि संपूर्ण अर्थ मला कळला नाहीं. त्या म्हणाल्या, "तू ढगांना हात लावूं शकत नाहींस, पण पावसाचा स्पर्श तुला कळतो. आणि उकाड्याच्या दिवसानंतर तर जमिनीला अशा पावसाची किती तहान लागलेली असते, पावसामुळें फुलांना किती आनंद होतो हेंहि तुला माहीत आहे. त्याचप्रमाणें तुला प्रेमाला हात लावतां येत नाहीं, पण त्यामुळें जीवनांत निर्माण झालेला गोडवा तूं समजूं शकतेस. प्रेमाशिवाय तूं आनंदी, सुखी राहणारच नाहींस, तुला खेळावेंसें सुद्धां वाटणार नाहीं."

हें ऐकतांच तें सुंदर सत्य माझ्या मनावर उमटलें. माझा आत्मा आणि इतरांचे आत्मे हे एक प्रकारच्या अदृश्य धाग्यांनीं गुंफले गेले आहेत असें मला वाटूं लागलें.

माझ्या शिक्षणाच्या प्रारंभापासून सुलिव्हॅन बाईनीं असा एक नियम केला होता कीं इतर मुलांच्याशीं ज्या पद्धतीनें त्या बोलत त्याच पद्धतीनें त्या माझ्याशींहि बोलत. फरक इतकाच कीं इतरांच्याशीं तोंडानें बोलायचें तर माझ्याशीं बोलायचें म्हणजे हातावर खुणा करायच्या. एखादी गोष्ट सांगतांना किंवा बोलतांना मी अडलें तर त्या शब्द सुचवायच्या; वाक्प्रयोग सांगायच्या, इतकेंच काय पण आमच्या दोघींचें संभाषण चालू असतांना मी बोलूं शकत नाहीं असें वाटलें तर त्याच माझें वाक्य पूर्ण करायच्या.

ही पद्धत कित्येक वर्षांपर्यंत चालू होती. कारण बहिरीं मुलें कांहीं महिन्या दोन महिन्यांत शिकत नाहींत. आपल्या रोजच्या व्यवहारांत ज्यांचा

आपण उपयोग करतों असे असंख्य शब्द, म्हणी शिकायला त्यांना दोन तीन वर्षं सुद्धां लागतात. ज्यांना ऐकूं येतें अशीं मुलें पुन्हा पुन्हा म्हणून किंवा नक्कल करून बोलायला शिकतात. तें मूल जें संभाषण घरांत ऐकतें त्यामुळें त्याच्याहि मनांतल्या कल्पना जागृत होऊं लागतात आणि तें मूल आपल्या कल्पना स्वतःच्या शब्दांत सांगायला शिकतें. परंतु बहिऱ्या मुलांना संभाषण करणें शक्य नसल्यानें त्यांच्या बाबतींत ही विचारा–उच्चाराची देवाणघेवाण होऊंच शकत नाहीं. पण ह्याची कल्पना असल्यामुळेंच सुलिव्हॅन बाईंनीं, मला संभाषणाला प्रोत्साहन देण्याचा निश्चय केला. त्यांनीं ऐकलेलें कोणतेंहि संभाषण त्या शब्दशः मला सांगत आणि त्यांत मी कोठें, कसा भाग घ्यायचा हेंहि समजावून देत. पण कित्येक दिवसांनंतर मी संभाषणांत भाग घेण्याचें धाडस केलें आणि योग्य वेळीं, उचित बोलणें साधायला तर फार दिवस जावें लागले.

संभाषणांत ज्या गोष्टींचा आपण सहजगत्या उपयोग करतों त्या समजणें आंधळ्या किंवा बहिऱ्या मुलांना फार जड जातें. आणि जीं मुलें आंधळीं असून शिवाय बहिरीं आहेत त्यांचे तर विचारायलाच नको. आवाज आणि त्याचा चढउतार त्यांना समजत नाहीं. आणि उच्चारण्याच्या पद्धतीनें, आवाजाच्या चढउतारानें, शब्दाचे अर्थ–वैभव कसें स्पष्ट दिसतें हेंहि त्यांना कळत नाहीं. माणूस जें बोलतो त्याचा भाव त्याच्या चेहऱ्यावर उमटत असतो, पण चेहऱ्यावरचे भाव किंवा मुद्रा, दृष्टि किंवा आवाजाची उंची ह्या कशाचाच त्या दुर्दैवी मुलांना उपयोग नसतो.



# — ७ —

माझ्या शिक्षणाची दुसरी पायरी म्हणजे वाचायला शिकणें. मला शब्द-रचना करतां येऊं लागल्याबरोबर उठावाचीं अक्षरें काढलेले कार्डबोर्डाचे तुकडे बाईनीं मला दिले. त्या प्रत्येक शब्दानें एखाद्या वस्तूचा, एकाद्या गुणाचा किंवा एखाद्या घटनेचा बोध होतो हें मला कळलें. माझ्याजवळ एक चौकट होती आणि लहानसहान वाक्यें करण्याकरितां शब्दाचे तुकडे त्या चौकटींत अडकविण्याची सोय होती. परंतु माझी पद्धत प्रथम वस्तु मांडून मग वाक्य करायची असे. मी प्रत्येक शब्दाचा कार्डबोर्डवर केलेला उठावाचा तुकडा त्या वस्तूपुढें ठेवी. म्हणजे बाहुलीपुढें 'बाहुली' हा शब्द, गादीपुढें 'गादी' हा शब्द ठेवायचा आणि नंतर प्रत्यक्ष बाहुली गादीवर ठेवून 'बाहुली', 'गादी', 'वर' 'आहे', असे शब्द त्यांच्या शेजारी मांडून ठेवायचे. अशा रीतीनें प्रत्यक्ष वस्तूच्याच साहाय्यानें मी वाक्यरचना शिकलें.

बाई असें सांगतात कीं एके दिवशीं मी स्वतःच कपडयाच्या कपाटांत उभी राहिलें. माझ्या झग्यावर 'मुलगी' हा शब्द लिहिलेला कार्डबोर्डचा तुकडा टोंचला आणि शेजारी शेल्फांत 'मुलगी', 'कपाटांत', 'उभी', 'आहे' हे शब्द मांडून ठेवले. ह्या खेळाची मला भारी गंमत वाटावयाची. बाई आणि मी हा खेळ तासन्तास खेळत होतों. आणि आमच्या खेळा-नंतर अभ्यासाच्या खोलींतली प्रत्येक वस्तु वाक्यरचनेच्या रूपाप्रमाणेंच मांडलेली दिसे.

उठावाचीं कार्डबोर्डाचीं अक्षरें वाचण्यापासून तें छापलेलें पुस्तक वाचण्यापर्यंतचा प्रवास अगदीं सहज झाला. लौकरच मीं पहिली वाचनमाला

वाचावयास सुरुवात केली. त्या वाचनमालेंत माझ्या ओळखीचे शब्द मी शोधत राही आणि ते सांपडतांच, लपंडावाच्या खेळांत लपलेला गडी सांपडला म्हणजे जसा आपल्याला आनंद होतो तसा मला आनंद होई. मी गोष्टीची पुस्तकें वाचावयास सुरवात केली. त्याची हकीकत नंतर येईलच.

सुरुवातीला कित्येक दिवस मला अभ्यासाचे धडे असे नव्हतेच. मी अगदीं मन लावून अभ्यास करीत असे. तोहि मला एक प्रकारचा खेळच वाटे. सुलिव्हॅनबाई प्रत्येक धडा एखाद्या सुंदर गोष्टीच्या किंवा कवितेच्या आधारानें शिकवीत. एखादी गोष्ट मला विशेष आवडली असें दिसलें तर एखाद्या लहान मुलीप्रमाणें त्या ती गोष्ट पुनः पुनः रंगवून सांगत. सर्वसामान्य मुलांना जे विषय बोजड आणि कंटाळवाणे असे वाटतात त्या व्याकरण अंकगणित यासारख्या विषयांच्याबरोबर माझ्या अत्यंत आवडत्या आठवणी गोवलेल्या आहेत.

माझ्या सुखदुःखामध्यें सुलिव्हॅन बाई ह्यांच्या सहानुभूतीचा केवढा मोठा वांटा आहे, हें सांगणें शक्य नाहीं. कदाचित् कित्येक वर्षें अंध मुलांच्यामध्यें काम केल्यामुळें त्यांच्या मनाचा कलच तसा झाला असेल. ह्या सहानुभूतीच्या बरोबरच बाईंना वर्णन करण्याची मोठी रंगदार शैली होती. कंटाळवाण्या गोष्टी त्या लवकर लवकर संपवतात आणि अभ्यासाच्या वेळीं प्रश्नांची सरबत्ती करून परवांतेरवां शिकविलेला धडा माझ्या लक्षांत आहे किंवा नाहीं हें पाहण्याची खटपटहि करीत नसत. विज्ञानासारखा रुक्ष विषयसुद्धां, त्यांतील तांत्रिक गोष्टी हळूहळू शिकवून त्यांनीं सोपा केला. प्रत्येक गोष्ट शिकवितांना बाई ती गोष्ट जणूं जिवंत करून दाखवीत आणि त्यामुळें त्यांनीं दिलेले धडे विसरणें मला शक्यच झालें नाहीं.

घरांत बसण्यापेक्षां कोवळ्या उन्हांनीं न्हाहून निघालेल्या रानांत बसणें आम्हांला पसंत पडे. तिथें बसून आम्हीं दोघींनीं खूप खूप वाचलें आहे. खूप अभ्यास केला आहे. मला वाटतें माझ्या त्या काळीं वाचलेल्या धड्यांना अजूनहि पाईन वृक्षाचा मंद मधुर सुगंध येतो आहे. पिकलेल्या रानटी द्राक्षांचा सुवास अजून तिथें घोटाळत आहे. प्रशस्त अशा रानटी 'ट्यूलीप' वृक्षाच्या छायेंत मला बाईंनीं शिकविलें कीं ह्या जगांतल्या प्रत्येक घटकापासून आपल्याला कांहींतरी शिकायचें आहे. तेथेंच प्रत्येक वस्तूमधला गोडवा आणि त्याची

उपयुक्तता मीं समजावून घेतली. खरें म्हणाल तर त्या रानांतील प्रत्येक वस्तु— कोणाची किलबिल, कुणाचा गुंजारव, कोणाचें गाणें, कुणाचा मोहोर आणि कुणाचा सुवास सारेच माझ्या शिक्षणांत भागीदार झाले आहेत. डराव डराव करणारे बेडूक, खेकडे आणि रातकिडे ह्यांना मी कित्येक वेळ-पर्यंत माझ्या हातांत धरून ठेवीत असे आणि त्यांना होणाऱ्या त्रासाला कंटाळून ते ओरडेपर्यंत त्यांना सोडीत नसे. छोटीं छोटीं कोंबडीचीं पिलें, रानटी फुलें, झाडाचा मोहोर आणि कच्चीं फळें, साऱ्यांनीं माझ्या शिक्षणाला हातभार लावलेला आहे. कापसाचीं बोंडें उमलून येतांना बाहेर पडणारा मऊ धागा आणि आंतलें टणक बीं मीं चांचपून पाहिलें आहे. शाळूच्या पिकांतून वाऱ्याच्या झुळकांनीं सोडलेले सुस्कारे ऐकलेले आहेत आणि तट्टावर बसून फिरतांना आम्हांला घसटून जाणाऱ्या लांब रेशमी पानांची आठवण मला अजून आहे. गवतांत चरणाऱ्या, माझ्या तट्टाला पकडतांच त्याचे ते मोठ्या नाखुषीनें खिंकाळणें; त्या लुसलुशीत गवताचा मऊ घास त्याच्या तोंडात देणें, अजूनहि मला आठवते आहे. घास द्यायला जातांच त्या तट्टाच्या श्वासाचा येणारा खुमासदार वास तर मला पक्का आठवतो आहे.

एखादे वेळीं भल्या पहाटे उठून गवतांवर आणि फुलांवर पडलेलें दाट दंव पाहण्याकरितां मी बागेंत जात असे. आपल्या हाताला होणारा गुलाबाचा मऊ स्पर्श आणि पहाट वाऱ्याच्या झुळकेनें लिलीचीं फुलें हालू लागलीं म्हणजे होणारी त्यांची मोहक हालचाल ह्यांमधला आनंद फार थोड्यांना माहीत असेल. एखादे वेळीं फुलें तोडतांना फुलांत लपलेला एखादा कीटक मला सांपडे आणि अचानक आलेल्या या संकटानें घाबरून जाऊन त्यानें केलेली पंखांची फडफड माझ्या हाताला जाणवत असे.

ह्याशिवाय जुलैच्या पहिल्या आठवड्यांत जिथें पिकलेलीं फळें सांपडत त्या कुंजामध्यें जाणें हा माझा वेडा नाद होता. तिथें मोठीं पिकलेलीं पीच फळें जणूं माझ्या हातांत आपोआप येत. अवखळ वारा झाडांतून बागडायला लागला म्हणजे सफरचंदे घरंगळून पायाशीं पडत. मी तीं फळें वेचून माझ्या परकरांत जमा करीत असे. त्या सफरचंदाच्या गुळगुळीत गालांवर माझा गाल टेकवीत असे आणि सूर्यप्रकाशांत किंचित् कढत झालेल्या त्या स्पर्शानें घरीं धांवत सुटे. त्या वेळचा आनंद काय वर्णावा !

पूर्वीच्या यादवी युद्धांत टेनेसी नदीच्या तीरावर सैनिक उतरविण्याकरितां एक तराफा केलेला होता. त्या तराफ्याकडे फिरावयास जाणें हाहि आमचा आवडता छंद होता. त्या जागीं बसून मी, आई आणि बाईनीं घटकान् घटका गमतींत वेळ घालविला आहे. तिथेंच खेळतां खेळतां मी भूगोलाचे धडे शिकले. गारगोट्या आणि दगड घेऊन त्यांचीं मी धरणें बांधीत असे. बेटें, तळीं, नदीचीं खोरीं, सर्व कांहीं आम्ही तयार करीत होतों. ह्या खेळाची मला अतिशय गंमत वाटावयाची. परंतु माझ्या स्वप्नांतहि कधीं आलें नाहीं कीं ह्या खेळांतून बाई मला भूगोलाचे धडे देत आहेत. बाईच्या सांगण्याकडे मी वाढत्या उत्सुकतेनें लक्ष देत असे. बाईनीं पृथ्वीचा हा प्रचंड गोल कसा आहे? त्यावर जळत राहणारे ज्वालामुखी कसे आहेत? पृथ्वीच्या पोटांत गाडल्या गेलेल्या प्रचंड शहरांची काय कहाणी आहे? बर्फाच्या नद्या आणि यासारखीच कितीतरी आश्चर्यकारक माहिती मला सहज बोलतां बोलतां सांगितली. माती कालवून त्यांतून उठावाचे नकाशे त्या करीत, पर्वत करीत आणि त्या नकाशाला स्पर्श करून मला डोंगर, दऱ्या आणि नद्यांचे मार्ग चटकन् समजावून देत. मला हा खेळ फार आवडे. परंतु पृथ्वीच्या भूपृष्ठाची कटिबंधानुसार केलेली वांटणी आणि दोन्ही ध्रुवांविषयीं माहिती ह्या बाबतींत मात्र मी गोंधळून जात असे. संत्रें, त्याच्या मधोमध असणारी काठी आणि संत्र्याभोंवतीं गुंडाळलेले दोरे ह्याच्या साहाय्यानें हा विषय मी शिकत असे. परंतु हें संत्र्यांचें उदाहरण मला इतकें खरें वाटे कीं आज सुद्धां समशीतोष्ण कटिबंधाचें नांव काढलें कीं संत्र्याभोंवतीं गुंडाळलेल्या त्या दोऱ्यांची आठवण मला होते. उत्तर ध्रुवांवर अगदीं वरती पांढरीं अस्वलें जात असतात असें मला कोणीं सांगितलें तर कदाचित् मला खरेंहि वाटायचा संभव आहे.

अंकगणित हा एकच विषय असा होता कीं ज्याची मला कधींच गोडी लागली नाहीं. पहिल्यापासूनच आंकड्यांच्या शास्त्रामध्यें मला रस वाटत नसे. तारेवर मणी अडकवून ते मोजावयास मला सुलिव्हॅन बाईनें शिकविलें होतें. किंडरगार्टन शाळेमध्यें असतात तशा काड्या जवळ ठेवून मी बेरीज आणि वजाबाकी करावयास शिकलें. परंतु पांच किंवा सहा आंकड्यापेक्षां जास्त आंकड्यांची बेरीज असली कीं मग मात्र माझा धीर सुटत असे. हा

धडा पुरा झाला कीं मला त्या दिवसापुरतें समाधान वाटे आणि मी माझ्या खेळगड्या बरोबर खेळावयास जाई.

अशाच खेळकर पद्धतीनें मी प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र शिकलें.

एके दिवशीं एका गृहस्थानें–त्यांचें नांव कांहीं केल्या मला आठवत नाहीं— कांहीं समुद्रफुलें, शिंपा व कांहीं शंख पाठविले. त्यांत सुंदर रंगविलेले शिंपले होते. पक्ष्याचीं बोटें उमटवलेले समुद्रकांठचे गुळगुळींत दगड होते. प्रवाळांचे उठावांवर रंगविलेले नमुने होते. हा सारा खजिना माझ्यापुढें येतांच पाण्याखालच्या इतिहासपूर्वकालीन विस्मयकारक जगाचें मला दर्शन झालें. सुलिव्हॅन बाई, त्या पूर्वकालीन–ज्यांची नांवे उच्चाराला सुद्धां कठीण आहेत–अशा प्राण्यांचीं वर्णनें सांगत आणि तीं ऐकतांना माझे हात पाय कांपायला लागत. पुरातन काळीं हे प्राणी जंगलें तुडवीत, वाटेंतल्या प्रचंड वृक्षांच्या फांद्या तोडीत आणि त्या खात, कसे गेले आणि एका अनोळखी युगांत त्या प्राणिवंशाचा कसा अज्ञात शेवट झाला हेंहि त्या सांगत. कित्येक दिवसपर्यंत माझ्या स्वप्नांत हे प्रचंड आणि भयंकर प्राणी येत. सध्यां असलेल्या सुंदर जगाला त्या काळाची उजाड पार्श्वभूमि लाभल्यामुळेंच ‘ आजचें ’ महत्त्व मला अधिक वाटतें. म्हणूनच सूर्यप्रकाश, गुलाबाचीं फुलें आणि माझ्या तट्टाच्या खुराची टपटप ह्यांच्या चौकटींतील “आत्तांच्या” वेळेमध्यें मी अधिक रंगून जातें.

दुसऱ्या एका वेळीं मला अतिशय सुंदर शिंपा देण्यांत आलेल्या होत्या, आणि लहान मुलांच्या औत्सुक्याने आणि आनंदानें मी त्या शिंपल्यांची हकीकत ऐकली होती. छोटयाशा एका कीटकानें आपल्याला राहण्यासाठीं तें चकचकीत घर कसें बांधलें होतें आणि शांत रात्रीं जेव्हां लाटाहि हालत नसतील अशा वेळीं हिंदी महासागरावर, मोत्याचें जहाज करून हे कीटक कसे तरंगत असतील त्याचें मनोरंजक वर्णन ऐकलें होतें. समुद्रांत वाढणाऱ्या मोतीं, शिंपा, वनस्पति व प्राणी ह्या साऱ्या समुद्राच्या लेकरांची मी खूप माहिती घेतली होती. त्यांचें जीवन आणि संवयी अभ्यासिल्या होत्या. उसळणाऱ्या लाटांच्या मधोमध पॅसिफिक महासागरांत लहान समुद्रकीटकांनीं आपल्या अंगांतून निर्माण होणाऱ्या द्रव्यांनीं एक बेट कसें निर्माण केलें आहे, दुसऱ्या एका जातीच्या कीटकांनीं कित्येक

ठिकाणीं चुनखडीचे डोंगर कसे रचले आहेत हेंहि मी ऐकलें. बाईनीं ''चेम्बर्ड नॉटिलस'' वाचून दाखविलें आणि हें कीटक ज्याप्रमाणें शिंपांचें घर बांधतात, आपली वाढ करतात, त्याचप्रमाणें मानवी मनाची वाढ कशी होते हें मला समजावून सांगितलें. ज्याप्रमाणें हा कीटक आपण खाल्लेली पाण्यांतील प्रत्येक वस्तु, त्याचें रूप बदलून आपल्या अंगाचाच एक भाग बनवितो, त्याचप्रमाणें आपण थोडेथोडें ज्ञान ग्रहण करून त्यांत थोडासा बदल करून तें आपल्यांतच सामावून घेतो आणि शेवटीं त्यांतूनच आपल्याला विचारांचे मौक्तिक मिळतात.

रोपटीं कशीं वाढतात हाहि एक मला स्वतंत्र धडाच होता. आम्ही एक लिलीचें रोप विकत आणले आणि तें कुंडींत लावून खिडकींत ठेवलें. लवकरच हिरव्या टोंकदार कळ्या उमलूं लागल्या. त्या नाजूक आणि बोटासारख्या लांब पाकळ्या हळूच उघडूं लागल्या. जणूं आपल्या अंतरंगांत लपविलेली माधुरी प्रगट करावयास त्या लाजत होत्या. अर्थातच एकदां उमलावयास सुरुवात झाल्यावर फूल लवकर उमललें परन्तु त्यांतहि एक पद्धत होती. साऱ्या कळयांमध्यें एक कळी मोठी आणि इतरांपेक्षां सुंदर असतेच. ती कळी आपल्या भोंवतीचें आवरण मोठ्या दिमाखानें दूर करते. जणूं कांहीं त्या मऊ रेशमी पाकळयांना ठाऊकच असते, कीं ती कळी लिलीच्या साऱ्या फुलांची अनभिषिक्त राणी आहे. तिच्या इतर लाजऱ्या बहिणी आपल्या गोड चेहऱ्यावरचीं हिरवीं आवरणें लाजत लाजत दूर करीत. शेवटीं सारें रोप सौन्दर्यानें आणि सुगंधानें डोलूं लागे.

एकदां खिडकींत ठेवलेल्या कांचपात्रांत अकरा छोटेछोटे बेडूक होते. त्यांचेविषयीं मला अत्यंत कुतूहल होतें. त्या भांड्यांत हात घातल्याबरोबर ते झेप घेऊन धावूं लागत त्यांची मला फारच गंमत वाटे. मी त्यांना पकडून माझ्या तळहातातून उडया मारावयास लावी. एके दिवशीं त्यांतला एक अतिउत्साही बेडूक त्या कांचपात्राच्या बाहेर पडला आणि त्यानें जमिनीवर उडी मारली. जमिनीवर तो मेल्यासारखाच दिसत होता. परंतु त्याच्या वळवळणाऱ्या शेपटीवरूनच तो जिवंत असल्याचें कळे. त्याला परत पाण्यांत सोडल्याबरोबर तो तीर मारून तळाशीं गेला आणि आनंदानें भांडयांत गोल गोल पोहूं लागला. तो बेडूक धाडसानें उडी मारून बाहेर आला

होता. थोडा वेळ त्यानें हें बाहेरचें जग पाहिलें होतें. पण बहुधा शेवटीं आपल्या कांचेच्या सुंदर घरांतच राहणें त्यानें पसंत केलें. त्या भांड्यांतील पाणवनस्पतींच्या आश्रयानें राहणें आणि तिथेंच मोठें होणें त्याला बाहेरच्या जगापेक्षां पसंत असावें. त्या भांड्यांतल्या छोट्या बागेच्या टोंकाला तो गेला आणि तिथें बसून त्यानें आपलें गाणें गाऊन आमची करमणूक केली.

अशा रीतीनें प्रत्यक्ष प्राण्यांच्यापासूनच मी शिकत गेलें. सुरुवाती-सुरुवातीला मी म्हणजे सुप्त आकांक्षांचा आणि अपेक्षांचा एक थंड गोळाच होते. परंतु सुलिव्हॅन बाईंनीं माझ्या अंगांतले गुण प्रकट केले आणि वाढीस लावले. त्या आल्याबरोबर माझ्याभोंवतीं प्रेम आणि आनंदाचें वातावरण पसरलें आणि भोंवतालच्या जीवनाचा अर्थ मला कळूं लागला. भोंवतालच्या जगांतल्या प्रत्येक वस्तूंतील सौंदर्य मला दाखविण्याची कोणतीहि संधि त्यांनीं दवडली नाहीं. माझें आयुष्य, आचार आणि विचार अधिक मधुर आणि अधिक उपयुक्त करण्याचा निदिध्यास सुद्धां त्यांनीं केव्हांहि सोडला नाहीं.

माझें प्राथमिक शिक्षण इतकें सहज आणि इतकें मनोरंजक करण्याचें सारें श्रेय सुलिव्हॅन बाईंची प्रतिभा, अपार सहानुभूति आणि प्रेमळ पद्धति यांनाच आहे. माझें सारें शिक्षण मला सोपें वाटलें. याचें कारण कोणत्या वेळीं तें मला जास्तींत जास्त समजेल याचा विवेक बाईंनीं केला. बाईंना असें वाटे कीं सुरुवातीला मुलांचें मन एखाद्या उथळ ओढ्यासारखें असतें. शिक्षणाच्या खडकाळ मार्गावरून नाचत–खिदळत तो ओढा जात असतो. वाटेंत कोठें कोठें त्यांत एखाद्या फुलाचें, एखाद्या झुडपाचें तर क्वचित् एखाद्या ढगाचें प्रतिबिंब पडतें. हा ओढा पुढें विस्तार पावून त्याची खोल नदी होण्या-करितां त्याला डोंगरावरून पाझरणारे झरे आणि जमिनींतून झिरपणारे प्रवाह मिळावयास हवेत. अशा रीतीनें जर त्या ओढ्याचें एखाद्या नदीच्या प्रशांत पात्रांत रूपांतर झालें तरच त्याच्या नीतळ पृष्ठभागावर डोकावणाऱ्या डोंगराचें, गर्द झाडांच्या सावल्यांचें वरच्या निळ्या आभाळाचें आणि त्याचप्रमाणें चिमुकल्या फुलांचेसुद्धां प्रतिबिंत पडूं शकतें. बाईंनीं माझ्या मनाला शिक्षणाच्या या वाटेवरून नेऊन, पुढें त्याला ज्ञानाचे झरे लाभून विस्तार व्हावा; अशा रीतीनें माझ्या अभ्यासाचें मार्गदर्शन केलें.

कोणताहि शिक्षक मुलाला वर्गांत नेऊं शकतो. पण त्याला शिकायला लावणें प्रत्येकास शक्य होतेंच असें नाहीं. कोणत्याहि विद्यार्थ्याला आपल्याला काय शिकावें कसें शिकावें, ह्याचें स्वातंत्र्य आहे असें वाटलें तरच तो आनंदानें अभ्यास करूं शकतो. एखादा अवघड विषय समजावून घेतांना किंवा पाठ्य पुस्तकांतला कठीण विषय वाचतांना तो जर मनाचा निश्चय करून हंसत खेळत वाचूं लागेल, अवघड धडा शिकल्यावर होणाऱ्या आनंदाची किंवा चुकल्यावर होणाऱ्या निराशेची त्याला योग्य ती जाणीव निर्माण झाली असेल तरच तो यशस्वी ठरूं शकेल.

सुलिव्हॅन बाई आणि मी मनानें इतक्या एकत्र आलेलों आहोंत कीं मला माझ्या मनानें वेगळा असा विचार करतांच येत नाहीं. मला जें सौंदर्य प्रतीत होतें, त्याचें कारण माझ्या जन्मजात प्रवृत्तींत किती आहे आणि सुलिव्हॅन बाईच्या शिकवणुकींत किती आहे हें सांगणें फार कठीण आहे. मला असें वाटतें कीं बाईचें जीवन माझ्या जीवनांतच मिसळलेलें आहे आणि त्यांच्या पावलावर पाऊल ठेवूनच मी जीवन जगतें आहे. माझ्यामध्यें जें जें कांहीं चांगलें आहे तें तें सारें त्यांचें आहे. माझ्या व्यक्तिमत्त्वामध्यें असा एकहि गुण नाहीं, असें एकहि ध्येय नाहीं किंवा असा एकहि आनंद नाहीं कीं जो आपोआप फुलून आला आहे. साऱ्या विकसनाचें सारें श्रेय बाईच्या अमृत-स्पर्शाला आहे. त्यामुळेंच माझ्या जीवनाची शिळा उद्धरली गेली.



## — ८ —

सुलिव्हॅन बाई आल्यानंतरचा पहिला नाताळ अगदीं अविस्मरणीय आहे. घरांतल्या प्रत्येक माणसानें मला एकेक भेट देऊन चाकित करण्याचें ठरविलें होतें. पण खरी गंमत तर हीच आहे कीं मी आणि सुलिव्हॅन बाईनींसुद्धां घरांतल्या प्रत्येक माणसाला भेट देण्याकरितां कांहीं कांहीं वस्तु तयार केल्या होत्या. त्या वस्तु कोणत्या आहेत हें गुप्त ठेवल्यानें त्या भेटींच्यामुळें होणारा आनंद कांहीं वेगळाच प्रकारचा होता. माझी उत्सुकता आणखी वाढवावी म्हणून माझ्या मैत्रिणी त्या वस्तूंबाबत कांहींतरी अर्धवट सूचना देत किंवा माझ्या हातांत अर्धेमुर्धे वाक्य खुणांनीं करीत. मला भेट येणाऱ्या वस्तु काय असाव्यात ह्याचा अंदाज करायचा खेळ, मी आणि बाई कित्येक वेळ-पर्यंत खेळत होतों आणि कोणत्याहि धड्यापेक्षां ह्या धड्यांतूनच मी भाषेचा पुष्कळसा उपयोग शिकलें. दररोज संध्याकाळीं धगधगणाऱ्या शेकोटीभोंवतीं बसून आम्ही हा खेळ खेळत असूं आणि जसजसा नाताळ जवळ येत चालला तसतशी ह्या खेळांतील गंमत वाढतच गेली.

नाताळाच्या पूर्वरात्रीं शाळेंतल्या मुलांनीं नाताळाचें झाड तयार केलें होते. तेथें मला बोलावण्यांत आलें. वर्गाच्या मध्यभागीं मेणबत्त्या यांची रोषणाई केलेलें तें झाड त्या मंद प्रकाशांत चमकत होतें. त्या झाडाच्या फांद्यांना आश्चर्यकारक अशा सुंदर वस्तूंचीं फळें लटकलीं होतीं. तो क्षण माझ्या सर्वोच्च आनंदाचा होता. मी नाचलें. त्या झाडाभोंवतीं आनंदानें फेर धरला. तेथें जमलेल्या प्रत्येक मुलाला भेटीदाखल एकेक वस्तु मिळावयाची आहे हें समजतांच माझा आनंद दुणावला आणि त्या आतिथ्य-शील लोकांनीं माझ्या हस्तें त्या वस्तु देण्याचें ठरविलें. ह्या वस्तु देण्याच्या आनंदाच्या भरांत मला मिळालेल्या भेटी मी विसरूनच गेले. परंतु त्या मिळण्याची वेळ येतांच माझी उत्सुकता अगदीं कळसाला पोंचली. माझी खात्री होती कीं ज्याचा चुटपुटता उल्लेख माझ्या मैत्रिणींनीं केला होता, त्या

वस्तु मला खात्रीनें मिळणार नाहींत आणि उलट बाईनीं मला सांगितलें होतें कीं मला मिळावयाच्या गोष्टी त्याहिपेक्षां सुंदर होत्या. अर्थात् त्यांनीं मला असेंहि सांगितलें कीं शाळेंत मिळालेल्या वस्तूंवर आतां मी संतुष्ट राहावें म्हणजे दुसरे दिवशीं पहांटे ठरलेल्या वस्तु आपोआप मिळतील.

त्या रात्रीं माझ्या खाटेला पायमोजा टांगून आणि झोंपावयाचें सोंग घेऊन किती वेळ तरी मी जागी होतें. नाताळचे आजोबा "सांता क्लॉस" आल्यानंतर काय करतात हें मला बघावयाचे होतें. पण शेवटीं शाळेंत मिळालेली नवी बाहुली आणि पांढरें अस्वल तसेंच हातांत असतांना मला नकळत झोंप लागली. दुसरे दिवशीं सकाळीं नाताळच्या ललकाऱ्यांनीं मीच साऱ्या लोकांना उठविलें. मला मिळालेल्या भेटी केवळ पायमोज्यांतच होत्या असें नाहीं, तर टेबलावर, खुर्चीवर, दारांत, खिडकींत सगळीकडे ठेवलेल्या होत्या. मला भेट आलेल्या, सुंदर कागदांत गुंडाळलेल्या त्या वस्तूंना अडखळल्यावांचून खोलींत चालणें मला अशक्य झालें होतें. परंतु बाईनीं ज्या वेळेला एक छोटासा पोपट मला भेट म्हणून दिला त्या वेळीं माझ्या सुखाचा प्याला ओतप्रोत भरला आहे असें मला वाटलें.

त्या पोपटाचें नांव "टिम्". तो इतका माणसाळला होता कीं तो माझ्या बोटांवर बसून माझ्या डाव्या हातांत ठेवलेली साखर लावलेली चेरीचीं फळें खात असे. त्या पोपटाची सर्व तऱ्हेनें काळजी कशी घ्यायची हें मला बाईनीं शिकविलें होतें. रोज सकाळीं न्याहारी झाल्यावर मी त्याच्या आंघोळीची तयारी करून त्याचा पिंजरा स्वच्छ करीत असे. पिंजऱ्यांतील भांड्यांत दाणे टाकीत असे. पाण्याची वाटी भरून ठेवीत असे. आणि कणसाचा एखादा तुरा पिंजऱ्यांतल्या झोपाळ्यासमोर टांगून ठेवी.

एकदां सकाळीं खिडकींत त्याचा पिंजरा चुकून उघडा ठेवला गेला आणि मी परत आलें तों एक भलें मोठें मांजर मला घसटून गेलें. पहिल्या प्रथम काय झालें ह्याची मला कल्पनाच आली नाहीं, परंतु जेव्हां मी पिंजऱ्यांत हात घातला तेव्हां हातांना 'टिम्चे' मऊ पंख लागेनात, किंवा आपल्या पंजांनीं तो माझें बोट पकडेना. त्या वेळीं माझ्या लक्षांत आलें कीं तो गोड गाणारा पोपट मला पुन्हा कधींहि दिसणार नाहीं.



## —१—

१८८८ सालीं आम्हीं बॉस्टनला गेलों ही त्यानंतरची महत्त्वाची घटना. “ बॉस्टनला जाण्याची आम्हीं करीत असलेली तयारी. मी, आई आणि बाई आम्हीं कसे निघालों, आमचा तो, प्रवास आणि अखेर बॉस्टनला येणें” साऱ्या साऱ्या गोष्टी मला कशा काल घडल्यासारख्या आठवत आहेत. दोन वर्षांपूर्वीं आम्ही बाल्टिमोरला गेलों होतों. त्यापेक्षां हा प्रवास किती वेगळा होता. त्या वेळीं मी संतापी, हट्टी आणि माझ्या मनोरंजनाकरितां आगगाडींतल्या सर्वांनीं माझ्याकडेच लक्ष दिलें पाहिजे असा आग्रह धरणारी तापट मुलगी होतें. परंतु या वेळीं मी बाईंच्या शेजारीं गुपचुप बसून राहिलें होतें. बाईंना खिडकींतूनच जें जें कांहीं दिसत होतें तें तें वर्णन करून त्या मला सांगत होत्या. सुंदर टेनेसी नदी, लांबवर पसरलेलीं कापसाचीं शेतें, डोंगर–रानें, स्टेशनवर भेटणारे हंसत खेळत जाणाऱ्या निग्रो लोकांचे थवे, गाडींत जाणाऱ्या माणसांना त्यांचे निरोप देणें, आणि गाडींत साखरगोळे आणि मिठाई विकणें; साऱ्यांचें मोठें मिठास वर्णन बाई करीत होत्या. आगगाडींत माझ्या समोरच्या जागेवर माझी मोठी बाहुली बसविलेली होती. तिचें नांव ‘नान्सी’. तिनें अंगांत नवा पोषाख आणि नवें गलुतें घातलें होतें आणि मण्यांच्या डोळयांतून ती माझ्याकडे टक लावून पाहात होती. जेव्हां बाईंच्या बोलण्याकडे माझें लक्ष लागेनासें होई, त्या वेळीं मला एकदम नान्सीची आठवण होई. मी तिला उचलून कडेवर घेई. आणि मग तिला थोड्या वेळानें झोंप लागली असें समजून माझें लक्ष परत बाईंच्या बोलण्याकडे लावत असे.

नान्सीचा उल्लेख करण्याची पुन्हा मला संधि येईल असें मला वाटत नाहीं आणि म्हणून बॉस्टनला पोहोंचल्यावर तिला आलेला एक दुःखद अनुभव

मी आतांच सांगून टाकतें. प्रवासानें माझी नान्सी धुळीनें माखली होती. तिला आवडत नसतांनासुद्धां मातीचा लाडू करून मी तिला खावयास घातल्याकारणानें ती चिखलानें माखलेली होती. पर्किन्स संस्थेच्या धोबिणीनें तिला आंघोळ घालण्याकरितां गुपचूप नेलें. परंतु बिचाऱ्या नान्सीला ती आंघोळ फारच बाधली. कारण पुन्हा मी नान्सीला पाहिलें तों ती भिजल्यामुळें कापसाचा लोळागोळाच झाली होती. खरें म्हणाल तर माझ्याकडे रागावून बघणाऱ्या त्या मण्यांचे डोळे नसते तर मीं तिला ओळखलें सुद्धां नसतें.

जेव्हां आमची गाडी बॉस्टन स्टेशनांत शिरली त्या वेळीं जणूं कांहीं एखादी परिकथा खरी झाल्यासारखें मला वाटत होतें. "कोणी एके काळीं" असें जें शहर होतें तें प्रत्यक्षांत समोर आलें होतें. 'दूर देशाचे शहर' म्हणून ज्याचें नांव मी फार दिवस ऐकत होतें त्या बॉस्टनला खरोखर मी आलें होतें.

पर्कीन्स अंधशाळेमध्यें आम्ही आल्यापासून थोडया दिवसांतच तेथल्या आंधळ्या मुलामुलींची आणि माझी दोस्ती जमली. त्यांना हातावर खुणा काढण्याची भाषा कळते हें समजतांच मला मनस्वी आनंद झाला. माझी मातृभाषाच ती आणि इतरांशीं त्या भाषेंत बोलतांना होणारा आनंद काय वर्णावा ? तोंपर्यंत मी एखाद्या परदेशी माणसासारखी दुभाष्यामार्फत बोलत असायची परंतु ज्या शाळेंत लॉरा ब्रिग्मिन शिकली त्या शाळेंत आल्यापासून मी माझ्या मायदेशीं आल्यासारखेंच वाटत होतें. प्रथम प्रथम हे माझे नवे मित्र आंधळे आहेत हें लक्षांत यावयास वेळ लागला. मी आंधळी आहे हें मला ठाऊक होतें. परंतु माझ्या भोंवतीं जमणारी सारीं उत्सुक आणि प्रेमळ मुलें आंधळी आहेत ह्यावर माझा विश्वासच बसेना. माझ्या हातांवर हात ठेवून तीं बोलत आणि बोटानें चांचपून पुस्तकें वाचत हें कळल्यावर मला अत्यंत खेद झाला. अर्थात् मला ही कल्पना पूर्वी देण्यांत आली होती. मी स्वतः आंधळी, मुकी आणि बहिरी आहें ह्याचीहि जाणीव मला होती. परंतु का कोणास ठाऊक, ज्या अर्थी त्यांना ऐकूं येतें त्या अर्थी त्यांना दुसरी दृष्टि असावी, असें मला वाटे आणि म्हणूनच पहिलें, दुसरें, तिसरें—मला भेटलेलें प्रत्येक मूल हें आपल्या दृष्टीला मुकलें होतें, हें कळतांच माझें मन दुःखानें भारावून गेलें. परंतु ती मुलें इतकी समाधानी आणि आनंदी होतीं कीं त्यांच्या संगतीमध्यें मी माझें दुःख केव्हाच विसरून गेलें.

त्यांच्यांत एक दिवस राहतांच त्या नव्या वातावरणाशीं मी समरस झालें. आणि जसजसे दिवस जाऊं लागले तसतसें त्या शाळेंत नवे अनुभव घेण्याची, राहण्याची माझी इच्छाहि वाढूं लागली. बॉस्टन पाहिल्यानंतर कांहीं पाहिल्यासारखें उरलें आहे हें मला कधींच पटलें नाहीं. कारण जीवनाची सुरुवात आणि शेवट म्हणजेच बॉस्टन असें मला वाटत होतें.

आम्ही बॉस्टनला असतांनाच 'बंकर' टेकडीवर गेलों होतो. तेथें मी इतिहासाचा धडा शिकलें. ज्या जागीं आम्हीं उभ्या होतों, त्याच ठिकाणीं मर्द पुरुषांनीं लढतांना आपले देह ठेवले होते ह्या कल्पनेनें मी रोमांचानें थरारून गेलें. त्या स्मारकाच्या पायऱ्या मोजत मोजत मी वर चढलें आणि त्या पायऱ्या मोजत जसजशी मी वर जात होतें, तसतसें खुळ्यासारखें मनांत येई कीं त्याच पायऱ्यावर चढून ते शिपाई वर गेले असतील आणि खालीं जमिनीवर असलेल्या शत्रूला त्यांनीं गोळ्या घातल्या असतील.

दुसरे दिवशीं आम्ही बोटींतून 'प्लायमाऊथला' गेलों. समुद्रावरची ती माझी पहिलीच सफर. वाफेच्या बोटींतून केलेला मीं पहिलाच प्रवास. आपल्या गतीनें ती सारी बोट जणूं जिवंत झाली होती. बोटीचें यंत्र सुरू होतांच जो आवाज होऊं लागला त्यामुळें ढग गडगडत आहेत अशा कल्पनांनीं मी रडूं लागलें. मला वाटलें कीं आज कांहीं आमची सफर पुरी होत नाहीं. ज्या खडकावर अमेरिकेला आलेले पहिले प्रवासी उतरले तो खडक पाहण्याची मला फार उत्सुकता होती. त्या खडकाला मीं स्पर्श केला आणि कदाचित् त्यामुळेंच अमेरिकेकडे निघालेले ते यात्रेकरूं, वाटेंत त्यांना भोगाव्या लागणाऱ्या यातना आणि त्यांचें थोर शौर्य ह्याच्या साऱ्या गोष्टी मला खऱ्याखुऱ्या आणि जिवंत वाटूं लागल्या. तेथल्या एका मायाळू गृहस्थानें त्या खडकाची एक प्रतिमा मला बक्षीस दिली होती. ती हातांत धरून त्यावरच्या रेषारेषांवर मीं हात फिरविला आहे. मधोमध पडलेली फट आणि त्यांवरची '१६२०' हीं अक्षरें बोटानें चाचपून पाहिलीं आहेत आणि मनांतल्या मनांत अमेरिकेला येणाऱ्या त्या पहिल्या लोकांच्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टी पुन्हा पुन्हा आठवल्या आहेत.

त्यांच्या ह्या धाडसी कामगिरीमुळें माझें बालमन आणि कल्पनाशक्ति थक्क होऊन जाई. परदेशांत जाऊन तेथें घर करणाऱ्या इतर माणसापेक्षां ते जास्त

शूर आणि उदार होते, असें वाटून माझीं ध्येयस्वप्नें त्यांच्या भोंवतीं रुंजी घालूं लागत. मला असें वाटे कीं आपल्या स्वतःच्या व आपल्या बांधवांच्या स्वातंत्र्याची तीव्र इच्छा त्यांच्या मनांत होती. कित्येक वर्षांनंतर त्यांनीं केलेल्या छळांची लाजिरवाणी वर्णनें मी वाचली तेव्हां माझें मन चकित व निराश झालें. जरी त्यांचें धैर्य आणि वैभव यांची आपण वाखाणणी केली, त्यांनींच आम्हांला ही सुंदर मायभूमि मिळवून दिला हें जरी खरें असलें तरी त्यांच्या ह्या छळवादामुळें आपल्याला मान खालीं घालावी लागते.

बॉस्टनला जमलेल्या ऋणानुबंधामध्यें विल्यम इंडिकॉट आणि त्यांची मुलगी, ह्यांचा जरूर उल्लेख करावयास हवा. त्यांच्या उदार अंतःकरणामुळें व स्नेहामुळेंच निर्माण झालेल्या बीजाला आज मधुर आठवणींचीं गोमटीं फळें आलीं आहेत. बिव्हर्ली शेतावरच्या त्यांच्या घरीं आम्हीं एकदां गेलों होतों. त्यांच्या गुलाबाच्या बागेंतून आम्ही कशा फिरलों ! त्यांचें कुत्रे–भला मोठा 'लिओ' आणि कुरळया केसाचा आणि लांब कानाचा 'फ्रिट्स' आम्हांला भेटावयास कसे धावले; त्यांच्या अतिचपल अशा 'निमरोड' नांवाच्या घोड्यानें मूठभर साखरेच्या आशेनें आणि पाठीवर थाप मारावी ह्या इच्छेनें माझ्या ओंजळींत तोंड कसें खुपसलें ह्या साऱ्याची आठवण अगदीं ताजी आहे. तिथल्या समुद्रकिनाऱ्यावर पहिल्या प्रथम मी वाळूंत खेळलें. ती टणक परंतु गुळगुळीत वाळू, ब्रुस्टरमधल्या सैल, टोंकदार आणि शंख, शिंपले मिसळलेल्या वाळूपेक्षां अगदीं वेगळी होती. युरोपला जाणारीं प्रचंड जहाजें बॉस्टनहून कशी येतात ह्याचें वर्णन माझ्यापाशीं श्री.इंडिकॉट यांनीं केलें. त्यानंतर कैक वेळां मी त्यांना भेटलें आहे आणि प्रत्येक वेळीं त्यांना आपल्या स्नेहाचा भरपूर लाभ दिलेला आहे. आणि खरोखर बॉस्टनला जेव्हां मी उदार अंतःकरणाचें शहर असें म्हणतें त्या वेळीं मला त्यांचीच प्रथम आठवण होत असते.



# — १० —

पर्कीन्स अंधशाळा उन्हाळ्याच्या सुट्टीसाठीं बंद होण्यापूर्वीं मी आणि सुलिव्हॅन बाई ह्यांनीं, ब्रुस्टरला आमच्या स्नेही, सौ. हॉकिन्स ह्यांच्याकडे जाऊन सुट्टी घालवावी असें ठरवलें. मी लहानपणापासून समुद्राबद्दलच्या कित्येक विलक्षण गोष्टी ऐकल्या होत्या आणि ब्रुस्टरला केपकोड येथें राहावयाचें म्हणतांच माझ्या मनांत आनंदाच्या लाटा उसळूं लागल्या.

त्या उन्हाळ्यांतली माझी सर्वांत चांगली आठवण समुद्राची आहे. मी लहानपणापासून अगदीं आंतल्या प्रदेशांत राहत असल्यामुळें समुद्राची खारी हवा मला ठाऊकच नव्हती. परंतु 'आपलें जग' या नांवाचें भलेंमोठें पुस्तक मीं वांचलें होतें. त्या पुस्तकांत समुद्राविषयीं केलेल्या वर्णनामुळें माझें मन विस्मयचकित झालें होते आणि त्या प्रचंड महासागराला स्पर्श करावा, त्याची महान् गर्जना ऐकावी अशी आतुरता मला लागून राहिलेली होती. माझी ही इच्छा फलद्रूप होणार हें कळतांच माझें मन आनंदानें उड्या मारूं लागलें.

बाईच्या मदतीनें मी पोहावयाचे कपडे घालून समुद्रकांठच्या उबदार वाळूवर धांवत गेलें आणि कसलीहि भीति न बाळगतां समुद्राच्या थंडगार पाण्यांत एकदम उडी घेतली. हत्तीसारख्या त्या प्रचंड लाटा हेलकावत होत्या आणि फुटत होत्या. माझ्याभोंवतीं घुसळत जाणाऱ्या पाण्याच्या प्रचंड वेगानें मला झालेला आनंद कसा सांगूं? परंतु एकाएकी त्या तंद्रीची जागा भयानें घेतली, कारण माझे पाय खडकावर टेकले न टेकले तोंच पाण्याचा प्रचंड झोत माझ्या डोक्यावरून गेला. कोणतातरी आधार शोधावा म्हणून मी वेडेवाकडे हात करीत होते, पण माझ्या हाताला

पाण्याखेरीज कांहींच लागेना. फार तर त्या लाटांनीं माझ्या तोंडावर उधळलेलें शेवाळ माझ्या हाती लागे. माझे सारे प्रयत्न निष्फळ झाले. त्या लाटा जणूं माझ्या जिवाचा खेळ करीत होत्या. एका लाटेवरून दुसऱ्या लाटेकडे मी फेकली जाई. आणि जणूं ह्या क्रूर विनोदामुळें समुद्र खदखदून हंसे. सारेंच फार भयंकर होते. आपल्या चांगल्या स्थिर पृथ्वीचा आधार माझ्या पायाखालून गेला होता आणि मला कोंडून टाकणाऱ्या त्या लाटांच्या विचित्र वातावरणांत जणूं हवा, ऊब, प्रेम, जीवन, कशालाच शिरकाव नव्हती. शेवटीं एकदां या खेळाला कंटाळून समुद्रानें मला उचलून किनाऱ्यावर फेकून दिले. दुसऱ्या क्षणीं मीं बराच वेळ सुखावलें आणि माझ्या मनावरची भयाची छाया कमी होतांच मी बाईंना पहिला प्रश्न विचारला, "या पाण्यांत इतकें मीठ कोणीं हो घातले ?"

ह्या पहिल्या अनुभवानंतर मात्र मला पाण्याचें भय वाटूं लागलें. पण ते कमी झाल्यानंतर माझे पोहावयाचे कपडे घालून मी भल्या मोठ्या खडकांवर बसे. लाटांमागून लाटा येऊन त्या खडकावर फुटत. आणि मला तुषारांनीं झांकून टाकीत. आपल्या प्रचंड शक्तीनें किनारा तुडवायच्या इच्छेनें लाटा गर्जत येत आणि त्याबरोबर बारीक सारीक गारगोट्या खुळखुळत खडकाकडे धांवत. सारा किनारा जणूं त्या प्रचंड उत्पातानें फुटून निघाला असें वाटे. आणि त्या प्रलयामुळें सारी हवा स्पंदित होऊन थरथरल्यासारखी वाटे. किनारा फोडून काढणाऱ्या ह्या लाटा सपाट्यानें मागें परतत आणि पुन्हां गोळा होऊन अधिक वेगानें उड्या मारीत. मी चिमुकली मुलगी मात्र त्या खडकाला चिकटून, त्या उन्मादांत धुंद होऊन बसे आणि आपल्या अंगावर धावणाऱ्या त्या लाटांचा धक्का आणि त्यांची गर्जना यांचा अनुभव घेई.

समुद्रकिनाऱ्यावर मला कंटाळा आला असें कधींच झालें नाहीं. तेथील जिवंत आणि मोकळी हवा, मन शांत करणाऱ्या अंगाई–गीताप्रमाणें मला वाटे. शंख, गोटे, शेवाळ आणि त्यांत राहणारे छोटे छोटे कीटक ह्याविषयींचें माझें आकर्षण कधींच कमी झालें नाहीं. एके दिवशी किनाऱ्यावरच्या वाळूंत ऊन खात पडलेल्या एका विचित्र प्राण्याला सुलिव्हॅन बाईंनीं पकडलें आणि माझें लक्ष त्याकडे वेधलें. तो एक प्रचंड खेकडा

होता. मीं पाहिलेला तो पहिलाच खेकडा. मीं त्याच्या अंगाला स्पर्श केला. आपले घर पाठीवर घेऊन तो फिरतो ही कल्पनाहि मला मोठी विलक्षण वाटली. माझ्या मनांत असें आलें कीं ह्याला आपण घरीं नेऊन पाळावा. दोन्ही हातांनीं त्याची शेपटी धरून त्याला मी घरीं आणला. माझ्या या कामगिरीचे माझें मलाच फार कौतुक वाटलें, कारण तो खेकडा चांगला वजनदार होता, आणि त्याला अर्धा मैल ओढत आणणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हती. आमच्या विहिरीजवळच्या, पाण्यानें भरलेल्या छोट्या खळग्यांत बाईनीं त्याला सोडेपर्यंत मी बाईचा पिच्छा सोडला नाहीं. मला वाटलें कीं तो त्या खळग्यांत सुरक्षित राहील. पण दुसरे दिवशीं सकाळीं त्याला पाहावयास मी गेलें तो काय तों केव्हांच नाहींसा झाला होता. तो कुठें गेला किंवा कसा पळाला ह्याची कोणालाच माहिती नव्हती, परंतु त्यामुळें माझी मात्र पार निराशा झाली. पुढें मात्र माझी खात्री झाली कीं त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्याला समुद्रांतून बाहेर काढून त्या खळग्यांत ठेवणें फार क्रूरपणाचें होतें आणि म्हणूनच तो परत समुद्रांत गेला असेल अशा कल्पनेनें मला समाधान वाटलें.



# — ११ —

हिंवाळ्याच्या खूप मजेदार आठवणी घेऊन आम्ही आमच्या दक्षिणेंतल्या घराकडे परतलों. आम्हीं उत्तर अमेरिकेत केलेल्या त्या प्रवासांत आम्हांला इतके विविध आणि विलक्षण अनुभव आले कीं त्या प्रवासाची आठवण होतांच माझें मन आश्चर्यानें भारावून जातें. जणूं कांहीं माझ्या जीवनाची सुरुवात त्या प्रवासानें झालेली होती. एका सुंदर आणि नव्या जगाचा खजिना कोणीतरी माझ्या पायातळीं ओतला होता प्रत्येक वेळीं मिळणाऱ्या नव्या माहितीबरोबर मी नवा आनंद लुटत होतें. जणूं प्रत्येक वनस्पतीचें, व प्राण्याचें जीवन मीच जगलें होतें. एक क्षणभरसुद्धां मी निश्चल नव्हतें. आयुष्यांतल्या साऱ्या घडामोडी एका दिवसांत घडवून मरून जाणाऱ्या कीटकाप्रमाणें त्या थोड्या काळांत माझ्या जीवनांला प्रचंड गति लाभलेली होती. माझी कित्येक जणांशीं ओळख झाली. कित्येकांनीं माझ्या हातांत खुणा करून माझ्याशीं बोलून सहानुभूति दाखविली, विचारांची देवघेव केली जणुं मी म्हणजे एक जिवंत आश्चर्यच होतें. माझें मन आणि इतर लोकांचीं मनें यांच्यामध्यें आजपर्यंत पसरलेलें वाळवंट गुलाबपुष्पांनीं एकाएकी बहरून गेलें.

टस्कंबियापासून चौदा मैलांवर असणाऱ्या टेकडीवर आमचें छोटें उन्हाळी घर आहे. मी तेथें कांहीं काळ राहिलें. त्या घराजवळ फार पूर्वीच सोडून दिलेली चुनखडी दगडाची खाण होती. तेथेंच तीन लहान झरें वरच्या खडकांतून, उड्या मारीत आणि खळखळत खालीं येत. त्यांना वाटेंत जर खडकानें अडविण्याचा प्रयत्न केला तर थट्टेनें खिदळत, ते झरे त्याला ओलांडून जात. हे चुनखडीचे खडक 'फर्नच्या' गवतानें ठायीं ठायीं झांकलेले होते. म्हणून त्या घराचें नांव 'फर्न क्वारी' असें ठेवलें होतें. भोंवतालच्या

डोंगरावर सदैव गर्द झाडी असे. घराच्या आसपास प्रचंड ओक आणि सदा हिरवे असलेले इतर वृक्ष होते. त्यांचे बुंधे भल्यामोठ्या दगडी खांबासारखे असून त्यांच्या फांद्यांवरून 'आयव्ही' आणि इतर फुलांचे हार खालीं लोंबत असत. तेथेंच 'पर्सिमन' वृक्ष होते आणि त्यांच्या मनमोहक सुवासानें त्या जंगलाचा कोपरान् कोपरा सुगंधित झाला होता. वाटेंत जागोजाग ह्या वृक्षांना मिठी मारून बसलेल्या वेली, एका झाडावरून दुसऱ्या झाडावर चढणाऱ्या वेली लागत आणि त्यामुळें पायवाटेवर कमानी उभारल्यासारखें वाटे. त्या वेलींच्यावर फुलपांखरें आणि भुंगे सदैव गुंजारव करीत असत. संध्याकाळीं खूप उशीरां, त्या रानांत, त्या हिरव्या आडवाटेला फिरणें आणि दिवस मावळतांना दरवळणारा पृथ्वीचा मादक गंध सेवन करणें मला फार आवडे.

आमचें उन्हाळी घर म्हणजे छोटीशी छावणीच होती. डोंगराच्या माथ्यावर, ओक आणि पाईन वृक्षांच्या मधोमध तें बांधलेलें होतें. घरांतल्या दिवाणखान्याच्या दोन्ही बाजूंला लहान लहान खोल्या काढल्या होत्या. घरांभोंवतीं चारहि बाजूंना प्रशस्त ओटा होता. तेथेंच आम्ही खात–खेळत असूं. मागील दारीं एका मोठ्या 'बटरनट' वृक्षाच्या भोंवतीं पायऱ्या बांधल्या होत्या. पुढील दारीं असलेलीं झाडें इतकी जवळजवळ वाढलीं होतीं कीं त्यांच्या खोडाला हात लावला कीं त्यांच्या फांद्या वाऱ्यानें हलूं लागल्याचा अनुभव येई. भरमसाट वारे सुटले व पाला–पाचोळा गरगरत उडूं लागला म्हणजे मला भारी गंमत वाटे.

'फर्न क्वारी' मध्यें आमच्याकडे खूप पाहुणे येत. रात्रीं शेकोटी-भोंवतीं सारे पुरुष पत्ते खेळण्यांत किंवा गप्पा मारण्यांत आपला वेळ घालवीत. पांखरें मारण्याची छर्रेबाजी, मासेमारी आणि रानटी जनावरांच्या शिकारी हे त्यांच्या आवडीचे विषय असत. शिवाय गप्पा मारतांना, कोणी किती रान-बदकें मारलीं, कोणी किती मासे धरले, कोणी फार मूल्यवान कोल्हे धरले, कोणी चपळ हरणाची शिकार केली, ह्याविषयीं सारेजण भरमसाट वर्णनें सांगत. शेवटीं मला तर असें वाटूं लागे कीं ह्या शूर शिकाऱ्यांच्या पुढें चितळ-अस्वलासारखीं फालतू जनावरेंच काय पण वाघ सिंह सुद्धां उभे राहणार नाहींत. रात्रीं झोपतांना उद्यां भल्यामोठ्या शिकारीची आशा करूंया असे सारे जण म्हणत. हॉलच्या बाहेरच्या बाजूला

सारे पुरुष झोपत. कुत्र्यांची गुरगुर आणि शिकाऱ्यांचें घोरणें मग बराच वेळपर्यन्त ऐकूं येत असे.

अगदीं पहाटे कॉफीच्या वासानें, बंदुका उचलल्याच्या आणि शिकाऱ्यांच्या चालण्याच्या जड आवाजानें मी जागी होई. मोकळे होण्याला आतुर झालेल्या घोड्यांनीं जागच्या जागीं खूर आपटून केलेले टापांचे आवाज मला ऐकूं येत. शहरांतून दौडत आणलेल्या घोड्यांना रात्रभर झाडाखालीं बांधून राहावें लागल्याकारणानें, त्यांना सोडण्याची वेळ येतांच ते मोठमोठ्यानें खिंकाळत. शेवटीं एकदांचे सारे पुरुष स्वार होत आणि जुन्या गाण्यांतल्या वर्णनाप्रमाणें 'चाबूक फडकवीत, लगामाच्या कड्या वाजवीत' निघत. त्यांच्या पाठोपाठ शिकारी कुत्रे अहमहमिकेनें धांवत, आणि अशा रीतीनें ते तरबेज शिकारी रानांत जात.

दुपारच्या वेळीं आम्हीं 'बारबेक्यूची' (अंगणांत जाळांवर जनावर भाजण्याची) तयारी करीत असूं. जमिनींत एक खोल खड्डा खणून त्यांत विस्तव पेटवला जाई. वरतीं काठ्या जोडून त्यांवर मांस टांगलें जाई आणि पाळीपाळीनें तें परतलें जाई. ह्या चुल्याभोंवतीं हातांत लांब फांद्या घेऊन माशा हांकलीत निग्रो बसलेले असत. शिजत्या मांसाच्या खमंग वासानें पानें वाढण्यापूर्वींच माझ्या पोटांत कावळे ओरडावयास लागत.

हा सर्व प्रकार अगदीं रंगांत येतो न येतो त्याच सुमाराला सारे शिकारी परत येत. सारे लोक दमून थकून गेलेले, घोड्यांच्या तोंडाला फेंस आलेला, थकलेलीं शिकारी कुत्रीं धापा टाकीत असलेलीं, असा सारा सरंजाम आंत येई. पण गंमत तर खरीच कीं एकहि शिकार त्यांना साधलेली नसे. प्रत्येकजण सांगे कीं त्यानें हरीण पाहिलेलें होतें, शिकार अगदीं जवळ आलेली होती, शिकारी कुत्रीं अगदीं मागावर होतीं, बंदुकीचा नेम बरोबर होता; पण बंदुकीचा चाप उडतांना मात्र शिकार नाहींशीं झालेली! लहान मुलें सांगतात ना कीं मीं ससा पाहिला आणि शेवटीं त्यांतून इतकेंच निघतें कीं त्यानें सशाच्या पावलांचे केवळ ठसेच पाहिलेले असतात आणि तो सुद्धां सारा भासच. तसलीच कथा. परंतु झालेली निराशा सारेजण विसरून चमचमीत जेवणाचा समाचार घ्यावयास बसत.

एका उन्हाळ्यांत ‘ फर्नक्वारी ’ मध्यें मीं असतांना माझें तट्टू तेथें होतें आणि कादंबरींतल्याप्रमाणें त्याचें नांव मी ‘ श्यामसुंदर ’ ठेवलें होतें. त्याच्या पाठीचा चकचकीत काळा रंग आणि कपाळावरचा पांढरा तारा, सारे कांहीं अद्‌भुत कथेंत असल्यासारखें होतें. त्याच्यावर बसून कित्येक तास मीं रपेट केली आहे. पुष्कळदां सुरक्षित जागीं सुलिव्हॅन बाई श्यामसुंदराचा लगाम सोडून देत आणि तो मनमानेल तसा हिंडे. कुठें गवत खावयास थांब, कुठे पानें तोडावयास मान हलव, असा अवखळपणा करीत स्वारी चाले.

एकदां सकाळीं रपेट करण्याच्या ऐवजीं मी आणि बाई रानांत गेलों आणि कुठल्यातरी पायवाटेनें जातां जातां झाडवेलींच्या गर्दीत रस्ताच चुकलों. पुष्कळदां पार न होतां येण्याजोग्या जाळीसमोर आम्ही थबकून, पुन्हा वळण घेऊन दुसऱ्या रस्त्याला लागत होतों. घरीं रमत-गमत परततांना आमच्या हातांत गवताचे तुरे, फुलांचे गुच्छ आणि दाक्षिणेंतल्या साऱ्या सुंदर फुलांचा नजराणा असे.

कित्येकदां मिल्ड्रेड, आमचीं धाकटीं चुलत भावंडें, आम्ही सारीं मिळून रानांत पर्सिमनचीं फळें गोळा करावयास जात असूं. मी तीं खात नसे. परंतु त्यांचा वास मात्र मला मनस्वी आवडे. पुष्कळदां चेस्टनट गोळा करण्यासाठीं आम्ही वणवण फिरावयाचे. लहान मुलांना मी तें फोडून देत असे. शिवाय मोठे आणि गोल वॉलनटसुद्धां आम्ही जमवीत असूं.

डोंगराच्या पायथ्याशीं आगगाडीचा रस्ता होता आणि येणाऱ्या–जाणाऱ्या आगगाड्या पाहावयास मुलें उभीं राहावयाचीं. कित्येकदां आगगाड्या कर्कश शिटी वाजवावयाच्या आणि आम्ही थबकलों कीं मिल्ड्रेड उत्साहानें मला सांगावयाची कीं रुळांवर घोडा किंवा गाय रस्ता अडवून उभी आहे. तेथून एक मैलावरच एका छोट्या दरीवरून जाणारा एक आगगाडीचा लाकडी पूल होता. तो इतका अरुंद आणि अवघड होता कीं चालतांना चाकूच्या पात्यावर चालल्यासारखें वाटे. मी तर कधीं त्या पुलावरून जातच नसे. एकदां मिल्ड्रेड, सुलिव्हॅन बाई व मी रस्ता चुकलों आणि तासन् तास भटकलों.

इतक्यांत एकदम मिल्ड्रेड ओरडून म्हणाली, “ तो पाहा पूल ! ” त्यावरून जाण्यापेक्षां आम्हांला दुसरा कुठलाहि रस्ता परवडला असता; पण

उशीर झाला होता, रात्र पडत चालली होती आणि पुलावरून जाणें हाच जवळचा रस्ता होता. मीं पायानें रूळ चांचपत कशीबशी पलीकडे गेलें होतें. इतक्यांत कोठेंतरी अस्पष्ट असा आगगाडीचा झुक्झुक् आवाज आला.

" ती पाहा आगगाडी ! " मिल्ड्रेड ओरडली. आम्ही कडेला चिकटून उभे राहिलों नसतों तर आगगाडी आमच्या अंगावरूनच गेली असती; पण थोडक्यांत निभावलें. इंजिनांतून येणारी गरम वाफ, धूर आणि राख यांनीं आम्हांला अगदीं गुदमरल्यासारखें झालें. आमच्या जवळून आगगाडी जशी धडधडत गेली तसा तो पूल हलूं लागला, डोलूं लागला आणि क्षणभर मला असें वाटलें कीं आम्ही खालींच कोसळणार, पण निभावलें. खूप खटपटीनंतर आम्ही नीट रस्त्यावर आलों आणि बऱ्याच उशीरां रात्रीं घरीं पोंचलों. घरीं येतों तो काय, सारें घर रिकामें. कारण आम्हांला शोधावयास सारेजण बाहेर पडले होते.



# – १२ –

आमच्या बॉस्टनच्या पहिल्या सफरीनंतर, दरवर्षी हिंवाळयांत मी उत्तरेकडे जात असे. एकदां मी न्यू इंग्लंडमधील एका खेड्यांत गेलें होतें. तेथील गोठलेलीं तळीं आणि बर्फाचीं मैदानें अजून मला आठवतात. तेथेंच पहिल्याप्रथम मला बर्फांत मनमुराद खेळण्याची, त्याची सारी मजा लुटण्याची संधि मिळाली.

ज्या वेळीं पहिल्या प्रथम हिंवाळयांत कुठल्यातरी भुताटकीच्या हातानें झाडाझुडपांवरचीं पानें ओरबडून नेलेलीं मीं पाहिलीं, त्या वेळीं मला वाटलेलें आश्चर्य अजूनहि आठवतें आहे. पक्षी उडून गेले होते आणि उघड्या–बोडक्या झाडांवरील त्यांचीं घरटीं बर्फानें भरून गेलेलीं होतीं. टेकडीवर, शेतांवर, सगळीकडे हिमवर्षाव झाला होता. हिंवाळयाच्या थंडगार स्पर्शानें पृथ्वी जणूं गारठून गेली होती. झाडांचा सारा जिवंतपणा त्यांच्या मुळांत शिरून, पाय पोटाशीं घेऊन झोंपला होता, साऱ्या आयुष्याला ओहोटी लागली होती. जरी सूर्यप्रकाश पडला होता तरी दिवस कसा थंडीनें कांकडलेला वाटे. त्याच्या साऱ्या रक्तवाहिन्या म्हाताऱ्या झाल्यासारख्या दिसत. निराशावाण्या दृष्टीनें तो पृथ्वी आणि समुद्र यांच्यावर अंधुक दृष्टि टाकीत असावयाचा. गवत आणि झुडुपें जाऊन त्या आकाराचीं बर्फाचीं जंगलें निर्माण व्हावयाचीं.

नंतर असा एखादा दिवस येई कीं थंड हवेंतून बर्फाच्या वादळाचीं लक्षणें दिसूं लागत. आभाळांतून पडणाऱ्या त्या वर्षावाच्या स्वागताकरितां आम्ही घराबाहेर पडत असूं. तासन्तास आवाज न करतां बर्फाचा पृथ्वीवर चूर झरत असावयाचा त्यामुळें जमिनीवरचे खड्डे-खुड्डे बुजले जाऊन तिला

एक सफेद पातळी येई. रात्रभर हिमवृष्टि चाले आणि सकाळीं उठून पाहावे तों आपल्या भोंवतालची सृष्टि ओळखूं न येण्यासारखी होई. सारे रस्ते बुजलेले, खाणाखुणा गेलेल्या, सगळीकडे बर्फाचे ढीग, क्वचित् कोठें बर्फाची टोपी घातलेलीं झाडें माना वर करून बघत.

संध्याकाळीं ईशान्येकडचा वारा वाहूं लागे आणि बर्फाचा रांगोळी-सारखा चुरा उधळून देई. मग भली मोठी शेकोटी पेटवून, भोंवतीं बसून जमतीगमतीच्या गोष्टी सांगतां सांगतां आमचें भान जाई. आमच्या लक्षांत येत नसे कीं साऱ्या जगापासून दूर कुठल्यातरी एकान्तांत आम्ही बसलों आहोंत रात्रभर त्या वाऱ्याचा पिसाटपणा वाढत जाई आणि आम्हांलासुद्धां भीतीनें थरकांप सुटे. खिडक्यांच्या फळया आणि तावदानें वाजत. झाडाच्या फांद्या सळसळत आणि साऱ्या प्रदेशांत त्या वेडावलेल्या वाऱ्याचा धुमाकूळ चाले.

वादळ सुरू झाल्यापासून तिसऱ्या दिवशीं बर्फाचा वर्षाव थांबला. सूर्यानें थोडेसें डोकें बाहेर काढलें आणि ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत पसरलेल्या पांढऱ्या शुभ्र मैदानावर प्रकाशाचा झोत टाकला. चोहोंकडे बर्फाचे ढीग, डोंगर आणि वेडेवांकडे आकार पसरलेले दिसत होते. बर्फाच्या धुक्यांतून सूर्यकिरणांनासुद्धां शिरणें मुश्कील वाटे.

लगोलग फावडीं घेऊन बारिकसारीक वाटा मोकळ्या केल्या गेल्या. मीहि माझा कोट घालून बाहेर पडलें. विस्तवाच्या झळीप्रमाणें त्या थंडगार हवेच्या झुळका माझ्या गालाला चावत आहेत असें वाटत होतें. थोडेसें चालत, थोडेसें बर्फ खणून रस्ता करीत, आम्हीं पाइन झाडाच्या राईपर्यंत गेलों. तीं झाडें संगमरवरी दगडाच्या मूर्तीप्रमाणें पांढरीं शुभ्र आणि स्तब्ध होतीं. त्यांना पाईनचा सुगंधसुद्धां येत नव्हता. इतक्यांत झाडावर सूर्यप्रकाश पडला व फांद्यावरचे बर्फाचे कण हिऱ्यासारखे चमकूं लागले. आम्ही फांद्यांना हात लावतांच आमच्यावर त्या हिऱ्यामाणकांचा वर्षाव झाला. त्या वेळीं सूर्य-प्रकाश इतका तेजस्वी वाटला कीं, माझ्या अंध डोळ्यांनासुद्धां त्यांतून किरण शिरल्यासारखे वाटले.

असे दिवस जातां जातां हिमवृष्टि थांबली. परंतु जातां जातां हिंवाळ्याचें शेवटचें वादळ झालेंच. सबंध हिंवाळाभर माझ्या पायाला जमीन लागल्याचें

मला आठवत नाहीं. क्चित् मधून मधून झाडें आपल्या बर्फाचें अवगुंठन काढून टाकीत आणि झुडपांचे उघडे-बोडके अवतार दिसत. सरोवर मात्र गोठून घट्ट झालेलें असे.

त्या हिंवाळयांत ' टोबोगॅनिंगचा ' खेळ आम्ही खूपदां खेळलों. किनाऱ्याच्या मानानें गोठलेल्या तळयाची उंची कमी असे आणि त्या उतारांवर आम्ही घसरगुंडी करीत असूं. आम्ही तीं लांब लाकडी पादत्राणें घालून उभ्या राहात होतों. कोणी तरी आम्हांला धक्का देऊन घसरगुंडीवर सोडावयाचें आणि मग किनाऱ्यास आमची गाडी घसरत जावयाची. खड्डयांवरून उड्या मारीत, उतारांवरून वेगानें कोसळत आणि उंच सखल भागावरून हेलकावे खात त्या चकाकणाऱ्या बर्फाच्या जमिनीवरून आम्ही सरोवराच्या पैलतीरावर जात होतों. किती गंमत वाटावयाची ! अगदीं वेडावणारा खेळ आहे तो. त्या एका वेडावणाऱ्या धाडसी क्षणाकरितां आम्ही पृथ्वीचा पाश तोडून एखाद्या खड्डयावरून झेंप घ्यावयाची आणि वाऱ्याच्या गळयांत गळा घालून क्षणभर अधांतरी राहण्याची स्वर्गीय मजा चाखावयाची. हाच आमचा खेळ.



● ● ●



" ग्रंथ हेच माझे सर्वांत जवळचे मित्र आहेत "
( डॉ. केलर 'ब्रेल' वाचतांना )




हातानें हातावर खुणा करून अक्षरें करण्याची एक पद्धत.
ह्यायोगें बहिरीं–मुकीं मुलें एकमेकांशीं बोलूं शकतात.

माझ्यापेक्षां इतर लोक एकमेकांशीं बोलण्याची एक वेगळीच पद्धत वापरतात, हें मला कैक दिवस माहीत होतें. बहिऱ्या मुलालासुद्धां बोलावयास शिकवितां येतें हें मला समजण्यापूर्वी, माझ्याजवळ असलेल्या बोलण्याच्या साधनाविषयीं मला अत्यंत समाधान वाटे. केवळ हातानें अक्षरें करून जीं माणसें बोलतात, त्यांना कायमचा संकोच आणि दडपण वाटत असतें. ह्या जाणिवेमुळेंच आपल्यामध्यें असलेली कमतरता भरून काढावी अशी प्रबळ आणि प्रोत्साहक वृत्ति माझ्यांत निर्माण झाली. पांखरांच्याप्रमाणें माझे विचार वाऱ्यांवर झेप घेत; पण मी मात्र बोलेन तर ओठांनींच असा हट्ट धरून बसे. या हट्टांतून माझ्या पदरीं निराशा येईल असें आमच्या स्नेह्यांना वाटे आणि म्हणून ते मला परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत. परंतु माझा आग्रह मोठा जबर. एकदां मी 'रॅग्न्हील्ड काटा' हिची गोष्ट ऐकली आणि तेव्हांपासून मुकेपणाचें कुंपण कोसळण्यास सुरुवात झाली.

१८९० मध्यें लॅारा ब्रिग्मिनला ज्यांनीं शिकविलें, त्या सौ. लॅम्सन मला भेटावयास आल्या. त्या नुकत्याच नॅार्वे आणि स्वीडनचा दौरा करून आल्या होत्या. नॅार्वेमधील 'रॅग्न्हील्ड काटा' ह्या आंधळ्या आणि मुक्या मुलीला बोलावयास कसें शिकविलें ह्याची हकीकत त्यांनीं मला सांगितली. ती गोष्ट ऐकतां ऐकतां माझी उत्सुकता पराकोटीला गेली होती आणि बोलावयास शिकावयाचेंच असा मी मनोमन निश्चयहि केला होता. बाईनीं ''होरॅस मान'' शाळेच्या प्रमुख कु. सारा फुल्लर ह्यांच्याकडे सल्लामसलतीकरितां मला नेईपर्यंत, माझ्या जिवाला स्वस्थता नव्हती. या गोड स्वभावाच्या बाईनीं मला शिकवावयाचें कबूल केलें आणि २६ मार्च १८९० ला कु. फुल्लर मला शिकवूं लागल्या.

त्यांची पद्धति अशी होती. त्या माझा हात त्यांच्या चेहऱ्यावरून हळू हळू फिरवीत आणि त्यांची जीभ आणखी ओठ ह्यांच्या हालचाली शब्दोच्चाराचे वेळीं कशा होतात हें मला समजे. त्या हालचालीची नक्कल करतां करतां सुमारें तासाच्या खटपटीनंतर मला एम्. पी. ए. एस्. टी. आय्. असे ओबडधोबड उच्चार येऊं लागले, माझ्या आयुष्यांत पहिल्या प्रथम जेव्हां मी एक सबंध वाक्य बोललें त्या वेळीं मला वाटलेला विस्मय आणि आनंद अविस्मरणीय आहे. 'हें गरम आहे' हेंच तें वाक्य. हें तर खरेंच

कीं हीं सर्व अक्षरें तुटक तुटक व अडखळत उच्चारलीं गेलीं. पण कसें झालें तरी तो शब्दोच्चार होता. त्यामुळें माझ्या मनाला उच्चाराच्या नव्या शक्तीची जाणीव झाली. माझा आत्मा बंधमुक्त झाला व त्या तुटक्या अक्षरांतून का होईना, परंतु सर्व शिक्षण, सर्व शास्त्रें व सर्व संस्कृति ह्यांच्यापर्यंत पोचण्याचा मार्ग मोकळा झाला.

प्रत्येक बहिऱ्या मुलाच्या मनामध्येंच एक स्तब्धतेचा तुरुंग असतो. त्यांत प्रेमाची ललकार नसते, पक्ष्यांची किलबिल नसते ! संगीताचा मधुर आवाज सुद्धां त्या स्तब्ध शांततेचें वातावरण भेदूं शकत नाहीं. पण जो आवाज आपण ऐकला नाहीं तो उच्चारतांना, प्रथम उच्चार केल्यावर होणारा आश्चर्याचा उन्माद, नवीन कांहीं तरी मिळवल्याचा आनंद, हें कोणतें बहिरें मूल विसरूं शकेल? केवळ अशा मुलांनाच, मी ज्या आतुरतेनें माझ्या बाहुल्यांशीं बोललें, झाडें, दगड, पक्षी, कुत्रे, सर्वांसर्वांशीं बोललें, त्यांतील आनंद उमजेल. माझी हांक ऐकून माझी बहीण येई, माझा हुकूम ऐकतांच कुत्रें धांवे, त्या वेळीं माझ्या या नव्या शक्तीची जाणीव मला होई. उच्चारणशक्ति हें एक वर्णनातीत वरदान आहे. त्यामुळें माझ्या शब्दांना पंख फुटले. माझें बोलणें खाणाखुणांनीं सांगायचें कारण उरलें नाहीं. पूर्वी मी बोटांनीं अक्षरें करीत असे, त्या वेळीं जे विचार बाहेर येण्यासाठीं माझ्या बोटांशीं धडधड करीत, तेंच विचार मी बोलूं लागतांच शब्दांचें नवें लेणें लेवून जिभेकडे झेप घेऊं लागले.

अर्थातच इतक्या थोड्या वेळांत, मी खऱ्या अर्थानें बोलूं लागलें असें मात्र समजूं नये. मी केवळ प्राथमिक स्वरूपाचे उच्चार करायला शिकले. माझें बोलणें सुलिव्हॅन बाई व फुलर बाई यांना समजे; पण इतरांना शंभरांतला एक तरी शब्द कळे कां नाहीं याची शंकाच आहे. शिवाय हे प्राथमिक उच्चार येऊं लागल्यानंतर माझी मीच बोलायला शिकलें हेंहि खरें नव्हे. नैसर्गिक व अगदीं सहजपणानें बोलणें येण्यापर्यंतच्या माझ्या प्रगतीला, सुलिव्हॅन बाईंची प्रतिभा, निर्धार व श्रद्धा हीच कारणीभूत आहेत. माझ्या अगदीं जवळच्या माणसांनासुद्धां माझें बोलणें थोडें थोडें समजायला लागण्यापूर्वी मी अहोरात्र त्याकरितां खटपट करीत होतें. प्रत्येक अक्षर हें स्पष्टपणें उच्चारायला, व प्रत्येक उच्चाराचे स्वरांच्याशीं संयोग होतांना होणारे

हजारों प्रकार उच्चारतांना मला सुलिव्हॅन बाईंची ठायीं ठायीं मदत लागे. अजून सुद्धां दररोज, माझ्या कित्येक चुकीच्या उच्चारांकडे, त्या माझें लक्ष वेधून, ते दुरुस्त करावयाला लावतात.

बहिऱ्या मुलांच्या शिक्षकांना ह्या परिश्रमांची कल्पना असते आणि मला आलेल्या अडचणींची त्यांनाच पूर्ण कल्पना येऊं शकेल. सुलिव्हॅन बाईंचे उच्चार, त्यांच्या ओठावर हात ठेवून मी समजावून घेई किंवा गळ्यावर हात ठेवून स्वरांचें कंपन समजावून घेई. या कामीं किंवा त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव समजावून घेण्याकरितां मला माझ्या हाताच्या स्पर्शावर अवलंबून राहावें लागे व स्पर्शानें प्रत्येक हालचाल नेमकी कळतेच असें नाहीं. अशा वेळीं, मग तो शब्द अगर तें वाक्य, माझा उच्चार सफाईदार होईपर्यंत मी तासन् तास घोकत असे. माझें काम म्हणजे उच्चाराची संवय करणें, रात्रंदिवस संवय करणें. थकवा आणि निरुत्साह ह्यांनीं मी पुन्हा पुन्हा गळून जाई; परंतु लौकरच घरीं जाऊन, मीं आज काय नवीन शिकलें हें घरच्या मंडळींना दाखवायला हवें ह्या विचारानें मला पुन्हा चेतना येई आणि माझ्या यशानें त्यांना होणाऱ्या आनंदाकडे डोळे लावून मी पुन्हा अभ्यासाला लागे.

'माझें बोलणें, माझ्या धाकट्या, लाडक्या बहिणीला आतां समजेल' ह्या विचारानें साऱ्या अडचणींवर मात केली होती. एक प्रकारच्या काव्यमय उन्मादानें मी पुन्हा पुन्हा म्हणे, "मी कांहीं आतां मुकी नाहीं." माझ्या आईशीं बोलावें व ती उत्तर देतांना हातांनीं तिचे ओठ चाचपून पाहावे, ह्या आनंदाच्या कल्पनेमुळेंच माझा उत्साह टिकला होता. हातांनीं अक्षरें करण्यापेक्षां बोलणें कितीतरी सोपें आहे हें समजतांच मला फार आश्चर्य वाटलें आणि मी हातांनीं अक्षरें करून, माझे विचार सांगायचे सोडून दिले. पण बाई आणि इतर कांहीं स्नेही मात्र हातांनीं अक्षरें करूनच माझ्याशीं बोलत, कारण ते अधिक सोयीचे व ओष्ठवाचनापेक्षां ( Lip-Reading ) सोपे वाटे.

इथेंच हातांनीं अक्षरें करणें म्हणजे काय हें सांगून टाकतें, कारण अनेक लोकांना त्याचें कोडें वाटतें. माझ्याशीं बोलतांना, किंवा मला वाचून दाखवतांना, बहिऱ्या मुलांची एका हातानें अक्षरें करण्याची जी पद्धत आहे, त्या पद्धतीनें, माझ्या हातावर खुणांनीं अक्षरें केलीं जातात. मी

माझा हात बोलणाऱ्याच्या हातावर इतका अल्हाद ठेवतें कीं त्याच्या हाताच्या हालचालींना मुळींच अडथळा होत नाहीं. जितक्या सहजपणानें आपण पाहतों तितक्या सहजपणानें हातावर हात ठेवून खुणा व अक्षरें केलीं जातात. वाचतांना तुम्हांला प्रत्येक अक्षर वेगळें वाटत नाहीं, शब्दच दिसतो. त्याचप्रमाणें खुणांतहि होतें. झटझट शब्द समजतात. पुष्कळशा संवयीनें बोटें जलद हलूं लागतात. एखादा दर्दी टंकलेखक जितक्या वेगानें टाइपरायटरवर लिहितो, तितक्याच वेगानें कांहीं लोक अक्षरें हातानें करूं शकतात. लिहितांना जितक्या नकळत आपण अक्षरें जुळवतों व शब्द करतों तितक्याच नकळत हातानें हातावर, खुणांनीं लिहिलें जातें.

जेव्हां मी बोलणें आत्मसात् केलें त्या वेळीं मी घरीं जाण्याची उत्कंठा थांबवूं शकलें नाहीं. शेवटीं एकदां तो सर्वोच्च आनंदाचा क्षण उगवला. आमचा घराकडचा प्रवास सुरू झाला. गाडींत मी सारखी बाईंच्याशीं बोलत होतें. बोलण्यांत मतलब होता असें नव्हे; पण शेवटच्या घटकेपर्यंत उच्चार सुधारण्याचा प्रयत्न होता तो. मला समजण्यापूर्वीच गाडी टस्कंबियाच्या स्टेशनवर थांबली. फलाटावर घरची सारी मंडळी उभी होती. मी बोललेलें अक्षरन् अक्षर सांठवून घेत, आनंदानें कांपत, निःशब्द होऊन, आईनें मला इतकी घट्ट मिठी मारली कीं त्या आठवणीनें अजूनहि माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहतात. माझी धाकटी बहीण मिल्ड्रेड माझ्या एका हाताचा पुन्हा पुन्हा मुका घेई, आणि नाचे. मी बोलायला लागलें ह्याच्या अभिमानानें, आनंदानें आणि प्रेमानें, बाबांना मुळीं बोलणेंच अशक्य झालें. ओठ घट्ट दाबून ते एकटक माझ्याकडे बघत होते. जणूं प्रेषिताची देववाणी आज खरी झाली होती. "तुझ्या दृष्टीसमोर, जागेपणीं टेकड्या आणि पर्वतश्रेणी आनंदानें गाऊं लागतील आणि शेतामाळांतील साऱ्या वृक्षवल्लरी टाळ्या वाजवून ताल धरतील !"



# – १४ –

माझ्या बालपणचें आकाश १८९२ च्या हिंवाळ्यांत एका ढगानें काळवंडून गेलें. माझ्या मनांतला आनंद केव्हांच पसार झाला आणि कित्येक दिवस मी संशय, काळजी आणि भीति ह्यांनीं ग्रस्त होऊन गेलें. पुस्तकांची सारी मौज गेली. त्या भयंकर दिवसाच्या आठवणीनें अजूनहि कितीदां तरी माझें मन गारठून जातें. पर्किन्स संस्थेचे प्रमुख श्री. ॲनॅग्नोस ह्यांना मी 'सम्राट् शिशिर' ह्या नांवाची एक छोटी गोष्ट लिहून पाठविली; हेंच या त्रासाचें मूळ. माझ्या बाई आणि मी, ह्यांच्या बाबतींत अन्याय होऊं नये म्हणून घडलेली सारी हकीकत मला सविस्तर सांगायला हवी.

मी बोलूं लागल्यानंतरच्या हिंवाळ्यांत मी घरीं असतांना ही गोष्ट लिहिली. 'फर्न क्वारी' या बंगल्यांत दरवर्षीपेक्षां अधिक दिवस आम्ही त्या वेळीं राहिलों होतों.सुलिव्हॅन बाईंनीं मला त्या वेळीं पानाफुलांचें बहारदार वर्णन करून त्यांतलें सौंदर्य दाखविलें होतें. त्या वर्णनामुळेंच कीं काय, पूर्वी मला वाचून दाखविलेल्या व माझ्या स्मृतिसंपुटांत सांठविलेल्या एका गोष्टीची माझी आठवण जागी झाली. लहान मुलें गोष्ट जुळवतात ना, मला तसेंच वाटलें आणि आलेली कल्पना, जुळत असलेली गोष्ट तशीच निसटूं नये म्हणून मी लगेच लिहावयास बसलें. माझ्या विचारांचा व कल्पनेचा प्रवाह अविरत चालला होता. गोष्ट रचतांना विलक्षण आनंद होत होता. शब्द आणि कल्पनाचित्रें माझ्या बोटापाशीं आतुरतेनें धावत येत आणि मनांत वाक्यांमागून वाक्य जुळतांच ते मी माझ्या ब्रेलपाटीवर लिहून काढीत होतें. इतक्या कल्पना व शब्द इतक्या सहजपणानें सुचतात ह्याचा उघड अर्थ हा कीं ती गोष्ट कांहीं माझी मानसकन्या नव्हे. उलट तें

चारपांच भटके विचार होते. परंतु त्या काळीं मीं वाचलेली प्रत्येक गोष्ट त्याच्या लेखकाच्यासंबंधीं विचार न करतांच मनांत सांठवीत असे. आजसुद्धां मीं पुस्तकांत वाचून आत्मसात् केलेल्या व माझ्या स्वतःच्या कल्पना ह्यांतील सीमारेषा अगदीं अस्पष्ट आहे.त्याचें कारण असें असेल कीं आतांपर्यंत सारे विचार व कल्पना मी दुसऱ्याच्या कानाच्या किंवा डोळ्याच्या द्वारें ग्रहण केल्या आहेत.

गोष्ट पूर्ण होतांच ती बाईंना वाचून दाखविली. मला अगदीं स्पष्टपणें आठवतें आहे कीं त्यांतील सुंदर परिच्छेद वाचतांना मला किती आनंद वाटला होता आणि वाचतांना चुकीचे उच्चार दुरुस्त करायला बाईंनीं अडवलें तरी किती राग येत होता. रात्रीं जेवतांना ती गोष्ट वाचून दाखविली. मी इतकें सुंदर लिहूं शकतें याबद्दल घरच्या सर्वांनाच फार आश्चर्य वाटलें. कुणीतरी मला विचारलेंहि कीं मी ती एखाद्या पुस्तकांत वाचली का होती काय?

त्या प्रश्नाचा मला फार राग आला कारण ती मला वाचून दाखविली होती असें मला मुळींच आठवत नव्हतें. मी एकदम म्हणालें, 'मुळींच नाहीं. ती माझी गोष्ट आहे आणि मी ती श्री. ॲनॅग्नोस यांचेकरितां लिहिली आहे.' त्याप्रमाणें मी त्या गोष्टीची प्रत तयार केली व श्री. ॲनॅग्नोस यांच्या वाढदिवसाची भेट म्हणून पाठवून दिली. मला असें सुचविण्यांत आलें होतें की गोष्टीचें नांव 'हिंवाळ्यांतलीं पानें' असें न ठेवतां 'सम्राट् शिशिर' असें ठेवावें व तें मीं केलेंहि. मी स्वतः ढगावर स्वार झाल्यासारखी तरंगत, स्वतः पोस्टांत गेलें. मला कल्पनाहि नव्हती, कीं त्या वाढदिवसाच्या भेटीचे किती दारुण परिणाम माझ्यावर होणार होते.

श्री. ॲनॅग्नोसना ती गोष्ट वाचून फार आनंद झाला आणि ती त्यांनीं पर्किन्स संस्थेच्या वृत्तान्तांत छापून टाकली. हें तर आनंदाचें शिखर होतें; पण तेथून क्षणार्धांतच मी खालीं कोसळलें. मी बॉस्टनला थोडे दिवस राहायला गेलें होतें, तिथें मला कळलें कीं सम्राट् शिशिरासारखीच, कु. कॅनबी यांनीं लिहिलेली 'शिशिरांतल्या अप्सरा' ही गोष्ट माझ्या जन्मापूर्वीच 'बर्डी अँड हिज फ्रेंड्स' या पुस्तकांत प्रसिद्ध झाली होती. दोन्हीं गोष्टींतले विचार व भाषा यांत विलक्षण साम्य होतें, आणि त्यामुळें ती गोष्ट मला वाचून दाखवली गेली असावी आणि माझी गोष्ट म्हणजे शुद्ध वाङ्मय-

चौर्य आहे हें उघड दिसूं लागलें. हें मला पटणें कठीण होतें, पण मी तें पटवून घेतलें आणि मी दुःखी झालें. मी चकित झालें. कडु अनुभवाचा इतका मोठा घोट माझ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याच मुलानें घेतला नसेल. मीं स्वतःची नाचक्की केली होती. जे लोक मला प्राणाहून प्रिय होते त्यांच्याविषयीं म्हणजे सुलिव्हॅनबाई विषयीं शंकेला जागा निर्माण केली होती; पण हें झालें तरी कसें? मी डोकें खाजवून खाजवून पाहिलें; पण 'सम्राट् शिशिर' लिहिण्यापूर्वी ती गोष्ट वाचल्याचें मला आठवेना. फक्त 'जॅक फ्रॉस्ट' चा संदर्भ व एक बालगीत ह्यांत कल्पनासाधर्म्य होतें; पण माझ्या गोष्टींत त्यांचा उल्लेख नव्हता.

सुरुवातीला श्री. ॲनॅग्नोस ह्यांना ह्या प्रकाराची भारी खंत वाटली; पण त्यांचा माझ्यावर विश्वास होता. ते अतिशय शांतपणें व दयाळूपणें माझ्याशीं वागले आणि थोडा वेळ ही दुःखाची छाया दूर झाली. त्यांच्या समाधानाकरितां मी आनंदी असल्याचा, चांगलेचुंगले कपडे घालायचा देखावा करीत होतें. कारण वॉशिंग्टन महोत्सव जवळच आला होता.

आंधळ्या मुलींनीं केलेल्या एका संगीतिकेंत मी 'सिरेस्' होणार होतें. माझ्याकरिता केलेले डौलदार कपडे मला अजून आठवतात. माझ्यासाठीं हिंवाळ्यांतल्या सोनेरी पानांचा मुकुट केला होता. माझ्या पायातळीं व हातांत फळांचे घड व धान्यराशी होत्या; पण ह्या साऱ्या झगमगत्या शोभेच्या मागें माझ्या मनाला बोचणारी, पुढें येऊं घातलेल्या दुःखाची जाणीव होती.

समारंभाच्या आदल्या दिवशीं, एका शिक्षिकेनें मला 'सम्राट् शिशिराविषयीं' एक प्रश्न विचारला आणि मी म्हणालें कीं सुलिव्हॅन बाईंनीं मला जॅक फ्रॉस्ट व त्याच्या कामगिरीविषयीं सांगितलें होतें. ह्या बोलण्यावरून मी कु. कॅनबी यांची गोष्ट वाचली होती असा कबुलीजबाब दिल्यासारखें त्यांना वाटलें आणि त्यांनीं आपला निर्णय श्री. ॲनॅग्नोस यांना सांगितला. तरी मी त्यांना बजावून सांगितलें होतें कीं त्यांची माहिती चुकीची आहे.

श्री. ॲनॅग्नोस यांचें माझ्यावर फार प्रेम होतें; पण आम्हीं त्यांच्याकडून त्यांना फसविलें असें वाटून, आम्ही प्रेमानें व निरागसपणें सांगितलेल्या गोष्टीकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. त्यांची खात्री झाली. निदान त्यांना संशय आला होता कीं, सुलिव्हॅन बाईंनीं व मी दुसऱ्याचे तेजस्वी विचार चोरून, प्रशंसा

मिळविण्याकरितां गैरवाजवी प्रयत्न चालवले होते. शाळेंतले शिक्षक आणि इतर अधिकारी यांच्या चौकशीसमितीसमोर मला आणण्यांत आलें आणि सुलिव्हॅन बाईंना बाहेर जाण्यास सांगितलें. तिथें मला नाना तऱ्हेचे प्रश्न आणि प्रतिप्रश्न विचारण्यांत आले. जणूं कांहीं मी ती गोष्ट पूर्वी वाचली होती असा माझ्याकडून कबुलीजबाब करून घ्यायचा त्या लोकांनीं निश्चय केलेला होता. त्यांच्या मनांत असलेली शंका आणि माझ्या विषयींचा संशय प्रत्येक प्रश्नांत व्यक्त होत होता. क्षणोक्षणीं मला असें वाटत होतें कीं माझ्यावर प्रेम करणाऱ्या लोकांच्या मनांत माझ्या विषयीं गैर-समज आहे. तें सारें दुःख शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे. माझी छाती धडधडत होती आणि हो, ना, यासारखीं एकाक्षरीं उत्तरें देण्यापेक्षां जास्त शक्ति मला उरलेली नव्हती. अजाणतेपणानें कां होईना झाली ही भयंकर चूक झाली ह्या जाणिवेनेंसुद्धां माझ्या यातना कमी होईनात. शेवटीं ज्या वेळीं मला बाहेर जाण्याची परवानगी देण्यांत आली त्यावेळीं मी बुजलें होतें. माझ्या बाईंचे माझ्याविषयींचे काळजीचे उद्‌गार व "मी एक धीट मुलगी आहे, माझा माझ्या मैत्रिणींना अभिमान वाटतो आहे." असें माझ्या मैत्रिणींचे उद्‌गार ह्याकडेहि माझें लक्ष गेलें नाहीं.

त्या रात्रीं अंथरुणाला पाठ टेकतांच मी रड रड रडलें. फारच थोड्या मुलांना इतकें रडावें लागलें असेल. सारा आनंद मेल्यासारखाच होता. मला तर सारखें वाटे कीं उद्यांचा दिवस उजाडण्यापूर्वी आपण मरून जाऊं. आणि त्या कल्पनेनें मात्र थोडें तरी समाधान होई. मला असें वाटतें कीं मी आणखी मोठी झाल्यावर जर हा प्रसंग माझ्यावर ओढवला असता तर माझी सारी अस्मिता चुरडून गेली असती. परन्तु विस्मरण हा एक मोठा आशीर्वाद आहे आणि त्याच्या कृपाप्रसादानें त्या भयंकर दिवसांच्या कडु आठवणी आणि यातना आतां पुष्कळच कमी झालेल्या आहेत.

सुलिव्हॅन बाईंनीं 'फ्रॉस्ट फेअरीन' ही गोष्ट अगर ती ज्यांत प्रसिद्ध झाली तें पुस्तक केव्हांहि वाचलें नव्हतें. डॉ. बेल यांच्या मदतीनें बाईंनीं ह्या प्रकरणाची सूक्ष्म चौकशी केली आणि शेवटीं असें निष्पन्न झालें कीं १८८८ सालीं आम्ही श्रीमती हॉपकिन्स ह्यांच्या ब्रूस्टर येथील घरांत उन्हाळ्याची सुट्टी घालविली होती आणि तेथें श्रीमती हॉपकिन्स यांच्याजवळ

कु. कॅनबीच्या पुस्तकाची प्रत होती. त्या वेळीं सुलिव्हॅन बाई रजेवर गेल्या होत्या. श्रीमती हॉपकिन्स माझ्या मनोरंजनाकरितां निरनिराळ्या पुस्तकांतून गोष्टी वाचीत असत. आतां ती प्रत सांपडत नसली किंवा तीच गोष्ट वाचून दाखविल्याचें त्यांना आठवत नसलें तरीहि तें पुस्तक त्यांनीं वाचून दाखविलेल्यापैकीं एक होते ह्यांत शंका नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीच त्यांनीं घर विकलें होतें व त्यांच्याजवळ असणारीं अनेक बालवाचनाचीं पुस्तकें त्यांनीं विकून टाकलीं होतीं हें पुस्तक कदाचित् त्यांत गेलें असावें.

त्या काळीं ह्या गोष्टींचा अर्थ मला फारसा कळत नसे. परंतु नवीन नवीन शब्द ऐकणें व जुळविणें ह्याचीच मला फार गंमत वाटे. ही गोष्ट ऐकल्याची मला पुसटसुद्धां आठवण नाहीं; परंतु ऐकलेले अवघड शब्द लक्षांत ठेवण्याचा मीं प्रयत्न केला होता. कारण सुलिव्हॅन बाई परतल्यावर त्या शब्दांचा अर्थ मला सांगतील अशी मला आशा होती. एक मात्र खरें कीं त्या भाषेचा खोल ठसा माझ्या मनावर उमटला होता आणि ह्याची कल्पना कोणालाच–फार काय मलासुद्धां नव्हती.

बाई परत आल्यानंतर मी ह्या गोष्टीसंबंधीं त्यांना बोललें नाहीं. कारण त्यांनीं आल्याबरोबर ' लिट्ल लॉर्ड फॉन्टलोरी ' हें सुंदर पुस्तक वाचावयास सुरुवात केली. ह्या पुस्तकाच्या मोहिनीनें माझ्या मनांतील इतर साऱ्या विचारांना कांहीं काळ हद्दपार केलें होतें; परंतु हें तर खरेंच कीं कु. कॅनबी ह्यांनीं लिहिलेली गोष्ट मला वाचून दाखविण्यांत आली होती आणि ती मी विसरल्यानंतर कित्येक दिवसांनीं ती इतक्या सहजपणानें मला सुचली–स्फुरली म्हणा ना ! कीं ती गोष्ट दुसऱ्या कोणाची आहे याची तिळमात्र शंका मला आली नाहीं.

ह्या त्रासदायक काळांत कित्येकांनीं प्रेमाचे आणि सहानुभूतीचे संदेश पाठविले. त्या काळचे माझे सर्व स्नेही त्यांतला एकच अपवाद सोडून— अजूनहि माझे स्नेहीच राहिले आहेत.

कु. कॅनबी ह्यांनीं मला स्वतः पत्रांत लिहिलें, ' पुढें मागें तूं सुद्धां तुझ्या स्वतःची अशी गोष्ट लिहिशील आणि त्यायोगें अनेकांना आनंद वाटेल.' परंतु हें भविष्य कधींच खरें झालें नाहीं. कारण पुनः केव्हांहि केवळ गमतीखातर मी शब्दांशीं खेळलें नाहीं. खरोखरी प्रत्येक वेळीं लिहितांना माझ्या

मनाचा छळ झालेला आहे आणि मला भय वाटतें आहे कीं मी लिहितें हें दुसऱ्याचें तर नव्हे. ह्या घटनेनंतर मी आईलासुद्धां पत्र लिहितांना थबके आणि एखादा शब्द पुन्हा पुन्हा गिरवी. जणूं भय वाटे कीं ही दुसऱ्याची उसनवारी तर नव्हे. सुलिव्हॅन बाईनीं मला एकसारखें प्रोत्साहन दिलें नसतें तर मीं कदाचित् लिहिण्याचा नाद सोडला असता.

त्यानंतर मीं 'शिशिरांतील आसरा' ही गोष्ट वाचली आणि ज्या पत्रांत मी कु. कॅनबी ह्यांच्या कल्पना वापरल्या होत्या तीं पत्रेंहि पुन्हा वाचलीं. त्या पत्रांत मी श्री. ॲनॅग्नोस ह्यांना २९ सप्टेंबर १८९१ सालीं लिहिलेलें एक पत्र आहे. त्या पत्रांतील शब्द व भावना कु. कॅनबी ह्यांच्या हुबेहूब पुस्तकाप्रमाणें आहेत. ज्या वेळीं मी 'सम्राट् शिशिर' ही गोष्ट आणि ह्यांसारखीं पत्रें लिहीत होतें, त्या वेळीं त्यांत वापरलेल्या वाक्प्रचारांवरून आणि शैलीवरून असें वाटतें कीं कु. कॅनबी यांची गोष्ट माझ्या मनांत रुजून बसलेली होती. हिंवाळ्यांतल्या सोनेरी पानांविषयीं बोलतांना मी असें बाईंना म्हणालें होतें 'होय, तीं इतकी सुंदर आहेतच. ह्याचें कारण पुढें येणाऱ्या वसंत ऋतूची ती द्वाही देत आहेत.' ही कल्पना तर जशीच्या तशी कु. कॅनबी ह्यांच्या गोष्टींतली आहे.

जें जें मी ग्रहण करीत असे त्यापैकीं मला आवडलेले सारें आपलेंसें करणें आणि तें जणूं कांहीं माझें स्वतःचेंच आहे अशा रीतीनें वापरणें ही माझ्या पत्रव्यवहारांत व सुरवातीच्या लेखनांत आढळणारी संवय आहे. ग्रीस आणि इटलींतल्या जुन्या शहराच्या वर्णनपर असा मी जो निबंध लिहिला त्यांत थोड्याफार फरकानें मी अनेकांकडून ऐकलेलीं व वाचलेलीं सुंदर वर्णनें आहेत. श्री. ॲनॅग्नोस यांना पुरातन वस्तूंचें मोठें वेड आणि इटली व ग्रीसविषयीं भारी प्रेम. म्हणून मीं वाचलेल्या सर्व पुस्तकांतून त्याविषयींचें संदर्भ आणि काव्य मीं जमा केलें होतें. कारण श्री. ॲनॅग्नोस यांना त्यामुळें आनंद होईल असें वाटे. श्री. ॲनॅग्नोस ह्यांनीं ह्या निबंधाविषयीं बोलतांना असें म्हटलें होतें कीं, "ह्यांतील कल्पना मूलतःच काव्यात्मक आहेत." पण मला हें कळत नाहीं कीं अकरा वर्षांच्या आंधळ्या व मुक्या मुलीला हें सारें सुचेल असें त्यांना वाटलें तरी कसें ? त्या कल्पना जरी माझ्या नसल्या तरी त्यामुळें माझ्या निबंधाची रंजकता कमी होते असें मला मुळींच वाटत

नाहीं. उलट वाचलेल्या सुंदर आणि काव्यमय कल्पना मी इतक्या जिवंत लिहूं शकतें हेंच विशेष.

त्या काळचें सारे निबंध-लेखन म्हणजे एक प्रकारची बौद्धिक कसरत होती. इतर हजारों लहान मुलांच्या प्रमाणें मी ग्रहण करून किंवा अनुकरण करून, शब्दांत विचार गुंफण्याची कला शिकत होतें. जाणीवपूर्वक अगर अजाणतां, पुस्तकांत वाचलेली प्रत्येक सुंदर कल्पना मी माझ्या मनांत सांठवून आत्मसात् करीत होतें. स्टीव्हन्सननें म्हटल्याप्रमणें प्रत्येक तरुण लेखक हा त्याला जें चांगलें वाटतें त्याचें अनुकरण करण्याचा एकसारखा प्रयत्न करीत असतो. आणि त्याला काय आवडते हें अतिशय विस्मयकारक रीतीनें लौकर लौकर बदलत असतें. अशा तऱ्हेनें कित्येक वर्षें संवय केल्या-नंतरच थोर लेखकांनीं शब्दसंपत्तीवर प्रभुत्व मिळविलेलें आहे.

मला वाटतें कीं ह्या अवस्थेंतून मी अजून बाहेर पडलेली नाहीं. हेंहि तितकेंच खरें कीं मी वाचलेले विचार आणि माझे स्वतःचें विचार ह्यांत मला नेहमींच फरक करतां येत नाहीं, कारण जें जें मी वाचतें तें जणूं माझ्या मनाच्या धाग्यादोऱ्यांत विणलें जाऊन माझ्या मनाचाच एक भाग बनतें. ह्याचा परिणाम म्हणून जवळ जवळ माझ्या प्रत्येक लिखाणांत असा कांहीं भाग असतो कीं तुकडे तुकडे जोडून केलेल्या दुपट्ट्याची कळा त्याला येते. सर्व तऱ्हेचे वेड्यावांकड्या आकाराचें तुकडे, रेशमी मखमलीचे आणि जाड्या कापडाचे घेऊन दुपटें केलें जात असे. अर्थातच त्यांत खरखरीत कापडच जास्त असतें. त्याचप्रमाणें माझ्या लिखाणांत माझे खरखरींत ओबडधोबड विचार पुष्कळ, मधून मधून मीं वाचलेल्या लेखनांतल्या चमत्कारिक कल्पना आणि परिपक्व विचार यांची जोड दिलेली दिसते. लिहिण्यासंबंधीं सर्वांत मोठी अडचण मला अशी वाटते कीं शिक्षणानें आपली भाषा सुधारलेली असते; पण त्यांतून, आपल्या गोंधळलेल्या कल्पना, अर्धवट विचार, अपरिपक्व भावना व्यक्त करावयाच्या असतात. चिनी कोडयाप्रमाणें लिहिणें मोठें अवघड असतें. आपल्या मनामध्यें एक आराखडा असतो, आणि तो आराखडा, शब्दांनीं भरण्याची आपली इच्छा असते; पण पुष्कळदां शब्द त्या जागेंत चटकन् बसत नाहींत, तर कित्येकदां ते बसले तर शोभून दिसत

नाहींत. परंतु इतरांना साधले आहे ह्या कल्पनेनें आपण पुन्हा पुन्हा प्रयत्न करीत राहतों. कारण पराभव पत्करण्याची आपली तयारी झालेली नसते.

स्वतःचें असें प्रतिभाशाली लेखन करावयास प्रतिभाशाली लेखक म्हणून जन्माला येणें ह्याखेरीज दुसरा इलाज नाहीं असें स्टीव्हन्सन म्हणतो. लिहिलेलें सारें माझें स्वतःचें नसलें तरी माझ्या या कृत्रिम आणि सजविलेल्या भाषेंतून केव्हां तरी माझें जीवन विकसित होईल अशी मला आशा वाटते. त्या वेळीं कदाचित् माझे विचार आणि अनुभव लेखनाच्या पृष्ठभागावर येतील. तोंपर्यंत 'शिशिर सम्राटा'च्या आठवणीनें माझे प्रयत्न कमी पडूं नयेत ह्याकरितां मी प्रयत्न करीत आहे—आशा बाळगून आहे.

अशा रीतीनें ह्या खेदकारक अनुभवानें लेखनाविषयींच्या मूलभूत प्रश्नाकडे माझें लक्ष वेधलें आणि मला एक चांगलाच धडा शिकविला. ह्यामुळें माझे अत्यंत निकट असे स्नेही श्री. ॲनॅग्नोस ह्यांना मात्र मी मुकलें; ह्याची मात्र मला राहून राहून खंत वाटतें आहे.

माझी कहाणी 'लेडीज होम जर्नल' मध्यें प्रसिद्ध होऊं लागल्यानंतर श्री. मॅसी यांना लिहिलेल्या एका पत्रांत श्री. ॲनॅग्नोस यांनीं असें विधान केले आहे कीं सम्राट् शिशिराच्या वाङ्मयचौर्याच्या प्रकरणांत मी निरपराधी होतें असें त्यांना वाटत होतें. ज्या चौकशी-समितीनें माझ्यावरील संशयाची चौकशी केली, त्यांत आठ मंडळी होती. त्यांतील चार अंध असून चार डोळस होतीं. आठांपैकीं चारांचें मत मी कु. कॅनबीची गोष्ट ऐकली असावी असें होतें. परंतु चारांचें मत मात्र विरुद्ध होतें. श्री. ॲनॅग्नोस असें म्हणाले कीं, ह्यांनीं माझ्या बाजूनें मत दिलेलें होतें.

श्री. ॲनॅग्नोस यांनीं कोणत्याहि बाजूनें मत दिलेलें असो. ह्या चौकशीचा शेवट कसाहि झालेला असो, ज्या खोलींमध्यें श्री. ॲनॅग्नोस यांनीं मला मांडीवर घेऊन माझे कौतुक केलें, माझ्याशीं गप्पा मारल्या, त्याच खोलींत मी जातांच माझ्याविषयीं संशय असलेलीं माणसें तेथें आहेत असें मला वाटलें. माझ्या विषयीं एक प्रकारचें विरोधी व त्रासदायक वातावरण तेथें आहे असें मला वाटलें. मागून घडलेल्या घटनांनीं ते खरेहि ठरले. जवळ जवळ दोन वर्षांपर्यंत मी आणि सुलिव्हॅन बाई निरपराधी आहोंत असा

त्यांचा विश्वास होता असें वाटतें; परंतु कां कोण जाणे नंतर एकाएकीं त्यांनीं आपला निर्णय फिरविला. चौकशीचा शेवट कसा झाला हें मला ठाऊक नाहीं, ती ज्यांनीं केली त्या माणसाचीं नांवें माहीत नाहींत. कांहींहि न समजण्या इतकी मी गोंधळलेली होतें, प्रश्न न विचारण्याइतकी घाबरलें होतें, आणि मला काय विचारलें जात होतें व मी काय उत्तर देत होतें याचा विचारहि करणें मला शक्य नव्हतें.

'सम्राट् शिशिरा'च्या या घटनेचा सविस्तर उल्लेख मीं केला याचें कारण माझ्या शिक्षणांत तिला फार मोठें स्थान आहे. कोणताहि गैरसमज राहूं नये म्हणून मला जें वाटलें तें मीं स्पष्टपणानें मांडलेलें आहे. त्यांत माझी बाजू मांडण्याची किंवा दुसऱ्यावर दोष लादण्याची माझी मुळींसुद्धा इच्छा नाहीं.



— १५ —

'सम्राट् शिशिरा' च्या या घटनेनंतर पुढला हिंवाळा आणि उन्हाळा मी आल्बामा येथें आमच्या घरीं घालविला. अजूनहि त्या आठवणीनें मला आनंद होतो. प्रत्येक गोष्ट जणूं फुलली होती. विकसित झाली होती. मी आनंदी होतें आणि सम्राट् शिशिराबद्दल जें कांहीं घडलें होतें तें सारें मी विसरलें होतें.

सगळीकडे जमिनीवर हिंवाळयामुळें सोनेरी आणि जांभळया पानांचा सडा पडला होता, परिपक्व झालेल्या द्राक्षांचा वास बागेंत भरून उरला होता आणि तेथील कुंज सूर्यप्रकाशांत सोनेरी रंगानें चमकत होते. 'शिशिर सम्राट्' ही गोष्ट लिहिल्यानंतर बरोबर एक वर्षानें मीं माझ्या आयुष्यांतील घटनांचें रेखाटन करण्यास सुरुवात केली.

त्या वेळींसुद्धां लिहिलेल्या प्रत्येक गोष्टीविषयीं मी भारी चिकित्साखोर होतें. मीं लिहिलेली प्रत्येक गोष्ट माझी असेलच असें नाहीं, ह्या विचारानें मी घाबरलें होतें. माझी ही भीति बाईच्याशिवाय कोणालाच माहीत नव्हती. आणि एक प्रकारच्या भावनाशीलतेमुळें शिशिर सम्राट् ह्या गोष्टी-विषयीं उल्लेख मी कटाक्षानें टाळीत होतें. बोलतांनासुद्धां एखादी सुंदर कल्पना माझ्या बोलण्यांत आली तर मी हळूच माझ्या बाईच्या हातावर खुणा करून सांगे कीं, 'ही कल्पना माझी आहे कीं नाहीं देव जाणे.' एखादा परिच्छेद लिहीत असतांना मध्येंच मी स्वतःशीं म्हणे 'हें सर्व मी लिहिलेलें कोणी जर पूर्वी लिहून ठेवलें असेल तर !' आणि एक प्रकारच्या अनामिक भीतीनें माझा हात थांबे आणि पुढें दिवसभर कांहींहि लिहिणें अशक्य होई. अजूनहि केव्हां केव्हां त्या कल्पनेनें मी अस्वस्थ होतें. सुलिव्हॅन बाई माझें

सांत्वन करीत आणि सर्वतोपरि मला मदत करीत. परंतु त्या भयंकर अनुभवानें माझ्या मनावर कायमचा ठसा उमटला होता आणि त्यांच्या परिणामाची तर आतां कोठें कल्पना येऊं लागली आहे. माझा आत्मविश्वास परत मिळावा ह्या उद्देशानेंच बाईंनीं मला ‘ कम्पॅनियन ’ मासिकाकरितां माझें आत्मवृत्त लिहिण्यास प्रवृत्त केलें. त्या वेळीं मी केवळ बारा वर्षांची होतें. त्या वेळीं तें लिहिण्याकरितां केलेली ती धडपड आठवली म्हणजे असें वाटतें कीं त्या आत्मवृत्तांतून निर्माण होणाऱ्या चांगल्या घटनांची मला प्रेषिताप्रमाणें समज आलेली होती. कारण नाहींतर तो प्रयत्न कधींच फसला असता.

मी भीत भीत पण निश्चयानें व बाईंच्या सतत प्रोत्साहनानें तें लिहिलें. बाईंची खात्री होती कीं मी प्रयत्नपूर्वक श्रम केले तर माझे गुण प्रकर्षानें दिसतील आणि माझा आत्मविश्वास वाढेल. सम्राट् शिशिराच्या घटनेपर्यन्त मी एक लहान निरागस छोकरी होतें. परंतु त्यानंतर माझे विचार स्वतःच्याच मूल्यमापनाकडे वळले आणि कित्येक अकल्पित अशा कल्पना करूं लागले. त्यामुळेंच प्रायश्चित्तानंतर शुद्ध होणाऱ्या आणि जीवनाचें विशुद्ध ज्ञान मिळविणाऱ्या मनानें मी त्या प्रसंगांतून बाहेर पडलें.

१८९३ मधील महत्त्वाच्या घटना, म्हणजे प्रेसिडेंट क्लिव्हलँड ह्यांनीं केलेल्या प्रदर्शनाच्या उद्घाटनाकरितां मी वॉशिंग्टनला केलेली सफर आणि नायगारा व जागतिक प्रदर्शन पाहण्याची मिळालेली संधि. त्या परिस्थितींत माझा अभ्यास पुन्हा पुन्हा खंडित होई, आठवड्याच्या आठवडे मागें पडे आणि म्हणून त्याचा सुसंगत असा वृत्तान्त सांगणें अवघड होऊन बसलें आहे.

१८९३ च्या मार्चमध्यें मीं नायगाराचा धबधबा पाहिला. जेथून धबधबा पडतो त्याच्या वरच्या बाजूला उभे राहून त्या धबधब्याच्या जोरानें कंपित झालेली हवा आणि थरथरलेली पृथ्वी मीं पाहिली. त्या वेळीं उत्पन्न झालेल्या भावना शब्दांत आणणें जवळ जवळ अशक्य वाटतें.

नायगाऱ्याच्या धबधब्याच्या सौंदर्यानें मी चकित व्हावें याचें कित्येक लोकांना आश्चर्य वाटतें. कित्येकदां ते मला विचारतात कीं नायगाराचें सृष्टिसौंदर्य किंवा त्याच्या प्रमाथी गर्जना ह्यांचा तुम्हांला काय उपयोग? धांवत येणाऱ्या लाटा तुम्ही पाहूं शकत नाहीं. त्याची उन्मत्त गर्जना ऐकूं शकत नाहीं.

मग तें सौंदर्य तुम्हांला कसें प्रतीत होतें ? अगदीं स्पष्टपणें म्हणावयाचें तर त्या साऱ्या सौंदर्याची प्रचीति मला आलेली आहे. श्रद्धा, प्रेम, चांगुलपणा यांची ज्याप्रमाणें व्याख्या करतां येत नाहीं, त्याचें मोजमाप घेतां येत नाहीं, त्याचप्रमाणें त्या भव्य सौंदर्याच्या प्रचीतीचें आहे.

१८५३ च्या उन्हाळयांत सुलिव्हॅन बाई आणि मी ह्यांनीं डॉ. ॲलेक्झांडर बेल यांच्याबरोबर जागतिक प्रदर्शन पाहिलें. माझ्या हजारों बालिश कल्पना प्रत्यक्ष मूर्त झालेल्या मी पाहिल्या आणि त्यामुळें होणारा निर्मळ आनंद अनुभवला. प्रत्येक दिवशीं मनांतल्या मनांत मी जगाची ट्रिप काढीत असे आणि जगाच्या प्रत्येक भागांतील आश्चर्यचकित करणारे शोध, उद्योगांतून निर्माण होणारी संपत्ति, कौशल्य आणि मानवी जीवनांतील बारीकसारीक हालचाली मी स्पर्शानें अनुभवीत असे.

प्रदर्शनांत 'मिडवे प्लेसन्सला' भेट देणें मला फार आवडे. अरबी भार्षेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टीप्रमाणें तेथें अनेक अजब आणि मनोरंजक गोष्टी होत्या. मी पुस्तकांत वाचलेला हिंदुस्थान येथील बाजारांत प्रत्यक्ष दिसत होता. तेथें त्यांच्या शिवमुद्रा आणि हत्तीचें मस्तक असलेले देव (गणपती) होते. एका कैरो शहराच्या नमुन्यामध्यें पिरॅमिड होते. मशिदी होत्या, उंटांचे काफिले होते. तेथें व्हेनिसजवळचीं शहरें होतीं. प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं त्या कालव्यांच्या शहरांतून आम्ही वल्हवत जात असूं. जागोजाग कारंज्यावर रोषणाई केलेली असे. जवळ नांगरून पडलेल्या एका 'प्रवासी' नौकेवर आम्ही जाऊन आलों. पूर्वी बॉस्टनला असतांना मी एक युद्धनौका पाहिली होती आणि एके काळीं साऱ्या पृथ्वीवर साऱ्या नाविकांचें साम्राज्य कसें चालत असें तें ऐकलें होतें. नाविकं समुद्रा-समुद्रांतून जात, वादळाशीं सामना करीत आणि धैर्यशील अंतःकरणानें सर्व परिस्थितीशीं बुद्धिमत्तेनें सामना देत मार्ग आक्रमीत आणि "आम्ही सारी सागराचीं लेकरें" ही ललकारी देत. स्वतःच्या बुद्धीनें आणि आत्मविश्वासानें ते सामना देत जात. ते सारे अगदीं तन्मय होऊन ऐकले होते. खरोखरच माणसाला सर्वांत जास्त कुतूहल माणसाविषयीं असतें.

ह्या नौकेपासून जवळ कोलंबसाच्या 'सांतामारिया' ह्या नौकेचा एक नमुना करून ठेवण्यांत आलेला होता. नौकेच्या कप्तानानें मला त्यांतील

कोलंबसाची खोली, त्यांचें टेबल आणि घटिका-यंत्र दाखविलें. त्या यंत्राचें मला अतिशय कौतुक वाटलें. क्षणाक्षणानें वाळूंचे कण खालीं पडत आणि झरणाऱ्या प्रत्येक क्षणीं कोलंबसाला मारण्याचे कट चाललेले असत. अशा वेळीं कोलंबसासारख्या शूर नाविकाला त्या वाळूंच्या झरणाऱ्या कणांकडे पाहून काय वाटलें असेल ह्याच्या कल्पनेनेंच मी तल्लीन झालें.

ह्या प्रदर्शनांच्या अध्यक्षांच्या परवानगीनें मला तेथील वस्तूंना हात लावण्याची संधि मिळालेली होती. ज्या अतृप्त आतुरतेनें पिझारोनें पेरु देशांतील खजिने लुटले, त्याच आतुरतेनें त्या प्रदर्शनांतील सारें वैभव मीं माझ्या बोटांनीं अनुभवलें. तें प्रदर्शन म्हणजे साऱ्या जगाचें दर्शन घडविणारी एक युक्तिच होती म्हणा ना. प्रत्येक गोष्टीचें आणि विशेषतः फ्रेंच पुतळ्याचें मला मोठें आकर्षण वाटे. पुतळे माणसांच्या आकाराचे असल्यानें मला राहून राहून असें वाटे कीं तें म्हणजे स्वप्न–नगरींतील कोणी यक्ष-किन्नर असून कलावंतांनीं जादूनें त्यांना पार्थिव मानवी आकारामध्यें अडकवून ठेवलेलें आहे.

प्रदर्शनांतील केप ऑफ गुड होपच्या हिऱ्याच्या खाणीच्या भागांत मला हिरे काढण्याच्या पद्धतीची बरीच माहिती मिळाली. ज्या ज्या वेळीं शक्य होतें त्या त्या वेळीं तीं यंत्रें चालू असतांना मी त्यांना हात लावून पाही आणि त्यामुळें ते दगड कसे मांडले जात, कापले जात आणि तासले जात ह्याची मला कल्पना येई. दगड धुवावयाच्या भांड्यांत हात घालून एकदां तर मी स्वतः एक हिरा बाहेर काढला आणि ते लोक थट्टेनें म्हणाले कीं अमेरिकेंत सांपडलेला हा पहिलाच हिरा आहे.

ह्या सर्व प्रदर्शनांत डॉ. बेल आमच्या बरोबर असत आणि तेथील वस्तूंचें मोठें मनोरंजक वर्णन करीत. विद्युत्–गृहामध्यें आम्हीं टेलिफोन, ऑटोफोन, फोनोग्राफ वगैरें शोधांची माहिती घेतली. तेथेंच डॉ. बेल यांनीं तारेंतून संदेश कसा पाठवितां येतो; तो कोणतेंहि दृश्य साधन नसतांना बिनतारी पद्धतीनें अवकाशाला वेडावीत आणि कालाला मागें टाकीत कसा जातो ह्याचें मनोरंजक वर्णन केलें. होमीथिएसच्या अभिवाणा-प्रमाणें आकाशांतून अग्नि कसा आणतां येतो तेंहि त्यांनीं सांगितलें. नंतर आम्ही पुराणवस्तु विभागाला भेट दिली. तेथील मेक्सिको शहराचे पुरातन

अवशेष आणि ज्या योगानें युग ठरविलें जातें अशीं दगडांचीं ओबडधोबड हत्यारें पाहिलीं. निसर्गाच्या अशिक्षित लेकरांचीं तीं आयुधेंच असावींत असें मला स्पर्शानें वाटे. कालौघामध्यें राजे आणि ऋषि धुळीला मिळाले; परंतु तीं अवजारें मात्र टिकून राहिलीं आहेत. तेथेंच इजिप्शियन ममी (रासायनिक क्रियेनें ठेवलेलीं प्रेतें) सुद्धां होत्या. पण त्यांना हात लावावयास मी कचरलें. मानवाच्या प्रगतीविषयीं मला वाचून किंवा ऐकून जेवढी माहिती मिळाली होती त्यापेक्षां अधिक माहिती मला ह्या अवशेषामुळें मिळाली.

या अनुभवामुळें माझ्या शब्दकोशांत कित्येक नव्या शब्दांची भर पडली. प्रदर्शन पाहण्यांत जे तीन आठवडे मीं घालविले त्यामुळें पूर्वींचीं माझीं खेळणीं आणि परी-कथा यांची आवड एकदम कमी झाली आणि माझ्या मनानें भोंवतालचें खरें खरें वास्तव जग समजावून घेण्याकडे धांव घेतली.



# - १६ -

ऑक्टोबर १८९३ पूर्वीच माझ्या अभ्यासक्रमांतले बहुतेक सारे विषय मीं स्वतःच वाचून संपविले होते. ग्रीस, रोम आणि अमेरिका यांचा इतिहास मीं वाचला. मजजवळ उठावाच्या लिपींत लिहिलेलें एक फ्रेंच भाषेचें व्याकरण होतें. त्याच्या आधारानें मी मनांतल्या मनांत धडे जुळवीत असे. नवीन शब्दाच्या उपयोगाच्या मोहानें व्याकरणाचे नियम कितीदांतरी मी धाब्यावर बसाविले होते. व्याकरणाच्या पुस्तकांत फ्रेंच अक्षरें व त्यांच्या उच्चारांची पद्धत दिलेली होती आणि त्याच्या आधारें मीं फ्रेंच उच्चारहि शिकण्याचा प्रयत्न केला. अर्थातच मुक्या मुलीनें फ्रेंच बोलूं पाहणें हा चिमुकल्या शक्तीनें प्रचंड कार्य करण्याचा हास्यास्पद प्रयत्न होता. पण त्यामुळें पावसाळ्याचे दिवशीं मला घरांत बसल्याबसल्या कांहींतरी उद्योग मिळे. असें करतां करतांच मी प्राथमिक स्वरूपाचें फ्रेंच भाषेचें ज्ञान मिळविलें. 'लॉ फौंटेन'च्या दंतकथा व इतर पुस्तकें मी सहज वाचावयास लागलें.

या काळांत पुष्कळसा वेळ मी माझें बोलणें सुधारण्याकरितां घालविला. सुलिव्हॅन बाईना मी मोठ्यांदां वाचून दाखवीत असे किंवा माझ्या आवडत्या काव्यांतले, मीं पाठ केलेले उतारेच्या उतारे म्हणून दाखवीत असे. बाई माझें उच्चार सुधारून बरोबर उच्चार कसे करावे तें शिकवीत. जागतिक प्रदर्शनासाठीं केलेल्या सफरीमुळें आलेला थकवा घालविल्यानंतर ऑक्टोबर १८९३ मध्यें मी ठरलेल्या विषयांचे तास ठरवून अभ्यास करूं लागलें.

त्या वेळीं पेनिसिल्व्हानियामधील हाल्टन गांवीं विल्यम वेड यांच्या गांवीं मी आणि बाई गेलों होतों, त्यांच्या शेजारीं मि. आयर्न्स नांवाचे एक लॅटिन भाषापंडित राहात असत. त्यांच्या हाताखालीं मी लॅटिनचा अभ्यास करावा असें ठरलें होतें. मि. आयर्न्स हे शिक्षण-क्षेत्रांत विशाल अनुभव असलेले, अत्यंत गोड स्वभावाचे गृहस्थ होते. त्यांनीं मुख्यतः मला लॅटिन

भाषेचें व्याकरण शिकविलें. अंकगणित मला नेहमींच कंटाळवाणें व त्रासदायक वाटे. परन्तु मि. आयर्न्स यांनीं तो विषय शिकण्यास मला फार मदत केली. त्यांच्याच बरोबर मी टेनिसनचे ‘ इन मेमोरियम ’ हें पुस्तक वाचलें. आतांपर्यंत मीं अनेक पुस्तकें वाचलीं होतीं; परन्तु टीकाकाराच्या दृष्टीनें मीं वाचलेलें हें पहिलेंच पुस्तक. त्यांनीं मला प्रथम लेखकाची ओळख, त्याची शैली समजावून दिली. आपल्या मित्राच्या हाताचा स्पर्श जसा आपल्या ओळखीचा वाटतो त्याचप्रमाणें आपल्या आवडत्या लेखकाची शैली आपल्याला कशी ओळखीची वाटते हेंहि सांगितलें.

सुरुवातीला लॅटिन व्याकरण शिकावयास मी जरा नाखूषच होतें. प्रत्येक नव्या शिकलेल्या शब्दाचें विश्लेषण करणें म्हणजे मला निव्वळ वेडेपणा वाटत होता. वाक्याचा अर्थ स्पष्ट कळत असतांना नाम, विभक्ति, वचन, लिंग ह्या साऱ्यांचा खटाटोप काय कामाचा? मला वाटे कीं माझ्या आवडत्या पाळीव प्राण्याचेंहि असेंच विश्लेषण करतां येईल. जात-प्राणी, वर्ग-चतुष्पाद, विभाग-सस्तन, वंश-मांजर, व्यक्ति-टॅब्री ...... साराच वेडेपणा; परंतु जसजसा मी व्याकरणाचा खोल अभ्यास करूं लागलें तसतशी मला त्याची गोडी लागली आणि भाषेचें सौंदर्य मला दिसूं लागलें. मी पुष्कळदां लॅटिन उतारे वाचून त्यांतील ओळखीचे शब्द पाहून त्याच्या आधारें उताऱ्याचा अन्वयार्थ लावण्याचा खेळ खेळत असे. या खेळाचा मला कधींच कंटाळा आला नाहीं.

नवी भाषा शिकतांना त्या भाषेंत प्रथमच प्रतीत होणाऱ्या भावना आणि कल्पनाचित्रें, समजावून घेणें ह्यासारखा सौंदर्यदर्शनाचा मार्ग नाहीं. आपल्या मनाच्या आकाशांत विचारांचे ताफेच्या ताफे तरंगत येतात आणि ढगाप्रमाणें चित्रविचित्र रंग आणि आकार धारण करतात. माझ्या अभ्यासाचे वेळीं सुलिव्हॅन बाई जवळ बसत आणि मि. आयर्न्स यांचें बोलणें माझ्या हातांवर खुणा करून समजावून देत व माझ्यासाठीं नवे नवे शब्द शोधून सांगत. ज्या वेळीं मी अल्बामाला घरीं परतलें त्या वेळीं सीझरचें ‘ गॅलिक वॉर ’ हें पुस्तक वाचावयास मीं नुकतीच सुरुवात केली होती.

◆◆ ◆◆ ◆◆

# — १७ —

१८९४ च्या उन्हाळयांत बहिऱ्या मुलांच्या शैक्षणिक प्रगतीसाठीं स्थापन झालेल्या अमेरिकन असोसिएशनच्या सभेला मी गेलें होतें. त्या वेळीं मी न्यूयॉर्क शहरांत 'राइट ह्मेसिन स्कूल' मध्यें शिकावयास जावें अशी योजना होती. बाईच्या बरोबर ऑक्टोबरमध्यें मी तेथें गेलें. माझी बोलण्याची शक्ति व ओष्ठवाचनाचें शिक्षण ह्यांची प्रगति व्हावी म्हणून मुद्दाम मी ह्या शाळेंत गेलें. त्या शाळेंत मी काढलेल्या दोन वर्षांत वरील दोन विषयांशिवाय मी अंकगणित, भूगोल, फ्रेंच आणि जर्मन हे विषय शिकले.

माझ्या जर्मन शिक्षिका मिस् रीमी ह्यांना हातानें खुणांचीं अक्षरें करावयास येत असत आणि त्यामुळें जर्मन भाषेंत माझी थोडीशी तयारी होतांच आम्ही एकमेकींशीं जर्मनमध्यें बोलूं लागलों आणि थोड्याच अवधींत त्या जवळ जवळ बोललेलें सर्व मला समजूं लागलें. पाहिलें वर्ष संपण्यापूर्वींच मीं अगदीं सहज रीतीनें 'विल्हेम टेल' ही जगप्रसिद्ध गोष्ट जर्मनमध्यें वाचली. येथें इतर कोणत्याहि विषयापेक्षां जर्मन भाषेंत माझी प्रगति जास्त झाली आणि उलट फ्रेंच भाषाच अवघड वाटूं लागली. मादाम ऑलिव्हर ह्या फ्रेंच बाई मला फ्रेंच शिकवीत. त्यांना हातानें अक्षरें करतां येत नसत. त्यांच्या ओठांच्या स्पर्शाच्या अनुरोधानें त्यांचें बोलणें समजणें हें मला फार अवघड वाटूं लागलें होतें आणि त्यामुळें माझा फ्रेंच भाषेचा अभ्यास थोडा मागासलाच होता म्हणा ना. तेथेंच मी 'ला मेडिसिन मालग्रे लुई' हें पुस्तक पुन्हा वाचलें. परंतु 'विल्हेम टेल' इतकें कांहीं मला तें मनोरंजक वाटलें नाहीं.

माझ्या बोलण्यांतली व ओष्ठवाचनांतली प्रगति मात्र आमच्या अपेक्षे-प्रमाणें झाली नाहीं. इतर चारचौघासारखें बोलतां यावें ही माझी आकांक्षा

होती. आणि ती साध्य होईल असें माझ्या शिक्षकांनाहि वाटत होतें. परंतु अतिशय कष्ट करूनसुद्धां, श्रद्धेनें परिश्रम करूनसुद्धां आमची इच्छा संपूर्णपणें सफल होऊं शकली नाहीं. मला वाटतें आमचें ध्येय फार उच्च होतें आणि त्यामुळेंच निराशा अटळ होती. अजूनहि मला अंकगणित हा मोठा फसवा विषय वाटतो. प्रत्यक्ष विचारानें व तर्कानें गणित न सोडवितां मी अंदाजाच्या आधारानें तें सोडविण्याचा प्रयत्न करी; पण तो अंधारं मोठा फसवा असायचा. त्यामुळें मला व इतरांना पुष्कळच त्रास झाला. जेव्हां मी अंदाज करीत नसे, त्या वेळीं एकदम उडी मारून गणिताचें उत्तर सांगावयाचा प्रयत्न करी. माझ्या या चुकीमुळें, माझ्या बुद्धीच्या कमकुवतपणानें यायच्या त्यापेक्षां अधिक व विनाकारण अडचणी माझ्या शिक्षणाच्या मार्गांत आल्या.

पुष्कळदां मी या अडचणींमुळें अगदीं खिन्न होत असे. परन्तु माझ्या इतर विषयांचा अभ्यास मात्र अत्यंत उत्साहानें व रंजकतेनें चालावयाचा. त्यांतल्यात्यांत भूगोल हा माझा आवडीचा विषय. निसर्गाचें रहस्य त्या विषयांतून समजावून घ्यावयाचें. त्यांतल्यात्यांत 'जुन्या करारा' च्या (ओल्ड टेस्टामेंट) काव्यमय भाषेंत ते ऐकावयाचे, याची गंमत औरच." "स्वर्गाच्या चार कोपऱ्यांमधून वारे वाहूं लागतात आणि पृथ्वीच्या दोन्ही टोंकांतून गंध दरवळतो. खडक फोडून नद्या वाहतात आणि प्रचंड मुळयांच्या उसळण्यामुळें पर्वत पालथे पडतात." सारें गमतीदार वर्णन. मानवापेक्षां अधिक प्रबळ असणाऱ्या त्या साऱ्या महाभूतांवर ताबा कसा मिळवावयाचा हाच मूळ प्रश्न असे. न्यूयॉर्कमध्यें मी घालविलेलीं दोन वर्षें मजेंत गेलीं आणि त्यांची आठवण म्हणजे मला एक आनंदाचें कायम निधान होऊन बसलें आहे.

न्यूयॉर्क शहरामध्यें मला फक्त तिथल्या बागाच आवडत असत आणि तिथल्या फिरण्याची मजा तर मला अजूनहि आठवते. त्या प्रचंड बागेंतल्या मजेचा मी एक क्षणसुद्धां चुकवीत नसे. मी न्यूयॉर्कमध्यें नऊ महिने राहात होतें. त्या वेळीं मी रोज बागेंत जाई. बागेंत गेल्याबरोबर त्याचें वर्णन सांगण्यासाठीं मला कोणीतरी बरोबर लागे. कारण त्या बागेच्या प्रत्येक विभागाच्या सौंदर्याचे अनेक पैलू होते आणि त्यामुळें दररोज तेथें फिरतांना रोज नवीनच सौंदर्यदर्शन झालें असें वाटे.

त्या वसंत ऋतूंत आम्हीं खूप सफरी काढल्या. हडसन नदींतून आम्ही बोटीनें फिरलों. तिच्या हिरव्यागार किनाऱ्यावर मन मानेल तसें भटकलों. त्या किनाऱ्याच्या महतीचीं गाणीं ब्रायंट कवीनें गायलीं आहेत. तेथील साधें रानवट पण भव्य सौन्दर्य मला फार आवडे. त्या वेळीं मी तेथील वेस्ट पॉइंट टॅरिटाऊन वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहून घेतलीं.

राइट हुमसन शाळेचे शिक्षक बहिऱ्या मुलांना इतर मुलांच्यासारख्या सुखसोयी कशा करून देतां येतील याच्या योजनेंत सदैव गर्क असत. त्या चिमुकल्या मुलांच्या पंगुपणानें त्यांच्या आयुष्याला एक ठरीव चौकट लाभलेली असते. त्यांतून त्यांना कसें बाहेर काढावें, त्यांच्या मनांतील सुप्तवृत्तींना व गुणविशेषांना जागें कसें करावें याचा विचार त्या शिक्षकांच्या मनांत सदैव घोळत असायचे.

परंतु न्यूयॉर्क सोडण्यापूर्वीच हे आनंदाचे दिवस संपले. त्यावर काळसर छाया आली. श्री. जॉन स्पॉल्डिंग हे आमचे बॉस्टनचे स्नेही फेब्रुवारी १८९६ मध्यें वारले. माझ्या वडिलांच्या मृत्यूनंतर याच्या इतका दुःखाचा मोठा तडाखा मला कोणताच बसला नाहीं. ज्यांनीं त्यांना पाहिलें आहे, त्यांच्या प्रेमळ स्वभावाची ज्यांना जाणीव आहे, त्यांनाच त्यांचा स्नेह किती मोलाचा असे हें पटेल. सहजपणें आणि हंसत खेळत दुसऱ्यालाहि आनंदी करायची त्यांची हातोटी होती. सुलिव्हॅन बाई आणि मी—आम्हां दोघींबद्दलहि त्यांना विशेष जिव्हाळा वाटत असे. जोंपर्यंत त्यांच्या प्रेमळपणाची जाणीव आम्हांला एकसारखी होत होती, जोंवर आमची खात्री होती कीं आमच्या अभ्यासावर, कामावर त्यांची आशीर्वादात्मक छाया होती; जोंवर आमच्यासाठीं तें अडचणींच्याशीं झगडत होते तोंवर आम्ही कधींच निरुत्साही झालों नाहीं. परन्तु त्यांच्या निधनानें मात्र आमच्या जीवनांत कधींहि भरून न येणारी हानि झालेली आहे.



# — १८ —

रॅडक्लिफची—कॉलेजांत जाण्याची—तयारी करण्यासाठीं ऑक्टोबर १८९५ मध्यें मी ' केंब्रिज स्कूल फॉर यंग लेडीज ' मध्यें माझें नांव नोंदवलें.

लहानपणीं मी वेल्स्ली कॉलेजांत गेलें असतांना "मी केव्हांतरी कॉलेजांत जाईनच जाईन; मात्र गेलें तर हॉर्वर्ड विश्वविद्यालयांत जाईन; वेल्स्ली कॉलेजांत नाहीं." अशी घोषणा करून साऱ्या मैत्रिणींना चकित केलें होतें. मी वेल्स्ली कॉलेजांत कां जाणार नाहीं हें त्यांनीं विचारतांच मी म्हणालें कीं, वेल्स्लीमध्यें फक्त मुलीच आहेत. या प्रसंगामुळें कॉलेजांत जाण्याच्या इच्छेनें मनांत मूळ धरलें आणि दिवसेंदिवस ती इच्छा प्रबळ होऊं लागली. आतेष्टांच्या विरोधाला न जुमानतां आपण कॉलेजांत जावें, ज्यांना डोळे आहेत, ज्यांना ऐकूं येतें अशा मुलींच्याबरोबर स्पर्धा करून आपणहि पदवी मिळवावी असें मला एकसारखें वाटूं लागलें. न्यूयॉर्क सोडण्याच्या सुमाराला या इच्छेचें तर ध्येयांत रूपांतर झालेलें होतें आणि मी मनाचा निर्धार केला होता कीं, आपण केंब्रिजला जायचेंच. केवळ त्यायोगेंच हॉर्वर्डला जाण्याची माझी इच्छा, आणि माझी बालिश घोषणा प्रत्यक्षांत येणार होती.

आमचा बेत असा होता कीं केंब्रिजच्या शाळेंत सुलिव्हॅन बाईंनीं माझ्याबरोबरीनें वर्गांत बसावें आणि वर्गांतील धडे मला लगोलग समजावून सांगावें.

केंब्रिज शाळेंतील शिक्षकांना पंगु विद्यार्थ्यांना शिकविण्याचा कांहींच अनुभव नव्हता आणि त्यांच्या ओठांवर हात ठेवूनच मला त्यांच्याशीं बोलणें शक्य होतें. पहिल्या वर्षी मला इंग्लंडचा इतिहास, इंग्रजी साहित्य, जर्मन, लॅटिन, अंकगणित, लॅटिन, निबंध अशांसारखे विषय होते. मीं कॉलेजांत जाण्याच्या दृष्टीनें कधींच अभ्यास केलेला नव्हता; परंतु सुलिव्हॅन

बाईंच्या बरोबर माझा इंग्रजीचा व्यासंग पुष्कळच वाढलेला होता. त्यामुळें कॉलेजांत नेमलेल्या पुस्तकांचा टीकात्मक बुद्धीनें पुन्हा अभ्यास करण्या-पलीकडे मला इंग्रजी भाषा विषयांत फारशी खटपट करावी लागली नाहीं. याशिवाय फ्रेंच शिकायला मीं सुरुवात केली होती. सहा महिने लॅटिनचा अभ्यास केला होता, परंतु सर्वांपेक्षां जर्मन भाषेशीं माझी ओळख अधिक दाट झालेली होती.

हे फायदे तर खरेच; पण त्यापेक्षांहि कठीण अडचणी माझ्या प्रगतीच्या मार्गांत होत्या. पुस्तकांतील सर्व विषयांबाबत, माझ्या हातांवर खुणा करून सांगणें सुलिव्हॅन बाईंना शक्य होत नसे, आणि अभ्यासाला नेमलेलें प्रत्येक पुस्तक उठावाच्या लिपींत छापून घेणें वेळेच्या अभावीं शक्य नव्हतें. लंडन आणि फिलाडेल्फिया येथील माझे स्नेही हें काम जलदीनें करायला तयार होते; परंतु तें वेळेच्या आंत होणें फारसें शक्य दिसत नव्हतें. सुरुवातीला कांहीं दिवस तर माझें लॅटिन व्याकरण मला स्वतःलाच उठावाच्या लिपींत (ब्रेल) लिहावें लागलें. त्यामुळें इतर मुलींच्याबरोबर नियम घोकणें सोपें जाई. हळूहळू माझ्या शिक्षकांना माझ्या अस्पष्ट बोलण्याची संवय झाली आणि ते माझ्या प्रश्नांना सहज उत्तर देऊं लागले, माझ्या चुका सुधारूं लागले. वर्गांत मला टिपणें घेणें किंवा धडे गिरविणें शक्यच नव्हतें. मला दिलेलें भाषांतराचे किंवा निबंधाचे सर्व धडे घरीं मी माझ्या टाइपरायटरवर लिहीत असे.

सुलिव्हॅन बाई दररोज माझ्याबरोबर शाळेंत येत आणि शिक्षकांनीं सांगि-तलेली प्रत्येक गोष्ट अतिशय शांतपणानें माझ्या हातांवर खुणा करून मला सांगत. अभ्यासाच्या वेळांत माझ्यासाठीं त्यांना नवे शब्द धुंडावे लागत, पुन्हा पुन्हा टिपणें व पुस्तकें वाचावीं लागत. कारण ब्रेलमधील पुस्तकें ताबड-तोब मिळणें शक्यच नव्हतें. बाईंच्या सहनशक्तीची ही एक परीक्षाच होती म्हणाना. शाळेचे प्रमुख श्री. गिल्मन व जर्मन शिक्षिका फ्राऊ ग्रोत मात्र मला शिकवण्यासाठीं बोटांनीं करायच्या खुणांची लिपि शिकल्या. या पद्धतींनीं अक्षरें रचून एखादी गोष्ट समजावून सांगणें किती अवघड आहे याची खरीखुरी कल्पना ग्रोतबाईंना आली. त्या स्वभावाने इतक्या चांगल्या होत्या कीं, सुलिव्हॅन बाईंना विश्रांति मिळावी म्हणून आठवड्यांतून दोन वेळां,

अत्यंत परिश्रम घेऊन, त्या मला शिकवीत. प्रत्येकजण माझ्यासाठीं तत्परतेनें मदत करीत होता; परंतु अभ्यासाच्या कंटाळवाणेपणाचें गमतींत रूपान्तर करणारी एकच व्यक्ति होती आणि ती म्हणजे सुलिव्हॅन बाई.

त्या वर्षीं मी अंकगणिताचा अभ्यासक्रम पुरा केला, लॅटिन व्याकरण शिकलें आणि "गॅलिक वॉर" या ग्रंथांतील तीन प्रकरणें वाचलीं. जर्मन भाषेंतील शीलरचीं पुस्तकें कांहीं स्वतः व कांहीं बाईच्या मदतीनें वाचलीं. रिएल, लेसिंग, गटे वगैरे लेखकांचीं कांहीं पुस्तकें वाचलीं. त्यांतल्यात्यांत, वाचलेल्या जर्मन पुस्तकांतील शीलरचीं भावगीतें, थोर फ्रेडरिकचे पराक्रम व त्याचा इतिहास, गटेचें चरित्र वगैरे भाग मला फारच आवडे. 'डायहॅर्झेरिस' ह्या पुस्तकांतील विनोद, द्राक्षलतांनीं भरलेल्या डोंगराचीं वर्णनें, मंजुळ गाणाऱ्या आणि सूर्य प्रकाशांत चमकणाऱ्या ओढ्या झऱ्यांचीं गाणीं आणि केवळ फार फार पूर्वीच्या, दंतकथांतूनच शोभणारीं काल्पनिक वर्णनें मला फार फार आवडत. निसर्गाच्या प्रेमाची ज्यांना प्रत्यक्ष जाणीव आहे, सृष्टीच्या मायेसाठीं जो भुकेला आहे त्या लोकांनाच अशीं वर्णनें करणें साधेल.

कांहीं काळ श्री. गिल्मन मला इंग्रजी साहित्य शिकवीत. त्यांच्याबरोबर 'ॲज यू लाइक इट', बर्कचीं भाषणें, मेकॉलेकृत सॅम्युअल जॉन्सनचें चरित्र वगैरे पुस्तकें मीं वाचलीं. श्री. गिल्मन यांचा इतिहासाचा व साहित्य-शास्त्राचा दांडगा व्यासंग होता आणि ते कोणताहि विषय अगदीं गमतीनें व सोप्या रीतीनें फोड करून सांगत. त्यामुळें यांत्रिक पद्धतीनें टिपणें वाचून किंवा पुस्तकांतील अर्थबोधक टीपा वाचून जेवढें मला समजलें नसतें तेवढें चटकन् समजलें.

राजकीय विषयावरील मीं वाचलेल्या कोणत्याहि पुस्तकापेक्षा बर्कचीं भाषणें मला अधिक उद्बोधक वाटतात. तीं भाषणें वाचतांना दोन युयुत्सु राष्ट्रांच्या जीवनांतील महत्त्वाचा काळ ज्या थोड्या व्यक्तींच्याभोंवतीं केंद्रित झाला होता त्या व्यक्ति आणि तो काळ माझ्या डोळ्यांपुढें उभा राही. वक्तृत्वाच्या ओघामध्यें बर्कचे विचार जसजसे प्रकट होत तसतशी मी अधिकच आश्चर्यचकित होई. बर्कनें राजा जॉर्ज व त्यांचे मंत्री याविषयीं वेळोवेळीं केलेलीं भाकितें, त्यांच्या अधःपाताविषयीं त्यांना दिलेल्या सूचना

ह्यांच्यांतील अर्थपूर्णता पाहिली म्हणजे त्यांनीं त्याकडे कसा कानाडोळा केला याचें गूढ वाटूं लागतें. हें वाचतां वाचतां या महान् मुत्सद्द्यांचे, आपला पक्ष व लोकांचे प्रतिनिधि यांच्याशीं संबंध कसे होते हें मी न्याहाळूं लागे आणि त्या महान् पुरुषानें जीं सत्यें आणि थोर सूक्तें सांगितलीं, तीं अज्ञान आणि लाचलुचपतींनीं बुजबुजलेल्या समाजापुढें कशीं वायां गेलीं ह्याचें मला दुःख वाटूं लागतें.

मेकॉलेकृत "सॅम्युअल जॉन्सनचें चरित्र" मला वेगळयाच रीतीनें मनोरंजक वाटे. एकाकी राहणाऱ्या, दीनपणानें आपला भाकर-तुकडा खाणाऱ्या, श्रम आणि क्रूर अवहेलना ह्यांनीं पीडलेल्या, तरीसुद्धां गरिबासाठीं धडपडणाऱ्या व पीडितासाठीं चार दयेचे गोड शब्द बोलणाऱ्या या माणसाविषयीं मला विलक्षण आस्था वाटे. त्यांच्या दोषाकडे कानाडोळा करून त्यांच्या प्रत्येक यशाचा आनंद मी मानी. त्यांच्यांत दोष नव्हते असे नाहीं; पण त्या दोषामुळें त्यांची ध्येयासक्ति कमी झाली नव्हती किंवा त्यांचा आत्मा अवनत झाला नव्हता. मेकॉलेची ओघवती शैली आणि घडोघडी आढळणाऱ्या परिचित घटनांनाच नवेपणाचा साज चढविण्याची धाटणी मला फार आवडे; पण त्यांच्या वास्तव आणि ठाशीव वर्णनानें कांहीं वेळां कंटाळा येई. कथेला उठाव देण्याकरितां तो सत्याचा अपलाप करायला मागेंपुढें पाहात नाहीं हें दिसल्यामुळेंच, ब्रिटनचा डेमॉस्थेनिस म्हणून ज्या आदरभावानें मी बर्ककडे पाही त्या भावनानें मेकॉलेकडे कधींच पाहिलें नाहीं.

केंब्रिजच्या शाळेंत पहिल्याप्रथमच मी इतर डोळस व धडधाकट मुलींच्यांत राहिलें. शाळेजवळील हॉवेल्स यांच्या घरीं आम्ही कांहींजणी अगदीं घरच्यासारखें राहात असूं. माझ्या मैत्रिणींच्या बरोबर मी पुष्कळशा खेळांत भाग घेई. आंधळी कोशिंबीर आणि बर्फाचे खेळ सुद्धां मी खेळे. त्यांच्याबरोबर मी लांबवर फिरायला जात असे. आमच्या अभ्यासाविषयीं आम्हीं चर्चा करावयाच्या, पुस्तकांतील मनोवेधक भाग एकमेकांना वाचून दाखवाणाऱ्या त्यांचा या प्रेमळ संगती सोबतींत माझा वेळ कसा चटकन निघून जायचा. ह्यांतील कांहीं मैत्रिणी खुणांची भाषा शिकल्या होत्या आणि त्यामुळें बाईंना त्यांचें बोलणें पुन्हा सांगायला लागायचें नाहीं.

त्या वर्षीच्या नाताळांत माझी आई आणि छोटी बहीण माझ्याकडेच राहिल्या. मिल्ड्रेडला तर आमच्याच शाळेंत शिकूं द्यायची परवानगी श्री. गिल्मन यांनीं दिलीं आणि त्यामुळें पुढचे सहा महिने आम्ही एक-मेकींना पळभरहि विसंबलों नाहीं. अभ्यासांत आणि गमतींत आम्हां दोघींचे तासन् तास कसे जात ह्याच्या आठवणीनें मला अजूनहि आनंद होतो.

२९ जून ते ३ जुलै १८९७ ला आमची पूर्व-परीक्षा झाली. परीक्षेला जर्मन, फ्रेंच, लॅटिन, इंग्रजी, ग्रीक आणि रोमन इतिहास असे नऊ पेपर्स होते. ह्या सर्व विषयांत मी पास तर झालेंच पण जर्मन आणि इंग्लिश ह्या भाषा विषयांत सन्मानानें उत्तीर्ण झालें.

मला वाटतें मीं माझी परीक्षा कशी दिली याचें थोडेसें वर्णन येथें अप्रस्तुत ठरणार नाहीं. प्रत्येक विद्यार्थ्याला सोळा तास परीक्षा द्यावी लागे. बारा तास सामान्य विषय व चार तास विशेष अभ्यासाचे विषय असून आणि उत्तीर्ण होण्याला यापैकीं पांच विषयांत एकदम उत्तीर्ण व्हावें लागे. ह्या परीक्षेच्या प्रश्नपत्रिका हॉवर्ड येथें नऊ वाजतां दिल्या जात आणि त्या घेऊन एक खास मनुष्य रॅडक्लिफला येई. प्रत्येक उमेदवाराला क्रमांक दिलेला असे आणि तो क्रमांकानेंच ओळखला जाई. माझा नंबर २३३ होता; पण मी टाइपरायटर वापरत असल्याकारणानें माझा पेपर ओळखणें फारसें अवघड नव्हतें.

टाइपरायटरच्या आवाजानें इतर मुलींना त्रास होईल म्हणून एका वेगळ्या खोलींत मी व एक परीक्षक बसत होतों. खुणांच्या साहाय्यानें श्री. गिल्मन मला प्रश्नपत्रिका समजावून देत आणि इतर कुठलाहि त्रास होऊं नये म्हणून दाराशीं एक पहारेवाला बसवलेला असे.

पहिल्या दिवशीं जर्मनचा पेपर होता. श्री. गिल्मन यांनीं प्रथम सबंध व नंतर एकएक वाक्य याप्रमाणें प्रश्नपत्रिका समजावून दिली. मला प्रश्न बरोबर कळले आहेत याची खात्री करून घेण्यासाठीं तच प्रश्न मी पुन्हा मोठ्यानें म्हणून दाखवित असे. प्रश्न अवघड असत आणि तरीसुद्धां मी माझीं उत्तरें केव्हां एकदां टाइप करतें असें मला होऊन जाई. मीं काय लिहिलें आहे ते श्री. गिल्मन मला वाचून दाखवीत आणि मग आवश्यक असलेले. बदल मी केल्यानंतर ते दुरुस्तीचे कागद योग्य जागीं टांचून ठेवीत. येथें मला

सांगावेसें वाटतें कीं, ह्या साऱ्या सवलती मला पुन्हा कोणत्याहि परीक्षेंत मिळाल्या नाहींत. रॅडाक्लिफला मीं लिहिलेली उत्तरपात्रिका मला कोणीच वाचून दाखवीत नसे आणि त्यामुळें चुकून झालेल्या चुकासुद्धां दुरुस्त करण्याची संधि मला मिळत नसे. अर्थात् एखादे वेळीं माझें लिहिणें लवकर आटोपलें तरच मला पुन्हा उत्तरें वाचतां येत. त्यामुळें पुष्कळदां आठवतील तेवढ्या चुका दुरुस्त करून त्याचें एक टिपण करून ते मीं उत्तर–पात्रिकेला जोडून देई. वार्षिक परीक्षेपेक्षां पूर्व–परीक्षेंत मला अधिक मार्क मिळाले ह्याला दोन कारणें आहेत. एक तर वार्षिक परीक्षेच्या वेळीं माझीं उत्तरें मला पुनः कोणी वाचून दाखवीत नसे. दुसरें कारण म्हणजे पूर्व–परीक्षेच्या विषयांची माझी पुष्कळशी तयारी केंब्रिज शाळेंत येण्यापूर्वीच झालेली होती. वर्षाच्या सुरुवातीलाच मी इतिहास, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन या विषयांत उत्तीर्ण झालें. श्री. गिल्मन यांनीं हॉर्वर्डच्या जुन्या प्रश्नपत्रिकावरून माझी परीक्षा घेतली.

श्री. गिल्मन यांनीं माझ्या उत्तरपात्रिकांवर मी उमेदवार क्रमांक २३३ हिनेंच हें सर्व लिहिलेलें आहे असा शेरा मारून त्या परीक्षकांकडे पाठविल्या.

माझ्या सर्व पूर्व–परीक्षा अशाच पद्धतीनें झाल्या; पण पाहिल्याइतकी अवघड परीक्षा कोणतीच वाटली नाहीं. ज्या दिवशीं लॅटिनचा पेपर होता, त्या दिवशीं प्रश्न हातांत पडतांच प्रो. शिलिंग यांनीं आंत येऊन मला सांगितलें कीं मी जर्मन भाषेंच्या परीक्षेंत उत्तम तऱ्हेनें पास झालें आहे. ह्या बातमीनें माझा उत्साह द्विगुणित झाला आणि शांतपणानें व आनंदी मनानें मी त्या परीक्षेच्या दिव्यांतून पार पडलें.



# - १९ -

गिल्मन शाळेमध्यें दुसऱ्या वर्षाच्या सुरुवातीला मी पास होईन अशी मला नुसती आशाच नव्हे तर जवळजवळ खात्री वाटत होती. पण सुरुवातीच्याच कांहीं आठवड्यांत अनपेक्षित अशा अडचणी येऊं लागल्या. श्री. गिल्मन यांनीं असें मान्य केलें होतें कीं, माझा मुख्य विषय गणित असावा व पदार्थविज्ञान, बीजगणित, भूमिति, खगोलशास्त्र, ग्रीक आणि लॅटिन हे माझे इतर विषय असावे. दुर्दैवानें, शाळा सुरू झाल्यानंतरसुद्धां, ह्या विषयांचीं पुस्तकें उठावाच्या लिपींत लिहून तयार झालेलीं नव्हतीं आणि त्यामुळें मजजवळ अभ्यासाचें मुख्य साधनच नसल्यासारखें झालें होतें. ज्या वर्गांत मी असे, त्यांत पुष्कळ मुलें असल्याकारणानें कुठल्याहि शिक्षकाला माझ्याकडे वैयक्तिक लक्ष देणें शक्य नव्हतें. त्यामुळें सुलिव्हॅन बाईंना स्वतःच सर्व पुस्तकें वाचावीं लागत व वर्गांतील धडे समजावून सांगावे लागत. याच वेळीं पहिल्याप्रथम सुलिव्हॅन बाईंच्या समजावण्याच्या पद्धतींत थोडा अवघडपणा आल्यासारखें मला वाटूं लागलें. अर्थात् आमच्या अकरा वर्षांच्या सहवासांतील हा पहिलाच प्रसंग !

वर्गामध्यें बीजगणित आणि भूमितीचे धडे मला लिहावे लागत आणि पदार्थविज्ञानांतील उदाहरणें सोडवावीं लागत. अर्थातच गणिताची पायऱ्या-पायऱ्यांनीं दाखवायची रीत किंवा इतर धडे, मी माझी ब्रेलपाटी येईपर्यंत लिहूंच शकत नव्हतें. वर्गांत फळ्यांवर काढलेल्या भूमितीच्या आकृति मला दिसणें शक्य नव्हतें आणि त्यामुळें मखमलीच्या कापडांवर जाड तारांच्या साहाय्यानें मी आकृति बनवीत असे. ह्या तारा सरळ अगर वक्र असून टोंकदार व कडेला वांकवलेल्या असायच्या. माझ्या शिक्षणाविषयींच्या श्री. केथ

यांच्या वृत्तान्तांत त्यांनीं सांगितल्याप्रमाणें मला सबंध आकृति, तिला कोपऱ्यावर दिलेलीं अक्षरांचीं नांवें, साध्य व सिद्धान्ताच्या पायऱ्या, सर्व कांहीं मनांतल्या मनांतच करावें लागे. थोडक्यांत म्हणजे प्रत्येक विषयाला नवी अडचण निर्माण झाली असें वाटे. पुष्कळदां मी निराश होई आणि माझ्या ध्येयाशीं विसंगत वागवयाचा विचार मनांत येई. त्याचा परिणाम म्हणून माझ्या ह्या साऱ्या अडचणी मी सुलिव्हॅन बाईंच्यावर राग काढून व्यक्त करूं लागलें. त्या वेळचें माझें वागणें आठवलें कीं मला लाज वाटते; परंतु माझ्या बाबतींत प्रत्येक वाईटाला चांगलें करण्याचा आणि अडचणी पार करण्याचा विडाच बाईनीं उचलला होता. माझ्या सुहृदांत बाईंना अत्यंत प्रेमाचें स्थान असतांनासुद्धां मला त्यांच्यावर राग ओकायची पाळी आली ह्याचा मला राहून राहून खेद होतो.

परंतु हळूहळू साऱ्या अडचणी जाऊं लागल्या. उठावाचीं पुस्तकें आणि अभ्यासाचें इतर साहित्य आलें. पुन्हा नव्या निश्चयानें व जोमानें मी अभ्यासाला लागलें. परंतु बीजगणित आणि भूमिति या विषयांनीं माझ्याबरोबर जणूं दावाच मांडला होता. पूर्वीं मीं म्हटल्याप्रमाणें गणिताची मला पहिल्या-पासूनच फारशी आवड नाहीं. त्यांतच कांहीं अवघड सिद्धान्त मला पहिल्यापासूनच मनासारखे समजावून दिलेले नाहींत. भूमितीच्या आकृति तर मला अगदीं गोंधळांत टाकतात. मला दिसत नसल्याकारणानें आकृ-तीच्या दोन भागांचा एकमेकांशीं काय संबंध आहे हें मला तारांची आकृति काढून सुद्धां कळत नसे. श्री. केथ यांनीं शिकवायला सुरुवात केल्यानंतर मात्र मला गणिताची थोडीफार कल्पना आली.

ह्या अडचणीं मी पार करण्याच्या प्रयत्नांत होतें तोंच एका घटनेनें सारेंच वातावरण बदललें.

माझीं पुस्तकें येण्याच्या थोडे दिवस आधींच श्री. गिल्मन यांनीं मी माझ्या शक्तीबाहेर काम करीत आहें अशी तक्रार करायला सुरुवात केली होती. माझ्या विरोधाला न जुमानतां, त्यांनीं माझे अभ्यासाचे तासहि कमी केले होते. अभ्यासाच्या सुरुवातीला आम्हीं असें योजिलें होतें कीं, जरूर वाटल्यास मीं सारा अभ्यासक्रम पूर्ण करायला पांच वर्षें घेतलीं तरी हरकत

नाहीं; परंतु पहिल्या वर्षाच्या परीक्षेंतील यशानें मला, बाईना, कु. हरबाऊंना ( शाळेंतील मुख्याध्यापिका ) असा विश्वास वाटूं लागला कीं, आणखी दोन वर्षांतच मी सारा अभ्यासक्रम पुरा करूं शकेन. ह्या योजनेला श्री. गिल्मन यांची प्रथम संमति होती, परंतु मला अभ्यास जसा जसा कठीण वाटूं लागला तसतसें ते म्हणूं लागले कीं, मी शक्तीबाहेर काम करतें आहे आणि मी आणखी तीन वर्षें शाळेंत राहावें हें बरें. मला हीं कल्पना मुळींच मान्य नव्हती कारण वर्गांतील इतर मुलींच्या बरोबरच पास होऊन मी कॉलेजांत जावें असा माझा आग्रह होता; हट्टच होता.

१७ नोव्हेंबरला मला थोडें बरें नव्हतें आणि मी शाळेला गेलें नाहीं. माझें आजारपण कांहीं गंभीर नव्हतें हें सुलिव्हन बाईनाहि माहीत होतें; परंतु त्यांचें न ऐकतां श्री. गिल्मन यांनीं माझ्या अभ्यासक्रमांत व वेळापत्रकांत असा बदल केला कीं त्या योगें वर्गांतील इतर मुलींच्या बरोबर मला वार्षिक परीक्षेला बसणें शक्यच नव्हतें. सुलिव्हन बाई आणि श्री. गिल्मन यांच्या मतभेदाचें पर्यवसान शेवटीं माझे व मिलड्रेडचें नांव आईनें शाळेंतून काढून घेण्यांत झालें.

थोड्या अवधीनंतर केंब्रिजचे प्रख्यात शिक्षक श्री. मेर्टन केथ यांच्या हाताखालीं मी अभ्यास पुढें चालूं ठेवावा असें ठरलें. उरलेला सारा हिंवाळा मी व बाईनीं बॉस्टनपासून २५ मैलांवर रेन्थॅम गांवीं आमचे स्नेही चेंबरलेन यांच्या घरीं घालविला.

१८९८ च्या फेब्रुवारीपासून जुलैपर्यंत, श्री. केथ आठवड्यांतून दोनदां रेन्थॅमला येऊन मला बीजगणित, भूमिति, ग्रीक आणि लॅटिन हे विषय शिकवीत; आणि सुलिव्हन बाई ते खुणांनीं समजावून सांगत.

१८९८ च्या ऑक्टोबरमध्यें आम्ही बॉस्टनला परत आलों. नंतर जवळजवळ ८ महिने श्री. केथ मला आठवड्यांतून ५ वेळां, रोज सुमारें तासभर याप्रमाणें, शिकवीत असत. प्रत्येक वेळीं मागील धड्यांतील अवघड भाग ते पुन्हा शिकवीत, नवे धडे देत आणि मी टाइप केलेले ग्रीक धडे घरीं नेऊन सुधारून परत करीत.

ह्याप्रमाणें माझी कॉलेजांत जाण्याची तयारी सुरळीत चालू झाली. वर्गात शिकण्यापेक्षां घरीं एकटेंच शिकणें मला अधिक सोपें व अधिक आनंदाचें वाटूं लागलें. ह्या अभ्यासांत कसलीहि घाई नसे, गोंधळ नसे. मला अवघड वाटणारा भाग पुन्हा शिकविण्याकरितां शिक्षकालाहि भरपूर वेळ असे. त्यामुळें पूर्वीच्यापेक्षां माझा अभ्यास पुष्कळच जलद होऊं लागला; पण ह्या शिकवणींतसुद्धां मला इतर विषयापेक्षां गणित मोठें अवघड वाटे. भाषा आणि साहित्य या विषयांच्या निम्म्यानें जर भूमिति व बीजगणित सोपें असतें तर काय मजा आली असती. परंतु श्री. केथ यांनीं गणित विषयसुद्धां मनोरंजक रीतीनें सांगायला सुरुवात केल्यावर तो विषय माझ्या डोक्यांत शिरूं लागला. त्यांनीं माझी बुद्धि सदैव जागृत आणि चलाख ठेवली. प्रत्येक निर्णय हा स्पष्टपणें, शांतपणें आणि तार्किक रीतीनें घेण्याची संवय लावली. उत्तरें शोधण्यासाठीं पायऱ्या वगळून उड्या मारायच्या आणि या भानगडींत गणित न सुटतांच भलतीकडे वाहावयाचें ही माझी संवय त्यांनींच घालविली. माझी खात्री आहे कीं, कांहीं कांहीं वेळेला माझ्या निर्बुद्धपणानें मी त्यांच्या सहनशक्तीचा अंत पाही. परंतु मी कितीहि वेड्यासारखें वागलें तरी त्यांचें वागणें भारी प्रेमळ व समजुतीचें असे.

२९ आणि ३० जून १८९९ ला मी रॅडक्लिफ कॉलेजमधून वार्षिक परीक्षेला बसलें. पहिल्या दिवशीं मला ग्रीक आणि लॅटिन व दुसऱ्या दिवशीं भूमिति, बीजगणित आणि प्रौढ ग्रीक असे विषय होते.

कॉलेजच्या चालकांनीं सुलिव्हन बाईंना मला पेपर वाचून दाखविण्याची परवानगी दिली नाहीं. प्रश्नपत्रिकेची ब्रेलमध्यें नक्कल करण्याकरितां परकिन्स अंधशाळेचे श्री. व्हायनिंग यांची नेमणूक केली. श्री. व्हायनिंग हे मला अनोळखी होते आणि ब्रेलमध्यें लिहिल्याशिवाय माझ्याशीं संभाषण करणें त्यांना शक्य नव्हतें. देखरेख करणारे तपासनीस हेहि असेच अनोळखी होते व त्यांनींहि माझ्याशीं बोलायचा प्रयत्न केला नाहीं.

भाषाविषयांच्या बाबतींत ब्रेल लिपीचा बहुमोल उपयोग होई; परंतु भूमिति व बीजगणिताच्या खुणांच्या बाबतींत मोठी अडचण उद्भवे आणि त्यामुळें मी गोंधळून जाई, निराश होई. बीजगणिताच्या परीक्षेच्या वेळीं

ह्या खुणांनींच माझा मोलाचा वेळ वायां घालवला. या देशांत वापरांत असलेल्या इंग्लिश, अमेरिकन व न्यूयॉर्क पॉइंट ह्या साऱ्या ब्रेल लिपीच्या पद्धतींशीं माझा चांगला परिचय आहे, हें खरें; पण ह्या तिन्ही पद्धतींत भूमिति आणि बीजगणितांतील खुणा व प्रतीकें याबाबत विलक्षण अंतर आहे. मी मात्र बीजगणिताबाबत सदैव इंग्लिश ब्रेलच्या खुणा वापरीत असें.

परीक्षेच्या आधीं दोनच दिवस श्री. व्हायनिंग यांनीं मला हॉर्वर्ड विद्यालयाचे बीजगणिताचे ब्रेलमध्यें लिहिलेले जुने पेपर्स आणून दिले. त्यांतील साऱ्या खुणा अमेरिकन ब्रेल पद्धतीच्या होत्या. तावडतोब मी श्री. व्हायनिंग यांना पत्र लिहून त्या खुणांचें स्पष्टीकरण मागवलें. दुसरे दिवशीं मला खुणांचें पत्रक मिळतांच मी त्याच्या पाठान्तराला सुरुवात केली. परीक्षेच्या आदल्या रात्रींच मी कांहीं अवघड गणितें सोडवावयाचा प्रयत्न करीत असतांना बीजगणितांतील कंस, महिरप व चौकट या खुणांचा गोंधळ होऊं लागला. श्री. केथ आणि मी दोघेहि, दुसऱ्या दिवशीं परीक्षेच्या वेळीं कसें होणार या काळजीनें खचून गेलों. परंतु दुसरे दिवशीं आम्ही परीक्षेच्या आधीं कॉलेजांत जातांच, श्री. व्हायनिंग यांनीं त्या खुणा मला अधिक स्पष्टपणें समजावून दिल्या.

भूमितीच्या बाबतींत माझी मुख्य अडचण ही होती कीं सारे सिद्धान्त ब्रेल अक्षरानें लिहिलेले वाचायची अगर कोणी तरी माझ्या हातांवर खुणा करून दिल्यावर ते समजावून घेण्याची मला संवय होती. त्यामुळें परीक्षेच्या वेळीं भूमितीचे सिद्धान्त माझ्यासमोर असतांनासुद्धां त्यांचें ब्रेल लेखन मला गोंधळाचें वाटूं लागलें. मी काय वाचतें आहे याचाच मला उलगडा होईना. बीजगणिताचा पेपर तर याहूनहि अवघड होता. नुकत्याच शिकलेल्या साऱ्या खुणांचा घोटाळा होऊं लागला. ह्याशिवाय मी टाईपरायटरवर काय लिहिलें आहे हें मला पुन्हा वाचायलाहि मिळत नव्हतें. माझीं सारीं गणितें मी ब्रेल पाटीवर किंवा मनांतल्या मनांत करीत असे, पण या संवयीमुळें परीक्षेच्या वेळीं मला टाइपरायटरची अडचण भासूं लागली. मनांतल्या मनांत गणितें सोडविण्याच्या माझ्या कुवतीबद्दल श्री. केथ यांना थोडा फाजील विश्वास वाटला होता आणि त्यांनीं मला परीक्षेचीं उत्तरें कशीं सुसंगत लिहावीं हें शिकविलेलें नव्हतें. ह्या साऱ्या अडचणींमुळें माझें लिहिणें

अत्यंत कष्टाचें आणि सावकाश होत होतें. काय करायचें आहे हें समजून घेण्यासाठीं मला प्रत्येक गणित पुनः पुनः वाचायला लागे, आणि खरं सांगायचं तर बीजगणिताच्या साऱ्या ब्रेल खुणा मला आजहि सांगतां येतील किंवा नाहीं ह्याची शंकाच आहे. थोडक्यांत काय त्या दुष्ट खुणांनीं माझें अगदीं डोकं उठायची पाळी आणली होती.

अर्थात् याचा दोष मी कोणालाहि लावत नाहीं. रॅडक्लिफ कॉलेजच्या परीक्षकमंडळानें त्यांच्या नियमामुळें माझी परीक्षा किती अवघड होत आहे, माझ्या पंगुपणामुळें, आंधळेपणामुळें, बहिरेपणामुळें व मुकेपणामुळें मला किती अडचणींच्याशीं सामना द्यायचा आहे याचा विचारच केला नाहीं. त्यांनीं कदाचित् नकळत, हे सारे डोंगर माझ्या मार्गात उभे केले असतील; पण ते ओलांडून गेल्याच्या विजयानंदाचें समाधान मात्र त्यांनीं मला मिळवून दिलेलें आहे.



— २० —

कॉलेजांत जाण्याकरितां केलेली धडपड यशस्वी झाली होती. आतां वाटेल तेव्हां मी रॅडक्लिफमध्यें जाऊं शकत होतें. परंतु प्रत्यक्ष कॉलेजमध्यें नांव दाखल करण्यापूर्वी आणखी एक वर्ष मी श्री. केथ यांच्या हाताखालीं अभ्यास करावा असें ठरल्यामुळें १९०० च्या पावसाळ्यापर्यंत माझें कॉलेजांत जाण्याचें स्वप्न अपुरेंच राहिलें.

कॉलेजांतील पहिला दिवस अजूनहि मला आठवतो. तो सारा दिवस मजेचा गेला. त्या एका दिवसाकरितांच मी कित्येक वर्षें धडपडत होतें. माझ्या मित्रांच्या सांगण्यापेक्षां किंवा इतरांच्या आग्रहापेक्षांसुद्धां माझ्यांतील एका सुप्त व प्रबळ शक्तीनें मला आवाहन देऊन इतर धडधाकट मुलींच्या बरोबरीनें आपली शक्ति जोखून पाहायला लावलें होतें. ह्या माझ्या मार्गांत अनेक अडचणी होत्या; पण त्या पार करण्याचा माझा निश्चय होता. त्या थोर रोमन लोकांचे शब्द मी माझ्या हृदयांत ठसविले होते. "रोम शहरांतून हद्दपार होणें म्हणजे तरी काय? रोम शहराबाहेर राहणें एवढेंच होय." ज्ञानाच्या राजमार्गापासून जबरदस्तीनें दूर करून मला खांचखळग्यांच्या, वहिवाट नसलेल्या वाटेनें जावयाला, माझ्या पंगुपणानें भाग पाडलें होतें; पण माझी खात्री होती कीं, त्या अपरिचित मार्गावरसुद्धां, माझ्यासारख्या धडपडणाऱ्या अनेक मुलींची व माझी गांठ, कोठें कोठें पडणार होती.

माझा अभ्यास मीं उत्सुकतेनें सुरू केला. माझ्या दृष्टीसमोर एक सौंदर्य-पूर्ण व प्रकाशमय जीवन उभें राहिलें. माझ्या अंतःकरणांतील ज्ञाना-भिलाषेची सुप्त शक्ति जागृत झाली. मनाच्या ह्या आंतल्या अद्भुत

जगामध्यें मी इतरांच्या इतकीच मोकळी व स्वतंत्र होतें. बाहेरील कॉलेजच्या सभागृहांत तेथें आजवर होऊन गेलेल्या थोर ज्ञानवंत महात्म्यांचे आत्मे वास करीत आहेत व प्राध्यापक म्हणजे तर मूर्तिमंत ज्ञानदेव आहेत अशी माझी कल्पना होती. अर्थातच माझा अनुभव याहून थोडा वेगळा असला तरी तो मी कोणाला सांगायचा नाहीं असें ठरविलें आहे.

पण लवकरच माझ्या लक्षांत आलें कीं, ज्या सौंदर्यपूर्ण जगाची कल्पना मीं कॉलेजच्या बाबतींत केली होती, त्यापेक्षां प्रत्यक्ष कॉलेज बरेंच वेगळें होतें. माझी लहानपणची कॉलेजाविषयींचीं स्वप्नें, व्यवहारांतील अनुभवाच्या तापानें हळू हळू विरघळत अगदींच क्षुद्र वाटूं लागलीं. याच स्वप्नाकरितां मी लहानपणीं जीव टाकीत होतें याचें पुढें हसूं येऊं लागलें. हळू हळू माझ्या लक्षांत आलें कीं, कॉलेजांत जाण्यांत सोयीपेक्षां गैरसोयच जास्त आहे.

पहिली गैरसोय—जी मला अजूनहि भासते—ती म्हणजे वेळेच्या अभावाची. पूर्वी मला विचार करायला, मनन करायला वेळ मिळे. पूर्वी मी आणि माझें मन, संध्याकाळीं एकत्र बसून माझ्या आत्म्याचें गुंजन ऐकत असूं. हें गुंजन क्वचितच–मन अगदीं मोकळें असतांनाच ऐकूं येतें. अशा वेळीं एखाद्या आवडत्या कवितेचे चरण अंतःकरणांत आपोआप गुंजारव करूं लागतात. मनाची आजवर शांत राहिलेली एखादीच तार झंकार करून उठते. पण कॉलेजांत गेल्यापासून मला ह्या विचारमननाला अवसरच मिळेनासा झाला. कॉलेजांत जाणें म्हणजे केवळ माहिती पदरांत पाडून घेण्याकरितां जाणें. विचारशील बनण्याकरितां नाहीं अशीच जणूं कल्पना तेथें प्रचलित असावी. ह्या ज्ञानाच्या राजवाड्यांत प्रवेश करतांना प्रत्येकाला आपल्या आवडत्या गोष्टी—एकान्त, पुस्तकें, कल्पनाविलास–बाहेर ठेवूनच यावें लागतें आणि व्याकुळ व्हावें लागतें. खरोखर पुढील सुखाचे दृष्टीनें, तें सारें सुख उद्यांकरितां राखून, आज रुक्ष अभ्यासांत मन रमवावें हा विचार मनांत यायला हवा; परंतु आजचा हातचा आनंद गमावून कधीं काळीं येणाऱ्या उद्यांकरितां तें सारें सुख राखून ठेवावें हा दूरदर्शीपणा मला तरी कधींच साधला नाहीं.

पहिल्या वर्षी फ्रेंच, जर्मन, इतिहास, इंग्रजी साहित्य व निबंध हे माझे विषय होते. फ्रेंच भाषेच्या अभ्यासासाठीं मी कॉर्नेली, मोलियर आदि लेखकांची आणि जर्मनसाठीं गटे, शीलर वगैरे लेखकांचीं पुस्तकें वाचलीं. रोमन साम्राज्याच्या अंतापासून तों १८ व्या शतकाच्या अखेरीपर्यंतच्या इतिहासाचा धांवता आढावा घेतला आणि इंग्रजी साहित्याकरितां मिल्टनच्या कविता वाचल्या.

पुष्कळदां लोक मला विचारतात कीं, कॉलेजमध्यें माझ्या पंगुपणामुळें येणाऱ्या अडचणींचा परिहार मीं कसा केला ? वर्गामध्यें माझ्या दृष्टीनें मी एकटीच असायची. टेलिफोनवर बोलत असल्याप्रमाणें प्राध्यापक दूर आहेत असें वाटायचें. ते जितक्या जलद बोलत तितक्याच गतीनें माझ्या हातावर खुणा करून मला विषय सांगितला जाई आणि वेळेशीं चालविलेली ही शर्यत संभाळतां संभाळतां व्याख्यानांतील सारा रस निघून जाई. ससाच्या मागें लागलेल्या कुत्र्याप्रमाणें शब्द माझ्या हातांत धांवत येत आणि त्या कुत्र्यांना जसा ससा बहुधा सांपडत नाहीं तीच अवस्था अर्थाच्या बाबतींत माझी होई.

ज्या मुली वर्गांत एकसारखीं टिपणें घेत असतात, त्या मुलींची अवस्था याहून फारशी वेगळी आहे असें नाहीं. ऐकणें आणि ऐकलेले भराभर कागदावर उतरविणें ह्या यांत्रिक क्रियेंतच मन गुंतल्यामुळें ज्याचा विचार चालला आहे तो विषय किंवा ज्या डौलदार शैलीनें तो मांडला जात आहे ती शैली लक्षांत येणें अवघड होतें. माझ्या हातांवरच्या खुणा समजून घेऊन मी व्याख्यान ऐकत असल्याकारणानें मला टिपणें घेणें शक्यच नाहीं. बहुधा, घरीं गेल्यावर मी माझ्या स्मरणानें टिपणें करतें. रोजचा अभ्यास, धडे, गृहपाठ, सहामाही व वार्षिक परीक्षा ह्यासाठीं मी ब्रेलमध्यें न लिहितां टाइपरायटरवर टाइप करतें. यामुळें मला किती समजलें आहे, हें लक्षांत यायला प्राध्यापकांना सोपें होतें. जेव्हां मी लॅटिन छंदःशास्त्राचा अभ्यास करूं लागलें, तेव्हां मी एक खुणांची पद्धति ठरवून ती प्राध्यापकांना सांगितली व त्या खुणांच्या द्वारें गणमात्रा दाखवूं लागलें.

मी अनेक टाइपरायटरचीं यंत्रें वापरलीं आहेत. परंतु हॅमन्ड टाइपरायटर हाच मला जास्त उपयोगी वाटतो. ह्या यंत्रावर अक्षरें सरकवितां येत

असल्यानें ग्रीक, फ्रेंच किंवा गणित वगैरे विषयांच्या बाबतींत आपल्या इच्छेप्रमाणें सोय करून घेतां येते. ह्या यंत्राविना माझें कॉलेजांत जाणें अशक्यच झालें असतें.

अभ्यासाला आवश्यक असणाऱ्या पुस्तकांपैकीं फारच थोडीं पुस्तकें अंधांच्याकरितां ब्रेलमध्यें छापलेलीं आहेत आणि म्हणून सारीं पुस्तकें मला मात्र दुसऱ्याकडून वाचवून खुणांनीं समजावून घ्यावीं लागलीं. यामुळें इतर मुलींच्या-पेक्षां माझ्या अभ्यासाला अधिक वेळ लागे. या पद्धतीनें वेळ तर लागेच पण क्वचित् घोटाळाहि होई. कित्येकदां चित्त एकाग्र करून तपशील समजावून घेण्याच्या प्रयत्नांत माझ्या मनाला मरगळ येई. एकेक धडा वाचायला मला तासन् तास घालवावे लागतात आणि इतर मुली मात्र एकसारख्या हसतात, खेळतात, नाचतात आणि मजा करतात, या कल्पनेनें माझें मन बंड करून उठतें. पण याला कारण माझाच पंगुपणा, ह्या विचारानें मी माझा असंतोष घालवून पुन्हा उत्साही होत असे. ज्याला खरोखरी ज्ञान-साधना करायची आहे, त्याला अडचणींचे पर्वत ओलांडावे लागणारच. कोणत्याहि शिखराला जायला रुळलेला राजमार्ग थोडाच असणार? मला मंद गतीनें, वेड्यावांकडया वाटेनें जायचें आहे. वाटेंत मी ठेंचाळतें, पडतें पण पुन्हा उभी राहतें. गुपचुप येणाऱ्या संकटांना टाळतें. माझा केव्हां तोल जातो, केव्हां सांवरतो, पण मी चालतच राहतें. थोडें अंतर गेलें, एखादा टप्पा गांठला कीं, त्या चिमुकल्या यशानेंसुद्धां माझा उत्साह द्विगुणित होतो आणि अधिक उंच जाण्याची माझी इच्छा प्रबळ होते. क्षणोक्षणीं विस्तारणारीं क्षितिजें डोळ्यांपुढें दिसूं लागतात. या वाटेवरील प्रत्येक झगडा म्हणजे एक यश आहे. थोडा आणखी प्रयत्न केला कीं, सूर्यप्रकाशांत झळाळणारे ढग व आभाळाची निळावंती मला दिसेल आणि माझें कल्पना-साम्राज्य हाताशींच येईल असें वाटतें. ह्या प्रयत्नांत मी कांहीं एकटी नाहीं, माझ्याबरोबर श्री. विल्यम वेड, पेनिसिल्वानिया अंधशाळेचे प्रमुख श्री. ॲलन हेहि आहेत. त्यांनींच माझ्याकरितां अनेक पुस्तकें उठावाच्या लिपींत करून दिलीं, आणि त्यांचा हा दूरदर्शीपणा त्यांना कल्पनाहि नसेल इतक्या तऱ्हेनें मला उपयोगीं पडला.

गेल्या वर्षी मी रॅडक्लिफ कॉलेजांत दुसऱ्या वर्षाला होतें. मी इंग्रजी निबंध व त्याचें शास्त्र वाचलें. इंग्रजी साहित्य म्हणून बायबल वाचलें व अमेरिका व युरोप येथील शासनपद्धति व लॅटिन सुखान्तिका यांचा अभ्यास केला. इंग्रजी निबंधाचा तास मला सर्वांत जिवंत आणि आनंदाचा वाटे. या विषयाचीं व्याख्यानें भारीं मनोरंजक व विनोदप्रचुर वाटायचीं. कारण ह्या विषयाचे प्राध्यापक श्री. कोपलंड हे इंग्रजी शिकवितांना मूळ लेखनांतील ताजेपणा आणि शक्ति जशीच्या तशी आम्हां विद्यार्थ्यांपर्यंत पोंचवीत. एका लहानशा तासांत, खंद्या लेखकांच्या लेखनांतील अवीट माधुरी ते आम्हांला हळुवारपणानें चाखूं देत. त्यामुळें मूळ लेखकांचे तेजस्वी विचार आपोआप प्रकट होत आहेत असें वाटे. बायबल शिकतांना " जुन्या करारांतील " व्यक्ति विसरल्या तरी, प्रेषिताची मेघगर्जनेसारखी गंभीर वाणी ऐकतांना साकार सौंदर्य आणि संपूर्ण सत्य यांचा साक्षात्कार झाल्यासारखें वाटे. तास संपवून घरीं जातांना देह आणि आत्मा यांच्यामध्यें असणारी अमृतत्वाची सुसंगति मनाला पटलेली असे व उच्च ध्येयाचें दर्शन घडल्यासारखें वाटे. तो ग्रंथ वाचतांना तर जुन्या काळाच्या देठांवरच चिरंतन सत्याचीं नवकमळें फुलल्यासारखें मला वाटे.

हें वर्ष सर्वांत आनंदाचें आहे. कारण या वर्षी मी माझ्या विशेष आवडीच्या विषयांचा अभ्यास करीत आहें. अर्थशास्त्र, एलिझबेथकालीन इंग्रजी वाङ्मय, सारेंच माझ्या आवडीचे विषय आहेत. प्रो. किट्रेज यांच्या हातांखालीं शेक्सपिअर आणि प्रो. राइस यांच्या हाताखालीं तत्त्वज्ञानाचा इतिहास हे विषय मी शिकत आहे. तत्त्वज्ञानाच्याद्वारें माणसाला जगाची सहानुभूतिपूर्ण समज येते, आणि त्यायोगें आजवर परक्या आणि तर्कहीन वाटणाऱ्या जुन्या काळांतील परंपरा आणि विचारपद्धति यांच्याशीं आपला परिचय होतो.

कॉलेज हें विश्वविद्येचें माहेरघर आहे, असें मला प्रथम प्रथम वाटत होतें; पण माझा अनुभव तसा नाहीं. त्या ठिकाणीं थोर आणि ज्ञानी विचारवंतांचा जवळून परिचय होईल अशी आशा असते. पण व्यवहारांत त्यांचें अस्तित्वसुद्धां तेथें आपल्याला भासत नाहीं. भासलेंच तर ते सारे विचारवंत मूक झाल्यासारखे वाटतात. साऱ्या महाविद्यालयीन पंडितांना

असें वाटतें कीं पूर्वीचे थोर विचारवंत खरोखरीच थोर आहेत कीं, त्यांची भ्रष्ट नक्कल आहे हें समजण्यापूर्वी त्यांनाहि परीक्षेच्या महादरवाजांतून न्यायला हवें, त्यांचें विश्लेषण आणि चिकित्सा करायला हवी. पुष्कळसे पाठिक पंडित एक गोष्ट मात्र विसरतात कीं, कोणत्याहि काव्याचें अगर विचाराचें रसग्रहण आपली सहानुभूति जितकी खोल असेल तितकेंच होतें. रसग्रहण केवळ बौद्धिक पात्रतेवर अवलंबून नसून, हृदयावर अवलंबून असतें. या पंडितांनीं इतके परिश्रम घेऊन तयार केलेल्या महान् ग्रंथावरील टीका आपल्या ध्यानांत राहात नाहीं, याचें कारण हेंच असावें. अतिपक्व झालेलें फळ जितक्या सहजपणें फांदीवरून गळून पडतें, तितक्याच सहजपणें आपल्या मनांतून ह्या बौद्धिक स्वरूपाच्या रसरहित टीका निसटून जातात. एखाद्याला झाडाचें मूळ, फांद्या, देठ साऱ्यांची माहिती असेल. झाड कसें वाढतें या पद्धतीचें संपूर्ण ज्ञानहि असेल; परंतु स्वर्गीय दवांत न्हालेल्या ताज्या फुलाच्या सौंदर्याचें रसग्रहण करण्याची अक्कल त्याला कदाचित् असणार नाहीं हें अगदीं शक्य आहे. पुन्हा पुन्हा मी अधीर होऊन विचारीत असें कीं, महाकाव्यावरील ह्या टिपणांशीं, अन्वयार्थाच्या खटपटीशीं माझा काय संबंध? पण दुबळे पंख असलेल्या आंधळ्या पांखराप्रमाणें ते विचार माझ्या मनांत पंख झेपावीत, उडायची धडपड करीत असतात. एखाद्या आपण वाचीत असलेल्या महान् ग्रंथाचें संपूर्ण ज्ञान प्राप्त करावें ह्या कल्पनेला माझा विरोध नाहीं; परंतु त्या कधीं न संपणाऱ्या टीका, आणि गोंधळांत टाकणाऱ्या मल्लिनाथी ह्याला माझा विरोध आहे. कारण त्यांतून एकच गोष्ट आपल्याला कळते ती म्हणजे, जगांत जितकीं माणसें आहेत तितकींच मतें आहेत. मात्र प्रा. किट्रेजसारखे रसग्राही पंडित ज्या वेळीं एखाद्या महान् विचारवंताचे विचार समजावून देत असतात ते ऐकतांना आंधळ्याला नवीन दृष्टि मिळावी तसें आपल्याला वाटतें. वर्गांत शिकवितांना तर ते साक्षात् कविराज शेक्सपिअर आपल्यापुढें उभा करतात.

पुष्कळदां मला शिकायच्या असलेल्या, असल्या निम्म्याअधिक नीरस गोष्टी उडवून लावाव्यात असा मला मोह होतो, कारण अति थकलेल्या मनाला, अत्यंत कष्टानें मिळविलेल्या ज्ञानकोशाचासुद्धां लाभ घेण्याची शक्ति उरत नाहीं. एकाच दिवसांत वेगवेगळ्या भाषेंतील अत्यंत वेगवेगळ्या

विषयांवरील चार-पांच पुस्तकें वाचायची आणि त्यांतील विचारांचें सूत्र तर टिकवावयाचें ही गोष्ट मला जवळ जवळ अशक्यप्राय वाटते. जेव्हां आपण घाईघाईनें, लेखी कसोट्या आणि परीक्षा यांचा बागुलबुवा डोळ्या-पुढें ठेवून घेऊन वाचीत असतों, त्या वेळीं आपल्या मेंदूला हें घेऊं कां तें घेऊं असें होऊन जातें. सध्यांच माझ्या डोक्यांत इतक्या वेगवेगळ्या गोष्टी भरलेल्या आहेत कीं त्या कधीं काळीं व्यवस्थित मांडतां येतील अशी मला आतां खात्रीच वाटत नाहीं. एके काळीं माझ्या मनाचें राज्य ज्या विषयांवर चालत असे त्या विषयांतसुद्धां आज उधळलेल्या बैलासारखी माझी अनुकंपनीय स्थिति होते. ज्ञानाचे हजारों छोटे छोटे कण, विचार-शलाका आणि तुकडे गोफण-गुंड्याचा वर्षाव व्हावा त्याप्रमाणें माझ्या मेंदूवर मारा करीत धांवत येतात. त्यांना मी चुकवूं पाहते; परंतु परीक्षा-विषयांचीं त्रासदायक पिशाच्चें कॉलेजव्यवस्थेच्या गुहांतून माझा पाठलाग करतात. आणि इडापिडा टळो, या पण त्रासामुळें माझ्याच मनांत पुन्हा पुन्हा येतें कीं, ज्या ज्ञानदेवतांची भक्ति करायला मी कॉलेजांत आलें, त्यांच्याच मूर्तींच्या मी रागाच्या भरांत ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून देईन.

परीक्षा—ह्या कॉलेजांतील जीवनाला लागलेल्या सर्वांत मोठ्या जळवा आहेत. मीं पुष्कळदां त्यांच्याशीं सामनाहि केलेला आहे. त्यांना चीत करून धूळहि खायला लावलें आहे. पण हडळीप्रमाणें त्या पुन्हा पुन्हा उठतात. आपलीं फटफटीत तोंडें घेऊन मला सतावतात आणि त्यामुळें शेवटीं माझें सारें धैर्य बोटांच्या टोंकांतून ओघळून जात आहे असें मला वाटूं लागतें. परीक्षांच्या अग्निदिव्यापूर्वींचे माझे कांहीं दिवस न कळणारीं समीकरणें आणि न पचणाऱ्या सनावळ्या पाठ करण्यांत जातात. खरोखरच हा अगदीं न पचणारा आहार असतो आणि शेवटीं तर चिडून असें वाटूं लागतें कीं, तीं पुस्तकें, शास्त्रें आणि आपण स्वतः समुद्राच्या तळांत बुडून मरत कां नाहीं ?

अखेर एकदांची परीक्षेची ती भयंकर घटका भरते. जर आयत्या वेळीं तुम्हीं घोकलेलीं ठरीव उत्तरें तुम्हांला आठवलीं तर तुम्ही अगदीं ईश्वराच्या मर्जीतले आहांत असें म्हणायला हरकत नाहीं. पुष्कळदां असें घडतें कीं तुम्ही मारे शिंग तुताऱ्या वाजवून पाठ केलेल्या विचारांच्या पलटणी बोलावतां, पण तिकडे त्या

मुळींच लक्ष देत नाहींत. ज्या वेळीं आपल्याला स्मरणशक्तीची आणि विवेचक-बुद्धीची अत्यंत आवश्यकता असते त्या वेळीं ह्या दोघीहि पळून जातात आणि मग मात्र मनाची जी कांहीं धांवाधांव आणि जो गोंधळ होतो तो कांहीं पुसूं नका. महत् प्रयासानें ज्या घटना तुम्हीं मुखोद्गत केलेल्या असतात, त्याच नेमक्या आयत्या वेळीं तुम्हांला दगा देतात.

" हसचें थोडक्यांत चरित्र देऊन, त्याची कामगिरी वर्णन करा. " असा विचित्र प्रश्न परीक्षेंत विचारण्यांत येतो. हस ? कोण हा हस ? आणि त्यानें काय केलें ? हें नांव तर कुठें तरी ऐकल्यासारखें, ओळखीचें वाटतें. चिंध्यांच्या गांठोड्यांत रेशमी चिंधोटी शोधावी त्याप्रमाणें पाठ केलेल्या साऱ्या ऐतिहासिक घटनांची बारनिशी तुम्ही पुन्हा पुन्हा तपासतां. तुम्हांला खात्री असते कीं, तुमच्या डोक्यांत अगदीं वरवरच ती माहिती असते. परवांच सुधारणेची सुरुवात शोधत असतांना तुम्हांला ती दिसली नव्हती कां? पण आतां ती माहिती कुठें आहे ? ज्ञानाचे सारे वेडेवांकडे तुकडे आणि कण तुम्ही शोधायला लागतां. राज्यक्रांत्या, फाळण्या, राज्यपद्धति सारे कांहीं सांपडतें, आठवतें; पण पुन्हा " हा हस कोण " हा प्रश्न तसाच राहतो. परीक्षेच्या पेपरांत ज्या गोष्टी विचारलेल्या नाहींत त्या तुम्हांला नेमक्या आठवत असतात. त्यांच्या ज्ञानानें तुम्ही कोणालाहि दिपवूं शकाल; पण उपयोग काय ? शेवटीं एकदां त्राग्यानें तुम्ही आठवणीची सारी पोतडी पालथी करतां. अरेच्या, तो बघा त्या कोपऱ्यांत तो लुच्चा हस आपल्याच विचारांत गुंग होऊन बसला आहे. इकडे तुमच्यावर केवढा आकान्त ओढवला आहे याची त्या बेट्याला फिकीरच नाहीं मुळीं.

आणि त्याच वेळीं परीक्षक येऊन सांगतात कीं वेळ संपली आहे. अत्यंत तिरस्कारानें त्या आठवणीच्या पोतडीवर लाथ मारून तुम्ही सारे ते गबाळ कोपऱ्यांत ढकलतां आणि घरीं चालूं लागतां. ह्या वेळीं तुमच्या डोक्यांत भयंकर क्रांतिकारक विचार घोळत असतात. परीक्षेला बसणाऱ्या मुलांच्या संमतीशिवाय त्यांना वेडेवांकडे प्रश्न विचारायचा ह्या प्रोफेसर लोकांना काय अधिकार ? त्यांचा तो हक्क तावडतोब रद्द करायला हवा.

ह्या प्रकरणाच्या गेल्या दोनतीन पानांमध्यें मी अशा कांहीं उपमा वापरल्या आहेत कीं त्या माझ्यावर उलटून माझेंच हंसें करतील असें वाटतें.

त्या पाहा, त्या उपमा मला वेडावून दाखवीत आहेत. उधळलेला बैल, गोफणगुंड्याचा मारा, फटफटीत चेहऱ्याच्या हडळी. किती किती सांगूं ? पण जाऊं दे. ह्याच शब्दांनीं माझ्या डोक्यांतील परीक्षेबाबतच्या घोळणाऱ्या विचारांचें योग्य वर्णन होणार आहे. तेव्हां तिकडे कानाडोळा करायला हवा. फार तर मला असें सांग आणतां येईल कीं, कॉलेजबाबतचे माझे विचार आतां पुष्कळच बदललेले आहेत.

रॅडक्लिफ कॉलेजांत जाण्यापूर्वी कॉलेज–जीवन एका रम्य स्वप्न सारखें मला भासत होतें. आतां त्यांतील सारी मजा लोपली आहे. त्या स्वप्नापासून ते प्रत्यक्ष व्यवहारापर्यंतच्या ह्या प्रवासांत मी कित्येक नव्या गोष्टी शिकलें आहे. हा प्रयोग मी केला नसता तर त्या मला कधींच शिकतां आल्या नसत्या. एक गोष्ट मात्र मी अचूक शिकलें आणि ती म्हणजे धीर धरण्याचें शास्त्र. आपण रानावनांत फिरतांना जितक्या सहजपणें, गंमतीनें भोंवतालच्या सृष्टीचें आतुरतेनें ग्रहण करीत जातों, तितक्याच सहजपणें आपण शिक्षण घ्यायला हवें. अशा सहजपणें घेतलेल्या ज्ञानांतूनच खोल विचारांच्या निःशब्द लाटां-मध्यें आपला आत्मा न्हाऊन जातो. ज्ञान ही शक्ति आहे. ज्ञान म्हणजेच सुख आहे, कारण विशाल आणि खोल ज्ञान म्हणजे तरी काय ? खोट्यापासून खरें ओळखणें, क्षुद्रापासून उच्च वेगळे समजणें व माणसाच्या प्रगतीची पाऊलवाट ज्या विचारांनीं आणि कृतींनीं मळलेलीं आहे, ते विचार आणि त्या कृति समजावून घेणें. थोडक्यांत म्हणजे शतकानुशतकें चाललेल्या मानव-तेच्या हृदयाचीं स्पंदनें जाणणें. स्वर्गमार्गाकडे चाललेल्या ह्या अखंड प्रयत्नांच्या पराकाष्ठेची ज्याला ओळख पडली नाहीं, त्या माणसाला जीवनांतील सुसंगति आणि माधुरी कळलीच नाहीं, त्याच्या घरीं ज्ञानगंगा येऊनहि तो कोरडाच राहिला असें म्हणावसें वाटतें.



# – २१ –

येथवर मीं माझ्या आयुष्यांतील आठवणींचें चित्रण केलें. परंतु माझ्या ह्या जीवनांत मी पुस्तकावर किती अवलंबून आहे हें सांगावयाचें राहिलेलें आहे. पुस्तकांतून केवळ ज्ञान मिळतें किंवा मनोरंजन होतें म्हणून मला पुस्तकें लागतात असे नव्हे, तर इतर माणसें ज्या गोष्टी आपल्या डोळयांनीं पाहतात किंवा कानांनीं ऐकतात त्या गोष्टीसाठीं मला पुस्तकांचाच आश्रय घ्यावा लागतो. इतर मुलांच्या मानानें माझ्या शिक्षणांत पुस्तकांना फारच मोठें स्थान आहे आणि म्हणून मी प्रथम वाचावयास लागलें. तेव्हां-पासूनची वाचनाची कथा मुद्दाम सांगतें.

मीं सात वर्षांची असतांना १८९७ च्या मेमध्यें पहिली सबंध गोष्ट वाचली. तेव्हांपासून तों आजपावेतों माझ्या भुकेल्या बोटांना मिळालेलें प्रत्येक ब्रेल पुस्तक मीं वाचून टाकलें आहे. पूर्वी मीं म्हटल्याप्रमाणें सुरुवातीला कित्येक वर्षें मी नियमित अभ्यास करीत नसे किंवा वाचीत नसे.

पहिल्या प्रथम मजजवळ उठावाच्या लिपींतील फारच थोडीं पुस्तकें होतीं. शाळेंत लागणारीं वाचनमालेचीं पुस्तकें, लहान मुलांच्या कांहीं गोष्टी आणि ‘आमचें जग’ म्हणून पृथ्वीचें वर्णन करणारें एक पुस्तक एवढींच पुस्तकें होतीं. तीं मी पुन्हा पुन्हा इतके वेळां वाचून काढी कीं उठावाच्या टिंबावर हात फिरवून फिरवून तीं पुस्तकें झिजून जात. त्यामुळें त्याचीं अक्षरेंहि नीट दिसत नसत. कांहीं वेळां सुलिव्हॅन बाई वाचून दाखवीत किंवा हातावर खुणा करून छोट्या छोटया गोष्टी आणि कविता सांगत; पण दुसऱ्यानें वाचण्यापेक्षां आपलें आपण वाचावें आणि जें आपल्याला आवडतें तें पुन्हा पुन्हा वाचावें अशी मला मोठी हौस वाटे.

बॉस्टनला पहिल्या प्रथम आम्ही गेलों, त्या वेळीं माझ्या वाचनाला खरी सुरुवात झाली. दररोज थोडा वेळ तरी मी संस्थेच्या वाचनालयांत घालवीत असे आणि पुस्तकाच्या एका कपाटापासून दुसऱ्या कपाटाकडे फिरत राही. हातीं लागेल तें पुस्तक घेई आणि हावऱ्यासारखी वाचून टाकी. मग त्या पुस्तकांतील सर्व भाग कळो वा न कळो. केवळ शब्दांचेंच मला आकर्षण वाटे आणि पुष्कळदां त्यासाठीं मी अर्थ न समजतांच वाचीत राही. त्या काळीं माझें मन मोठें संस्कारक्षम असावें. कारण ह्या काळीं वाचलेले पुष्कळ शब्द आणि वाक्येंच्या वाक्यें माझ्या मनांत ठसलेलीं आहेत. त्या वेळीं त्यांच्या अर्थाविषयीं मला फारशी जाणीवहि नव्हती. पुढें मी जेव्हां बोलावयास आणि लिहावयास लागलें, त्या वेळीं हे शब्द आणि हीं वाक्यें अगदीं सहजपणानें माझ्या तोंडीं येत आणि त्यामुळें माझ्या शब्दसंपत्तीविषयीं माझ्या मित्रांना मोठें आश्चर्य वाटे. त्या काळीं मी सबंध पुस्तक वाचीतच नसे. अनेक पुस्तकांतील थोडे थोडे भाग मीं वाचलेले होते. ह्याच पद्धतीनें मीं पुष्कळशी कविता वाचली. मी समजून वाचलेले आणि ज्यांचे कायम परिणाम माझ्यावर झाले, तें पहिलें पुस्तक म्हणजे ' लिट्ल लॉर्ड फॉन्टलॉरी. '

एके दिवशीं वाचनालयाचें एका कोपऱ्यांत ' स्कार्लेट लेटर ' हें प्रसिद्ध पुस्तक मी वाचीत बसलें असतांना बाईंनीं पाहिलें. त्या वेळीं मी सुमारें आठ वर्षांची होतें. आणि बाईंनीं 'छोटी पर्ल तुला आवडते का' असा प्रश्न विचारून पुस्तकांतील अवघड शब्द समजावून दिले व ह्या पुस्तकांपेक्षांहि अधिक सुंदर एका छोट्या मुलाची गोष्ट आहे असें त्या म्हणाल्या. त्या गोष्टीचें नांव " छोटा वनराजा " ( लिट्ल लॉर्ड फॉन्टलॉरी ). हें पुस्तक पुढच्या उन्हाळ्यांत वाचून दाखविण्याचें बाईंनीं कबूल केलें, परंतु जवळ जवळ ऑगस्टपर्यन्त आम्हांला तें वाचावयास झालें नाहीं. पहिले कांहीं आठवडे समुद्रावरील नव्या नव्या गोष्टी पाहण्यांत व तेथी मजा लुटण्यांत मी त्या पुस्तकाचें भानच विसरलें होतें. त्यानंतर कांहीं दिवस मला एकटीला सोडून बाई बॉस्टनला गेल्या होत्या.

बाई परत आल्यानंतर आम्हीं पहिली कोणती गोष्ट केली असेल तर गोष्ट वाचायची. ह्या अत्यंत मनोरंजक गोष्टींचीं पहिलीं प्रकरणें आम्हीं कोणत्या

जागीं, कोणत्या वेळीं वाचलीं हें माझ्या अगदीं स्पष्टपणें लक्षांत आहे. आमच्या घरापासून जवळ असलेल्या दोन पाईन वृक्षांमध्यें टांगलेल्या झोपाळ्यावर बसून ऑगस्ट महिन्यांतील उबदार दुपारीं आम्हीं गोष्ट वाचण्यास सुरुवात केली. गोष्ट वाचण्यास जास्तींत जास्त वेळ मिळावा म्हणून दुपारचीं जेवणें आटोपल्याबरोबर आम्ही घाईघाईनें पळालों. झोपाळ्याकडे जातांना वाटेंत लागणारें लांब गवत पायानें तुडवितांना कित्येक टोळ आमच्या कपड्यांना चिकटत आणि ते झटकून काढल्याशिवाय बाई वाचायला बसत नसत अंगावरचे टोळ झटकणें हा वेळेचा अपव्यय आहे असें मला राहून राहून वाटे.

झोपाळ्यावर पाईन वृक्षांचीं सूचीपर्णे पडलेलीं असत. कारण बाई गेल्यापासून आम्हीं झोपाळा वापरलाच नव्हता म्हणाना. त्या वेळीं सूर्याचीं उबदार किरणें पाईन वृक्षांवर पडून त्यांतील सारा सुगंध खेचून काढत होतीं व हवा चिकट-खारट वाटत होती. गोष्ट वाचण्यापूर्वी त्यांतल्या मला न कळणाऱ्या गोष्टी बाईनीं समजावून सांगितल्या आणि वाचता वाचता त्यांतील अवघड शब्द समजावून दिले. सुरुवातीला पुष्कळसे शब्द अनोळखी वाटत आणि त्यामुळें पुन्हा पुन्हा वाचन थांबवावें लागे. पण एकदां सारी घटना लक्षांत येतांच मी गोष्टींत इतकीं रंगून गेलें कीं मला शब्दाचें भानच उरलें नाहीं आणि त्यामुळें जे शब्द समजावून सांगणें बाईना महत्त्वाचें वाटे, त्या शब्दाबाबत सुद्धां बाईचें म्हणणें मला न ऐकण्याची घाई होई. कांहीं वेळेला खुणा करून करून बाईचीं बोटें थकून जात. त्या वेळीं मात्र मला माझ्या पंगुपणाची अतिशय चीड येई. मी हातांत तें पुस्तक घेऊन त्याच्या पानांवरून अत्यंत उत्कंठेनें हात फिरवीत असे. ती उत्कंठा मला आजहि विसरतां येत नाहीं.

पुढें माझ्या विनंतीवरून श्री. ॲनॅग्नोस यांनीं ती गोष्ट उठावाच्या लिपींत लिहून दिली आणि ती मला जवळ जवळ पाठ होईपर्यन्त मी पुन्हा पुन्हा वाचली. माझ्या साऱ्या बालपणांत ‘ लिट्ल लॉर्ड फॉन्टलॉरी ’ हा ग्रंथ माझा जिवलग मित्र बनून राहिला होता. ह्या पुस्तकाचें कंटाळवाणें होईल इतकें वर्णन मीं अनेकवार केलें आहे. ह्याचें कारण माझ्या पूर्वीच्या अस्पष्ट वाचनापेक्षां आणि पूर्वी वाचलेल्या पुस्तकांच्या आठवणीपेक्षां या पुस्तकाची आठवण पुष्कळच स्पष्ट आहे.

ह्या पुस्तकापासूनच माझ्या वाचनाला खरीखुरी सुरुवात झाली. पुढील दोन वर्षांत आमच्या घरीं आणि बॉस्टनमध्यें मीं अनेक पुस्तकें वाचलीं. ती कोणत्या क्रमानें वाचलीं आणि त्यांतील विषय काय होते हें माझ्या नेमकें लक्षांत नाहीं. परंतु त्या पुस्तकांत ग्रीक नेते, लॉ फौन्टेनच्या दंतकथा, जगांतील आश्चर्याबाबतचें एक पुस्तक, बायबलमधील गोष्टी, लॅंबकृत शेक्सपिअरमधील गोष्टी, डिकन्सनें मुलांसाठीं लिहिलेला इंग्लंडचा इतिहास, अरबी भाषेंतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी; पिलग्रिम्स प्रोग्रेस, रॉबिन्सन क्रुसो आणि पुढें मी जर्मन भाषेंत वाचलेली ' हाय डी ' ही कथा, वगैरे पुस्तकें होतीं. शाळा आणि खेळ ह्यांमधल्या वेळांत मीं हीं पुस्तकें मोठ्या आनंदानें वाचलीं. त्यांचा अभ्यास केला नाहीं किंवा चिकित्साहि केली नाहीं. हीं पुस्तकें उत्तम रीतीनें लिहिलीं होतीं का ? त्यांना विशेष शैली होती का ? किंवा त्यांचे लेखक कोण होते ? इ. माहिती काढण्याच्या फंदांत मी फारशी पडलें नाहीं. त्यांनीं आपले सारे ज्ञानकोश माझ्या पायाशीं ओतलेले होते आणि जितक्या सहज रीतीनें सूर्यप्रकाश अगर मित्रप्रेम ह्यांचा आपण स्वीकार करतों तितक्याच सहज रीतीनें मी त्यांचा स्वीकार केला होता. मी 'लिटूल वुइमेन' फार आवडीनें वाचीत असे. कारण त्यामुळें ज्यांना ऐकूं येते अगर दिसतें अशा मुलांच्या बरोबरीची मी आहें अशी जाणीव मला येई. माझ्या भोंवतीं पसरलेल्या जगाची ओळख करून घेण्याकरितां मला पुस्तकांकडेच धांव घ्यावी लागे. कारण माझें आयुष्य माझ्या पंगुपणानें मर्यादित केलें होतें.

मला ' पिलग्रिम्स प्रोग्रेस ' किंवा ' फेबल्स ' ह्या पुस्तकांची फारशी कदर वाटली नाहीं. मला वाटतें मी ' पिलग्रिम्स प्रोग्रेस ' पुरें वाचलेलेंहि नाहीं. ला फौन्टेनच्या ' फेबल्स 'चें इंग्रजी भाषांतर प्रथम मीं वाचलें आणि त्यांतील सौंदर्य मला अर्ध्यामुर्ध्या स्वरूपांतच दिसलें. नंतर मी तेंच पुस्तक फ्रेंच भाषेंत वाचलें. त्यांतील शब्दचित्रें आणि भाषेवरचें असामान्य प्रभुत्व जरी मला आवडलें तरीं तें पुस्तक पूर्वीपेक्षां जास्त परिणामकारक वाटलें नाहीं. कां कोणास ठाऊक ! परंतु ज्या गोष्टींमधून प्राण्यांना माणसांच्या सारखें बोलाचालावयास लावलें असतें अशा गोष्टी मला फारशा आवडत नाहींत. त्यांतील प्राण्यांचीं विनोदी शब्दचित्रें मला आवडतात. परंतु त्यांतून सुचविलेलें तथ्य फारसें पटत नाहीं.

खरें बोलावयाचें तर आपल्या उच्च नैतिक कल्पनांना “ लॉ फौन्टेन ” कधीं आवाहन करतो आहे असें वाटतच नाहीं. त्याच्या लेखनांतील उच्च स्वानें छेडलेली तार म्हणजे तर्काची किंवा आत्मप्रीतीची असते. त्याच्या साऱ्या दंतकथांतून एकच विचार प्रगट झालेला दिसतो. तो म्हणजे माणसाची नैतिकता त्याच्या आत्मप्रीतीवर, स्वार्थावर अवलंबून असते. जर आपल्या आत्मप्रीतीला योग्य दिशा दाखविली किंवा तिला तर्काचा आधार दिला तरच त्याच्या मतें तो सुखाचा राजमार्ग ठरतो. माझ्या कल्पनेप्रमाणें मात्र आपली आत्मप्रीति हीच आपल्या साऱ्या दुःखाला कारण असते. अर्थातच मी चूक असण्याचा पुष्कळ संभव आहे. कारण भोंवतालच्या माणसांचें निरीक्षण करण्याची पुष्कळ संधि ला फौन्टेनला मिळाली होती आणि तशी संधि मला मिळणें फारसें शक्य नाहीं. त्यांतील उपरोधपूर्ण दंतकथांवर माझा फारसा आक्षेप नाहीं; परंतु सृष्टींतील महान् सत्यें माकडें आणि कोल्हीं ह्यांच्याकडून शिकविलीं जातात, त्यावर मात्र माझा अवश्य आक्षेप आहे.

परंतु मला ‘ जंगलबुक ’ आणि “मला माहीत असणारीं रानटीं जनावरें” यासारखीं पुस्तकें आवडतात. मला ह्या प्राण्यांच्याविषयीं खरीखुरी आवड आहे. कारण ते खरेखुरे प्राणी आहेत, माणसांची भ्रष्ट नक्कल नव्हे. त्यांच्यांतील प्रेम आणि द्वेष आपल्याला पटतो. त्यांच्या सुखान्तिकेनें हसूं येतें. दुःखांतिकेनें रडूं येतें. आणि ह्यांतून जर एखादें तात्पर्य निघत असलें तर तें इतकें सहजपणानें निघतें कीं, त्याची जाणीव आपल्याला सहसा होत नाहीं.

साहाजिकच माझें मन पुराणवस्तु व भूतकाळ ह्यांमध्यें रस घेऊं लागलें. ग्रीस ह्या ऐतिहासिक महान् देशानें माझ्या मनाची अगदीं अद्भुत रीतीनें पकड घेतली होती. माझ्या कल्पनासृष्टींत, तेथील देव आणि देवता पृथ्वीवर चालतांना, माणसांशीं प्रत्यक्ष बोलतांना मला दिसतात. माझ्या हृदयांत त्यांतील मला आवडणाऱ्या व्यक्तींच्या चिरसहवासाकरितां, मी गुपचुप स्मृति-समाधी बांधून ठेवीत असते. माझी खात्री होती कीं, त्या जलदेवता, ते वीर पुरुष, यक्ष, साऱ्यासाऱ्यांची माझी ओळख होती. साऱ्यांवर माझें प्रेम होतें. पण सगळे देव तसे नव्हते खास. कारण मेडा आणि जेसन ह्यांचा दुष्टपणा

आणि लोभ हे क्षमा न करण्याइतके रानटी होते. मला ह्यांचें राहून राहून नवल वाटतें कीं, देव त्यांना दुष्कृत्यें करावयास प्रथम परवानगी कां देतो, आणि मागून त्या दुष्ट कर्मांबद्दल त्यांना शासन तरी कां करतो. अर्थात् हें कोडें मला अजूनहि सुटलेलें नाहीं.

ग्रीस देश, माझ्या कल्पनेंतला स्वर्ग होण्याला 'ईलियड' कारणीभूत झालें आहे. मी तें पुस्तक वाचण्यापूर्वीच मला ट्रॉयची कथा माहीत होती त्यामुळें एकदां व्याकरणाचें कुंपण ओलांडतांच ग्रीक शब्दांची अडचण मला भासत नसे आणि त्या शब्दांतील सारा सुंदर शब्दकोश माझ्यापुढें ओतला जाई. आपलें मन जर रसग्राही आणि संवादी असेल तर महाकाव्य—मग तें ग्रीक भाषेंत असो, अगर इंग्रजी भाषेंत असो; तें समजण्याला कांहीं दुभाष्याची आवश्यकता वाटत नाहीं. जे लोक आपल्या विश्लेषणांनीं, चिकित्सेनें किंवा प्रचंड टीका-टिपण्यांनीं साऱ्या महाकाव्यांतील रस घालवून, राग येण्याइतके ते शुष्क करतात, त्या लोकांनीं ही एक साधी गोष्ट लक्षांत घ्यावी कीं, एखादी सुंदर कविता समजण्याकरितां किंवा तिचें रसग्रहण करतांना त्यांतील प्रत्येक शब्दाची व्याख्या करावयाची किंवा वाक्यांतील विधेय शोधण्याची अगर प्रत्येक शब्दाचें वाक्यांतील व्याकरणाच्या दृष्टीनें स्थान ठरविण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. मला ठाऊक आहे कीं, माझ्या विद्वान् प्राध्यापकांना 'ईलियड' मधील सौंदर्याच्या खाणी माझ्यापेक्षां अधिक सांपडलेल्या आहेत; परंतु त्यांच्या विशाल आणि सर्वग्राही ज्ञानानें ते त्या महाकाव्यांतून त्यांना मिळणारी माधुरी मोजूं शकत नाहींत आणि मीहि नाहीं. ज्या वेळीं 'ईलियड' मधील एखादा सुंदर उतारा मी वाचतें त्या वेळीं माझ्या या अकुंचित पंगु जीवनाच्या चौकटींतून सुटून मी एक प्रकारच्या उच्च वातावरणांत जात असल्याची जाणीव होते. माझ्या शारीरिक मर्यादांच्या शृंखला गळून पडतात. माझें विश्व वर उंच दिसूं लागतें. आणि साऱ्या स्वर्गांचा पसारा आपलासा झाला वाटतें.

मला 'ईलियड' संबंधीं तशीं फारशी प्रशंसा करावयाची नाहीं; परंतु त्याच्याबद्दल थोडाच पण खराखुरा आदर मला आहे. टिपणें किंवा शब्दकोश यांच्याशिवाय त्या पुस्तकांतील जितका भाग वाचतां आला तितका मी वाचला. त्यांतील आवडत्या भागांचें भाषांतर करणें मला नेहमींच आवडते.

कित्येकदां ' व्हर्जिलचीं शब्दचित्रें ' मला विलक्षण सुंदर वाटतात. त्यानें रेखाटलेले देव आणि मानव सारेच, वासना, प्रयत्न, करुणा आणि प्रेम या भावभावनांच्या चक्रात गुंतूनसुद्धां, सुंदर जीवन जगतांना दिसतात. जणूं एलिझाबेथच्या काळांतील डौलदार आकृति; परंतु ईलियड ' मध्यें त्याच व्यक्ति अगदीं वेगळ्या रीतीनें गात-बागडतांना दिसतात. चांदण्यांत संगमरवराचा मूर्ति पुतळा असावा, त्याप्रमाणें व्हर्जिलच्या लेखनाची प्रकृति शांत आणि सुंदर वाटते. सूर्यप्रकाशांत जो उभा आहे आणि ज्याचें केस वाऱ्यानें भुरभुरत आहेत अशा एखाद्या सुंदर, उसळत्या आणि उमद्या तरुणाप्रमाणें मला होमर वाटतो.

कल्पनेचे पंख लावून कागदांवर उडणें किती सोपें आहे नाहीं? पण ' ग्रीक हीरोज ' पासून ' ईलियड ' पर्यंतचा माझा प्रवास कांहीं क्षणार्धात झाला नाहीं, किंवा तो सर्वस्वीं सुखाचाहि नव्हता. मी दमून थकून माझ्या अभ्यासाचा कंटाळवाणा रस्ता व्याकरणाच्या आणि शब्दकोशाच्या चक्रव्यूहां-तून काढीत होतें. वाटेंत जागोजाग ज्ञानार्थी विद्यार्थ्यांना चुकविण्याकरितां, फसविण्याकरितां, शाळा-कॉलेजांनीं नेमलेल्या, परीक्षेच्या खांचखळग्यांत पडत होतें. माझ्या समजुतीनें ह्या अवधींत कोणीहि कितीतरी वेळां सहज पृथ्वीप्रदक्षिणा केली असती. मला वाटतें अशा तऱ्हेची साधना किंवा यात्रा अंतीं सफळ होत असावी. त्या रस्त्यानें जातांना ठायीं ठायीं जरी मला आनंद आणि अद्भुतरसाचे झरे वळणावळणांवर भेटले तरीसुद्धां तो शिक्षण-क्रमाचा रस्ता कधीं संपत असेल हें मला केव्हांहि खरेंच वाटलें नाहीं.

मला बायबल समजूं लागण्यापूर्वीच मी तें वाचायला सुरुवात केली होती. त्या ग्रंथांतील, अद्भुत वाटेल इतक्या सुसंवादी, सौंदर्याकडे माझ्या मनानें इतके दिवस पाठ कशी फिरविली ह्याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें. अजून मला पक्कें आठवतें कीं पावसाळ्यांतल्या एका रविवारीं मला सकाळीं कांहींच काम नव्हतें आणि म्हणून माझ्या चुलत बहिणीला मी बायबलमधील एक गोष्ट वाचून दाखविण्याकरितां विनंती केली. मला गोष्ट कळेल अशी कांहीं तिला खात्री नव्हती. तरी तिनें हातांवर खुणा करून ' जोसेफ आणि त्यांचे भाऊ ' ही गोष्ट सांगण्यास आरंभ केला. कां कोण

जाणे पण त्या गोष्टींत मला गंमत वाटेना. ती अनोळखी भाषा आणि पुनरुक्ति यामुळें ती गोष्ट मला अवास्तव आणि परक्या दूरदेशांतील वाटूं लागली. त्यामुळें गोष्ट ऐकतां ऐकतां मला झोप लागली. गोष्टींतले भाऊ, रंगीबेरंगी कोट घेऊन जेकबच्या तंबूंत येऊन त्याला दुष्ट आणि खोट्या गोष्टी सांगण्याच्या आंतच मी डुलक्या घेत निद्रादेवीच्या राज्यांत दूरवर भटकत होतें. ग्रीकांच्या गोष्टी मला इतक्या सुंदर वाटतात आणि बायबल्‌मधल्या गोष्टी मला इतक्या नीरस कां वाटतात हें एक कोडेंच आहे. कदाचित् हें शक्य आहे कीं बॉस्टनला असतांना माझी कित्येक ग्रीक लोकांशीं ओळख झालेली होती. त्यामुळें त्याच्या देशाविषयीं गोष्टी ऐकण्याची मला इच्छा झाली असेल. मी कोणत्याहि हिब्रू आणि इजिप्शिअन माणसाला भेटलें नव्हतें. त्यामुळें तीं सारीं माणसें रानटी असून त्यांच्या कथा ह्या खोट्या बनविलेल्या असतात, असा माझा ग्रह झाला होता. बायबल-मधील पुनरुक्ति आणि विचित्र नांवें ह्यांचा उलगडाहि त्याच ग्रहानें मी करीत होतें; पण गमतीची गोष्ट ही कीं ग्रीकांच्या कथा अगर नाटकें यांना मात्र मला विचित्र म्हणवत नव्हतें.

ह्यानंतर प्रत्यक्ष वाचनांत बायबलमधील केवढें तरी वैभव मला दिसलें, त्याचें काय वर्णन करूं ? क्षणोक्षणीं वाढणाऱ्या आनंदानें आणि स्फूर्तीनें कित्येक वर्षे मीं तें वाचलें आहे. आणि इतर कोणत्याहि पुस्तकांपेक्षां मला तें अधिक आवडते. असें असून सुद्धां बायबलमध्यें असा बराच भाग आहे कीं ज्याविरुद्ध माझ्या आत्म्याच्या साऱ्या शक्ति बंड करून उठतात. अव्वलपासून अखेरपर्यंत तें वाचलेंच पाहिजे असा आग्रह धरला जातो, याचा मला खेद होतो. मला बायबलमधील तपशीलाच्या तुलनेनें त्यांतून मिळविलेलें इतिहासाचें ज्ञान तोकडेंच वाटतें. ह्या महान् पुराण–ग्रंथांना खोटें पाडावें अशी माझी मुळीं सुद्धां इच्छा नाहीं; परंतु ह्या भूतकालांतील वाङ्मयांतून जेवढा किळसवाणा आणि रानटी भाग आहे तो सारा गाळून टाकावा असें श्री. होवेल्स यांच्याप्रमाणें मलाहि वाटतें.

" ईस्थर " मधील रोखठोक सरळपणा आणि साधेपणा यांत विलक्षण परिणामकारकता आहे. ज्या प्रवेशामध्यें ईस्थर दुष्ट लॉर्डपुढें उभी राहते,

त्या प्रवेशाहून आधिक नाट्यमयता कोठून असणार ? ईस्थरला ठाऊक असतें कीं तिचें रक्षण करणारा कोणीही पाठीराखा नसतो. परंतु स्त्रीसुलभ भीतीवर जय मिळवून, देशभक्तीनें प्रेरित होऊन ती त्याच्याकडे जाते. तिच्या मनांत एकच विचार असतो. 'मेले–गेले तर मी एकटीच मरेन, पण जगलें तर माझा सारा देश जगेल !'

रोझची गोष्ट अगदी पौर्वात्य वळणाची आहे. इराणच्या राजधानींतील लोकांपेक्षां ह्या साध्या भोळया खेडुतांचें जीवन किती तरी वेगळे आहे ? रूथ इतकी दिलदार आणि इमानी असते कीं तिच्यावर प्रेम करण्याविना आपल्याला गत्यंतरच उरत नाहीं. डुलत्या शेतांत कापणीला ती उभी राहिली म्हणजे तर असें वाटतेंच वाटतें. त्या दुष्ट अंधाऱ्या युगांत एखादा तारा चमकावा त्याप्रमाणें तिचा सुंदर, निःस्वार्थी आणि तेजस्वी आत्मा चकाकत असतो. समाजांतील संघर्षाच्या आणि खोल रुजलेल्या वांशिक, पूर्वग्रहाच्या पलीकडे जाऊं शकते तें रूथसारखें प्रेम, ह्या जगांत दुर्मिळच असावयाचें !

बायबलच्या वाचनामुळें मला एक प्रकारचें खोल समाधान लाभतें कीं भोंवतीं दिसणाऱ्या वस्तु तात्कालिक व क्षणभंगुर आहेत. परंतु अदृश्य अशा वस्तु अमृतस्वरूपी आहेत.

पुस्तकांवर प्रेम करण्याची संवय मला लागली आणि तेव्हांपासूनच मीं शेक्सपिअरवर प्रेम करण्यास सुरुवात केली. लॅम्बकृत शेक्सपिअरच्या कथा मी केव्हां वाचण्यास सुरुवात केली हें मला आठवत नाहीं. पण इतकें मात्र खरें कीं लहान मुलाच्या विस्मयपूर्ण उत्सुकतेनें मीं त्या वाचल्या. मॅकबेथचा माझ्यावर सर्वांत जास्त परिणाम झाला. पहिल्या वाचनांतच ह्या गोष्टींतील सारे तपशील माझ्या स्मरणांत ठसून बसले. इतके कीं पुढें कित्येक दिवस भुतें आणि चेटकिणी माझ्या स्वप्नांत येत असत. माझ्या डोळ्यासमोर लेडी मॅकबेथचा चिमुकला गोरापान हात आणि तो खंजीर खरोखरी दिसूं लागे आणि तो रक्ताचा भयंकर डाग; त्या दुःखानें दिङ्मूढ झालेल्या राणी इतकाच, मलाहि खरा वाटे.

मॅकबेथनंतर मी 'किंग लिअर' वाचलें. त्यांतील ग्लॅस्टरचे डोळे

काढतात तों प्रवेश वाचीत असतांना माझा भयानें झालेला थरकांप मी विसरणें शक्य नाहीं. तें सारें वाचतांना माझा राग अनावर होई. माझीं बोटें संतापानें थबकून पुढें जाऊंच शकत नसत. बराच वेळपर्यंत मी तशीच ताठ बसे. माझीं कानशिलें गरम होत आणि एखाद्या लहान मुलाला जितक्या जास्तींत जास्त द्वेष वाटणें शक्य आहे तितका सारा माझ्या हृदयांत मी सांठवून घेई.

त्याच सुमाराला माझी शायलॉक आणि सेटन यांची ओळख झालेली असावी. कारण त्या दोन्ही व्यक्ति माझ्या आठवणींत नेहमींच साहचर्यानें वावरतात. मला त्यांचे विषयीं वाईट वाटे. त्यांना मदत करावयाला किंवा खराखुरा वाव द्यायला कोणीच तयार नसल्यानें त्यांना त्यांच्या इच्छा असूनहि चांगलें होतां येणें शक्य झालें नसावें असें मला ढोबळपणें वाटे. त्यांचा संपूर्णपणें निषेध करणें आजहि माझ्या मनांत येत नाहीं. कित्येक वेळां मला असें वाटे कीं, —शायलॉक, आणि खुद्द सैतान हे म्हणजे भलेपणाच्या चाकाच्या तुटलेल्या आऱ्या आहेत आणि कधीं काळीं त्या जरूर जोडल्या जाणार आहेत.

शेक्सपिअरच्या पहिल्या वाचनानंतर कित्येक कडु आठवणी मनांत घोळत असाव्या ह्याचें मला आश्चर्य वाटतें. त्याची कल्पनारम्य आणि तेजस्वी नाटकें—जी मला आजहि अत्यन्त आवडतात—त्यांचा माझ्यावर प्रथम दर्शनीं फारसा अनुकूल परिणाम झाला नाहीं, याचें मला नवल वाटतें. कदाचित् आपल्याला संवयीचा झालेला सूर्यप्रकाश आणि बालकाच्या जीवनांतील आनंदीपणा ह्याचेंच प्रतिबिंब त्यांत असल्यामुळें असें झालें असावें. मुलांच्या स्मरणाइतका विनाकारण चंचल असणारा दुसरा पदार्थच नसतो व माझी आठवणहि तशीच चंचल असावी. त्या आठवणींत काय राहील आणि काय विसरेल ह्याचा नेम नाहीं.

त्यानंतर मीं शेक्सपिअरचीं नाटकें पुष्कळदां वाचलीं. त्यांतला कांहीं भाग तोंडपाठहि केला; पण त्यांतील मला सर्वांत काय आवडतें हें आतां सांगणें कठीण आहे. माझी मनःस्थिति जशी जशी बदलते तसतसा वेगवेगळ्या नाटकांच्या वाचनानें होणारा आनंद कमीजास्त होत असतो. नाटकाइतकीच

त्यांतील लहान लहान गाणीं आणि सुनीतें मला अर्थपूर्ण आणि सदैव फुललेलीं वाटतात. शेक्सपिअर मला इतका आवडतो खरा; पण त्यावरील टीकाकारांनीं आपल्या टीकांतून आणि मल्लीनार्थीतून दिलेला सारा अर्थ त्याच्या ओळींतून शोधणें मला मोठें कंटाळवाणें वाटतें. त्याच्या प्रत्येक वाक्याचें अनेक अन्वयार्थ लक्षांत ठेवण्याचा मी प्रयत्न करी. परंतु त्यामुळें माझा उत्साह मावळून मी गोंधळून मात्र जाई. म्हणून मी माझ्या मनाशीं असा गुप्त करार केला होता कीं, पुन्हा म्हणून या फंदांत पडावयाचें नाहीं. मात्र प्रो. किट्रेज ह्यांच्या हाताखालीं शेक्सपिअरचाच अभ्यास करतांना मात्र मी हा करार कांहीं काळ मोडला होता. शेक्सपिअरच्या लेखनांत आणि ह्या जगांत, मला समजत नाहींत अशा किती तरी गोष्टी आहेत. अशाहि किती तरी गोष्टी आहेत कीं, ज्यावरचीं आवरणांमागून आवरणें पटापट दूर झालीं आणि माझ्यापुढें विचार आणि सौंदर्याचें एक नवें विश्वच उभें राहिलें.

काव्याच्या खालोखाल मला इतिहासाची आवड आहे. माझ्या हातीं लागलेलें इतिहासाचें प्रत्येक पुस्तक मीं वाचलेलें आहे. ऐतिहासिक घटनांच्या शुष्क याद्या, ऐतिहासिक सनावळींचीं कोरडीं दफ्तरें ह्यापासून तों तहत 'हिस्ट्री ऑफ इंग्लिश पीपल' ह्या ग्रंथांपर्यंत, फ्रीमनच्या युरोपच्या इतिहासापासून तों इमर्सनच्या 'मिड्ल एजेस' ह्या ग्रंथापर्यंत मीं सारें वाचलें. माझ्या तेराव्या वाढदिवशीं मला भेट म्हणून आलेल्या 'वर्ल्ड हिस्टरी' ह्या पुस्तकांतून पहिल्याप्रथमच मला इतिहासाची किंमत समजूं लागली. हें पुस्तक आतां फारसें विश्वासार्ह मानलें जात नाहीं. तरीहि तें मीं अजूनहि माझ्याजवळ काळजीपूर्वक ठेवलेलें आहे. मानवाचे वंश देशा-देशांतून कसे पसरत गेले ? त्यांनीं भव्य शहरें कशीं उभारलीं ? कांहीं थोड्या राज्यकर्त्यांनीं—भौतिक महाशक्तींनीं म्हणा ना—सारें विश्व आपल्या पायांखालीं कसे दाबून टाकलें होतें ? सारी राज्यशक्ति त्या राजांच्या अंगांत कशी एकवटलेली असे. त्यांच्या एका निर्णायक शब्दानें हजारों लोकांना सुखाचे राजमार्ग खुले होत, तर त्याच वेळीं त्यांच्याच शब्दानें कित्येक लोकांना ते बंदहि कसे होत. वेगवेगळ्या देशांनीं कला आणि ज्ञान यांचे बाबतींत कसे प्रयत्न केले आणि येणाऱ्या युगांच्या महान् प्रगतीचा पाया कसा घातला. मानवी

संस्कृति एक प्रकारच्या हीन युगाच्या प्रलयांतून कशी खालावली आणि पुनर्जीवी 'फेनिक्स' पक्ष्याप्रमाणें, पुन्हा उत्तरेकडील लोकांमध्यें कशी वर आली? स्वातंत्र्य, सहानुभूति आणि शिक्षण ह्या योगांनीं साऱ्या जगाच्या उद्धाराचा मार्ग विचारवंतांनीं कसा शोधला ही सारी हकीकत मला त्या पुस्तकांवरूनच समजली.

कॉलेजांतील वाचनामुळें माझा फ्रेंच आणि जर्मन वाङ्मयाशीं थोडाफार परिचय आहे. जर्मन लोक सौंदर्यापेक्षां शक्तीला आणि परंपरेपेक्षां सत्याला रोजच्या व्यवहारांत आणि वाङ्मयांत अधिक मानतात. त्यांच्या प्रत्येक कृतीमध्यें एक प्रकारचा घणाघातीं जोर आणि आवेश असतो. जर्मन साहित्यिक हा बोलतो ते इतरांवर छाप पडावी म्हणून नव्हे तर ते बोलले नाहींत, त्याच्या हृदयांत जळणारे ते विचार सांगितले नाहींत तर त्याचें हृदय फुटून जाईल, म्हणून तो बोलतो.

शिवाय जर्मन वाङ्मयांत एक प्रकारची सूक्ष्म व सुंदर सूचकता आहे. अगदीं आवश्यक तेवढें सांगण्याची वृत्ति आहे; पण त्यांचें खरें वैभव म्हणजे त्यांनीं स्त्रियांच्या आत्मत्यागी प्रेमाच्या सुप्तशक्तीचा केलेला गौरव हें होय. ह्या विचारांचें जर्मन साहित्यांत सर्वत्र प्राबल्य आढळतें. आणि हाच विचार एक प्रकारच्या आध्यात्मिकतेनें गटेनें 'फॉस्ट' ह्या काव्यांत मांडलेला आहे.

मीं वाचलेल्या फ्रेंच लेखकांत मला मोलियर फार आवडतो. समुद्र-कांठच्या वाऱ्याच्या झुळकींत जो मोकळेपणा आणि जी सुंदरता असते तीच, ब्लझाक आणि मेरीमीच्या उताऱ्यांतून सांपडते. मला व्हिक्टर ह्युगोची फार प्रशंसा करावीशी वाटते. जरी व्हिक्टर ह्युगो हा मला आवडणाऱ्या-पैकीं एक नसला तरी त्याची प्रतिभा, त्याची बुद्धिमत्ता व त्याचा सौंदर्यवाद मला फारच आवडतो. ह्यूगो, गटे आणि साऱ्या देशांतले सारे महाकवि हे माझ्या दृष्टीनें एकच अमर संदेश सांगत असतात. अत्यन्त नम्र व आदर-भावांनीं माझा आत्मा त्यांच्या पाठोपाठ अशा प्रदेशांत जातो कीं, तेथें सत्य, शिव आणि सुंदर ह्यांची एकरूपता झालेली असते.

मला वाटते कीं, माझ्या पुस्तकमित्रांविषयीं मीं पुष्कळच लिहिलें आणि तरीसुद्धां त्यामध्यें मला फार फार आवडणाऱ्या लेखकांचाच नामनिर्देश

आलेला आहे. ह्यावरून कोणाला असेंहि वाटेल कीं, माझ्या स्नेहाचें वर्तुळ भा·ीच आकुंचित, लोक-जीवनाशीं समरस न होणारें, आणि लोकशाहीला न शोभणारें असावें; परतु ही कल्पना अगदीं चुकीची आहे. मला प्रत्येक लेखक वेगवेगळ्या कारणाकरितां आवडतो. कार्लाइल त्याच्या रोख-ठोक वृत्तीकरितां आणि भलत्या लाजेच्या आहारीं न जाण्याच्या प्रवृत्तीबद्दल आवडतो. वर्डस्वर्थ मानव आणि निसर्ग ह्यांची एकता वर्णन करीत असतो. हूडच्या आश्चर्यजनक शैलीनें मला नेहमींच आनंद होतो. हेरिकच्या काव्यांतील अनोळखी आणि लिलीच्या किंवा गुलाबाच्या फुलासारखा सुगंध, व्हिटिअरमधील उत्साह आणि नैसर्गिकता मला फार पसंत पडते. माझी आणि व्हिटिअरची ओळख होती, आणि त्या आमच्या मैत्रीच्या आठवणीमुळेंच त्या कविता वाचण्यांतील आनंद द्विगुणित होतो. मार्क ट्वेन मला फारच आवडे. बाकी कुणाला त्याची आवड नाहीं म्हणा? देवाचें-सुद्धां त्याच्यावर प्रेम आणि म्हणूनच त्यांनीं त्याच्या मनांत सर्व तऱ्हेचें ज्ञान ओतलें. परंतु त्या ज्ञानाच्या योगें तो कदाचित् निराशावादी होईल, म्हणून त्यानें त्याच्या हृदयांत प्रेम आणि श्रद्धा ह्यांचें इंद्रधनुष्य उभारलें. स्कॉटच्या कवितांतील ताजेपणा, व प्रामाणिकपणा उल्लेखनीय आहे. ' लोवेल ' प्रमाणें ज्या ज्या लेखकांचीं अंतःकरणें आशावादानें उसळत असतात, ज्यांच्या मनांत आनंद आणि सत् प्रवृत्तींचीं कारंजीं उडत असतात, क्वचितच एखादा रागाचा फणकारा आला तरी सहानुभूति आणि करुणेचा सांत्वन करणारा फवारा ज्यांच्या मनांतून उडत असतो, असे लेखक मला फार फार आवडतात.

थोडक्यांत म्हणावयाचें तर साहित्य हें माझें स्वप्नसाम्राज्य आहे. तेथील मतदानाचा माझा हक्क कोणींहि रद्द केलेला नाहीं. माझ्या ग्रंथप्रेमाला कोणतेहि खोटे भाव किंवा पंगुपण यांचें कुंपण दूर राखूं शकत नाहींत. माझे ग्रंथमित्र माझ्याशीं गोंधळून न जातां, थोडेंसुद्धां अवघड न बनतां बोलत असतात. ह्या पुस्तकांनीं माझ्यावर उधळलेल्या प्रेमाच्या आणि स्वर्गीय दानाच्या मानानें मीं इतरत्र मिळविलेलें ज्ञान अगदीं हास्यास्पद होईल, इतकें तोटकें आहे आणि म्हणूनच पुस्तकाचा आणि माझा स्नेह अखंडित चालू आहे.



# - २२ -

मागील प्रकरणांवरून वाचन हा माझा एकमेव छंद आहे असा निष्कर्ष वाचकांनीं काढला नसेल अशी मला आशा आहे. माझे छंद अनेक आणि बहुविध आहेत.

ह्या पुस्तकांत अनेक वेळां मी माझे मैदानी खेळांविषयीं आणि मोकळ्या ग्रामीण जीवनाविषयीं प्रेम व्यक्त केलें आहे. मी अगदीं लहान असतांना पोहायला आणि वल्हवायला शिकलें. उन्हाळ्यांत रेंगथॅंग ( मॅसेच्युसेट्स ) येथें असतांना मी जवळ जवळ बोटींतच राहात होतें असें म्हणायला हरकत नाहीं. मला भेटायला जेव्हां स्नेही मंडळी कोणी येतात, तेव्हां त्यांना बोटींतून फिरावयास नेण्यांत मला अतिशय आनंद होत असे. अर्थातच मला बोट चालवितांना नीट दिशादर्शन करतां येत नव्हतें, आणि म्हणून मी वल्हवीत असतांना कोणीतरी पुढें बसून सुकाणू सांभाळावें लागतें. कांहीं वेळां मी सुकाणूं न वापरतांच वल्हवीत जात असे. पाणझुडपें आणि लिली ह्यांच्या वासानें आणि किनाऱ्यांवर उगविणाऱ्या झुडुपांच्या अनुरोधानें बोट चालविण्यांत फार गंमत असते. चामडी पट्टयांनीं कड्यांत जखडलेलीं वल्हीं मी बहुधा वापरतें. पाण्याच्या प्रतिरोधावरून वल्हीं सारखीं राहिलीं आहेत कीं नाहीं हें मला समजतें. ह्याच पद्धतीनें मी प्रवाहाविरुद्ध चाललें आहे कीं काय हेंहि समजतें. वारा आणि लाटा ह्यांच्याशीं झगडण्यांत मला फार मौज वाटते. आपली छोटी निर्भय बोट आपली इच्छा आणि शक्ति हिला अनुसरून चमकत्या डुलत्या पाण्यावरून सहजपणें पुढें न्यावयाची आणि पाण्याच्या शांत पण हुकुमी प्रवाहाची मजा अनुभवाची यापरतें सुख कोणतें ?

मला नौकाविहार आवडतो. चांदण्या रात्रीं नौकाविहार करावयास फारच आवडतें असें मी म्हटल्यावर तुम्हीं मला मनांतल्या मनांत हंसाल याची खात्री आहे. हेंहि खरेंच कीं आभाळांत पाईन वृक्षांमागून वरवर चढणारी चंद्रकोर हळू हळू आकाशमार्गांत वर येतांना आणि चमकत्या प्रकाशानें आकाशमार्ग उजळतांना मला दिसूं शकत नाहीं. पण बोटींत उशीला टेकून पडल्यापडल्या मी पाण्यांत हात बुडवतें व चंद्रकलेच्या मंद प्रकाशीं पण चमकत्या पदराचा स्पर्श मला होतो आहे अशी कल्पना करतें. एखादे वेळीं एखादा धिट्टुकला चिमुकला मासा माझ्या बोटांमधून सुळकन् जातो आणि पुष्कळदां सरोवरांतील लिलीचीं फुलें लाजत लाजत माझ्या हाताला टेकून जातात. पुष्कळदां बोट सुटण्याच्या जागेवरील मंडपांतून किंवा बांधीव वाटेंतून बाहेर पडतांच माझ्या भोंवतींच्या मोकळ्या हवेची जाणीव होते. प्रकाशांतील उबदारपणा मला गुरफटून टाकतो पण तो सूर्यकिरणांनीं तापलेल्या झाडांतून किंवा पाण्यांतून येतो हें मात्र मला कधींच कळत नाहीं. पुष्कळदां गांवांत सुद्धां शहराचे मध्यभागीं असतांना अशा तऱ्हेच्या विचित्र उबदारपणाची जाणीव मला होते. शिशिरांतहि वादळी दिवसांत किंवा रात्रीं अशाच तऱ्हेची जाणीव होत असते. उबदार ओठानें माझ्या गालाचा मुका घ्यावा अशासारखीच ती भावना आहे.

बोटीनें प्रवास करण्याची मला मोठी हौस आहे. १९०१ च्या उन्हाळ्यांत मी "नोवा स्कोशियाला' गेलें होतें आणि त्या वेळीं पूर्वी कधींहि न मिळालेली समुद्राशीं ओळख करून घेण्याची संधि मिळाली. लॉंग फेलोनें आपल्या सुंदर कवितेंत ज्या प्रदेशाच्या मोहिनी मायेचीं वर्णनें केलीं आहेत. त्या प्रदेशांत कांहीं दिवस घालवून सुलिव्हॅन बाई व मी हॅलिफॅक्सला गेलों. उन्हाळ्याचा बराच काळ आम्हीं तिथेंच घालविला. तेथील बंदर तर आमच्या आनंदाचें निधान, आमचा स्वर्गच बनला होता. तेथून कितीतरी मजेशीर सफरी आम्हीं केल्या. रात्रीं, त्या शांत वातावरणाच्या छायेंत व निःशब्द जहाजांच्या सावलींत घटकान् घटका आम्हीं घालविल्या आहेत. माझ्या मनाची त्यांनीं पकडच घेतली होती जणूं. त्या आठवणी आजसुद्धां चिर-सौख्याचा विषय झालेल्या आहेत.

एके दिवशीं आम्हांला एक मजेशीर अनुभव आला. त्या वेळीं लढाऊ जहाजांची एक शर्यत होणार होती. इतर अनेकांच्या बरोबर आम्हीहि ती बघायला एका छोट्या बोटींतून गेलों होतों. हजारों छोट्या छोट्या नावा एकमेकींला चिकटून पुढें मागें डुलत होत्या. समुद्रहि शांत होता. परंतु शर्यती संपल्यानंतर ज्या वेळीं आम्ही घरीं परतायला लागलों त्या वेळीं आमच्यापैकीं एकानें क्षितिजावर येत असलेला एक काळा ढग पाहिला. तो मोठा मोठा होत होत शेवटीं त्यानें आपल्या विस्तारानें सारें आकाश व्यापलें. वारा घोंगावूं लागला. रागारागानें लाटा बंदरावर धडका मारूं लागल्या. घट्ट दोरानें बांधलेल्या शिडामुळेंच आमची नाव निर्भयपणें वाऱ्यावर स्वार होऊन चालली होती; पण एकदां ती ह्या लाटेवर जाई तर क्षणार्धांत दुसऱ्या लाटेबरोबर उंच उडे. समुद्र खदखदां हंसून तिला लगेच ढकलून देई. लौकरच आमचें शीडहि खालीं आलें. रागारागानें आम्हांला इकडून तिकडे फेकणाऱ्या वाऱ्याशीं झुंज घेण्याचा आम्हीं आटोकाट प्रयत्न केला. आमची छाती धडधडत होती. आमचे हात भीतीनें नव्हे, पण आमच्यावरील प्रसंगाच्यामुळें थरथर कांपत होते; पण आमचीं अंतःकरणें धीर गंभीर योद्धयांचीं होतीं. आणि आमचा नावाडी मोठा कुशल होता. त्या नावाड्यानें आजवर अनेक वादळांतून निश्चयी हातानें आणि दर्यावर्दी-पणाच्या सराईत नजरेनें मार्ग काढला होता. शेवटीं जेव्हां त्या वादळांतून वाचून आमची नाव लढाऊ जहाजाच्या आणि तोफांच्या बोटीजवळून सुरक्षितपणें किनाऱ्याकडे जाऊं लागली त्या वेळीं खलाशांनीं जयघोष करून त्या वादळांतून सुरक्षित बाहेर येणाऱ्या आमच्या चिमुकल्या नावेच्या नावाड्याचा गौरव केला. शेवटीं एकदांचे थंडीनें गारठलेले, थकलेले असे आम्ही सारेजण एक-दांचे किनाऱ्यावर पोंचलों.

गेल्या उन्हाळ्यांत न्यू इंग्लंडमधील एका सुंदर खेड्यांतील एका अज्ञात पण रम्य ठिकाणीं आम्ही राहिलों होतों. त्या ठिकाणीं माझीं अनेक सुखदुःखें निगडित झालेलीं आहेत. कारण कित्येक वर्षें तेथील चेंबर्लेन कुटुंबाचे ' रेडफार्म ' हें घर माझेंच झालें होतें. त्यांच्याकडे घालविलेले सुखाचे दिवस आणि त्यांच्या प्रेमळपणाच्या आठवणी मी अत्यंत कृतज्ञतेनें आठवतें. त्यांच्याकडील लहान मुलांचा गोड सहवास मला भारी महत्त्वाचा वाटावयाचा.

त्यांच्याशीं खेळण्यांत, रानावनांतून भटकण्यांत आणि पाण्यांतील दंगामस्ती करण्यांत मी सहभागी होत असे. त्यांच्याकडील लहान मुलांची गोड किलबिल मला भारी आवडते. मी त्यांना अतिमानुष प्राण्यांच्या आणि बुटक्या लोकांच्या गोष्टी व मजेदार अस्वलाची कहाणी सांगत असे. श्री. चेंबरलेन यांनीं मला झाडांची गूढ विद्या आणि रानटी फुलांची माहिती यांची ओळख करून दिली. यामुळें वृक्षांतील वाहणाऱ्या जीवन-रसाची खळखळ मला ऐकूं येई आणि पानापानांवर चमकणारा सूर्य मला दिसूं शके. म्हणतात ना "पृथ्वीच्या पोटांत अंधारांत लपलेलीं वृक्षाचीं मुळें टोंकावरील पानांच्या आनंदांत सहभागी होतात आणि सूर्यप्रकाश, वारा आणि पांखरें यांचा सहवास सहानुभूतीनें अनुभवतात." त्याचप्रमाणें मलाहि न दिसणाऱ्या गोष्टी या सहानुभूतीमुळेंच दिसूं शकतात.

मला असें वाटतें कीं मानव जातीच्या सुरुवातीपासून अनुभवलेल्या भावना आणि मनावर झालेले परिणाम ही एकत्र करण्याची व समजावून घेण्याची सूक्ष्म शक्ति आपणां सर्वांमध्यें आहे. प्रत्येक माणसाच्या अर्ध जागृत स्मृति कोशांत हिरवीगार वनराजी आणि कुजबुजणारे प्राणी ह्यांची आठवण असते. ती आठवण किंवा मागील पिढीपासून मिळालेला तो ठेवा, आंधळेंपणा, अथवा बहिरेंपणा, लुबाडून घेऊं शकत नाहीं. ही आपल्याला वंशपरंपरेनें आलेली शक्ति म्हणजे एक प्रकारचें सहावें इंद्रियच आहे म्हणा ना. त्या आत्मशक्तीच्या योगानेंच आपण बघूं, ऐकूं किंवा स्पर्श करूं शकतों.

'रेंथम' मध्यें अनेक वृक्षांची व माझी मैत्री झालेली आहे. त्यामध्यें मला अभिमान वाटावा असा एक महान् वृक्ष आहे. ह्या वृक्षराजाला पाहण्याकारितां मी माझ्या कित्येक मित्र मैत्रिणींना घेऊन गेलेली आहे. 'किंग फिलिपच्या' सरोवराच्या वर डोकावून पाहणाऱ्या एका उंच टेकाडावर तो उभा आहे. जुन्या वृक्षाविषयीं विशेष माहिती असणारे लोक मला सांगतात कीं तेथें गेलीं ८०० ते १००० वर्षें उभा असावा. इथें अशी कल्पना प्रचालित आहे कीं इंडियन लोकांचा प्रमुख, राजा "फिलिप" ह्यानें ह्याच झाडाखालीं आपला प्राण सोडला.

ह्याशिवाय दुसराहि एक ममताळू व "रेडफार्म' घराच्या दाराजवळच

वाढलेला लिंडन वृक्ष माझा जुना मित्र होता. एका दुपारीं भयंकर वादळ झाल्यानंतर घराच्या बाजूलाच कांहींतरी कोसळल्याचा प्रचंड आवाज झाला आणि कोणीहि सांगण्यापूर्वीच मला समजलें कीं लिंडनवृक्ष खालीं पडला असावा. अनेक वादळांशीं झुंज देतां देतां धारातीर्थी पडलेल्या त्या वीर वृक्षाला पाहण्याकरितां आम्ही सारे बाहेर आलों. धैर्यानें जीवन जगलेल्या व वीर मरणानें मेलेल्या, त्या प्रचंड वृक्षाकडे पाहतांना माझें अंतःकरण अगदीं भरून आलें ?

पण मी गेल्या उन्हाळ्यासंबंधीं लिहीत होतें नाहीं ? माझी परीक्षा संपतांच रेन्थॅम ज्या तीन सरोवरांकरितां प्रसिद्ध आहे, त्यांतील एकाच्या कांठीं, एका सुंदर स्थळीं बांधलेल्या झोपडीमध्यें आम्ही राहावयाला गेलों. ह्या ठिकाणीं दिवस मोठे आणि उबदार असत. कामाची काळजी, कॉलेजच्या आठवणी आणि शहराची गजबज सारे आम्ही विसरलों. जगामध्यें जें काय घडत होतें, लढाया, तह, सामाजिक संघर्ष, साऱ्यांचा केवळ मंद प्रतिध्वनिच रेन्थॅममध्यें येत असे. तेथेंच पॅसिफिकमधील विनाकारण झालेल्या क्रूर युद्धाबद्दल आम्हीं ऐकलें; भांडवलदार आणि मजूर ह्यांच्यांत चाललेल्या झगडयाविषयीं ऐकलें. आनंदांत सुटी घालविण्याच्या ऐवजीं आमचीं माणसें एडनच्या पलीकडे जाऊन, घाम गाळून आपल्या श्रमानें नवा इतिहास घडवीत होती, हेंहि ऐकलें; पण ह्या साऱ्यांचा आमच्यावर फारच थोडा परिणाम होई. कारण इथलीं सरोवरें, रानें, शेतें, मळे साऱ्यांची मोहिनी आमच्यावर पडलेली होती. तह, लढाया ह्या गोष्टी आज आहेत, तर उद्यां नाहींत; पण शेतें, सरोवरें आणि मळे हे मात्र कायम राहणार आहेत.

केवळ डोळ्यांनीं आणि कानांनीं आपल्याला भावभावना कळतात, असें ज्यांना वाटतें अशा लोकांना शहरांतील रस्त्यावरील गुळगुळीत फरशी आणि खेडयांतील रस्त्यांवर असलेला तिचा अभाव यापलीकडे अधिक फरक मला कसा कळतो याबद्दल आश्चर्य वाटतें. ते एक गोष्ट विसरतात कीं, माझें सारें शरीरच संवेदनाक्षम झालेलें आहे. शहरांतील गडबड आणि गोंधळ माझ्या चेहऱ्यावरील स्नायूंना व संवेदनाशक्तींना फटकारून जातात. हजारों लोकांच्या एकसारखें चालण्यामुळें शहरांतील रस्त्यांवर होणारा पदरव मला समजतो. कठीण फरशीवरून भरगच्च गाडया जातांना होणारा

फरफटण्यासारखा आवाज किंवा यंत्रांचा होणारा तोच तोच आवाज मला कळतो. डोळस माणसांचें लक्ष समोरील दृश्याकडे वेधल्यामुळें त्यांना कदाचित् ह्या साऱ्या नादविषयक संवेदनाची जाणीव होत नसेल.

खेड्यांत मात्र आपल्याला निसर्गाचें सुंदर दृश्य दिसत असतें. शहरांतून केवळ जगण्याकरितां केलेल्या धडपडींचें जें खेदकारक आणि दुष्ट दृश्य सदैव दिसतें तें खेड्यांत फारसें आढळत नाहीं. शहरांतील भिकार वस्तींत, ज्या अरुंद घाणेरड्या जागेंत लोक राहतात, त्या जागीं मी कित्येकदां गेलें आहे आणि संतापानें मनांतल्या मनांत म्हटलें आहे कीं, सुंदर घरांत राहून कांहीं लोकांनीं धडधाकट आणि सुंदर जिणें जगावें आणि इतरांनीं मात्र अंधाऱ्या खोल्यांतून हें लाजिरवाणें भयंकर जीवन काढावें; मरतुकडें ळळतलोंबत घाणेरडें जीवन त्यांनीं जगावें, यापरता अन्याय तो कुठला? ह्या घाणेरड्या वस्तींतून दाटीदाटीनें राहणारीं अर्धवट नागडीं, अर्धवट भुकेलीं मुलें, तुमच्या पुढें केलेल्या मैत्रीच्या हातापासूनसुद्धां दूर पळून जातात. न जाणों तुम्ही एखादे वेळीं थप्पडच मारायचें. ती छोटीं छोटीं गोड मुलें हळूच माझ्या हृदयांत प्रवेश करतात आणि त्यांच्या दुःखांचा विचार मात्र माझ्या मनांत घर करून राहतो. तिथल्या स्त्रिया, पुरुष सारे खचलेले आणि परिस्थितीनें वांकून गेलेले दिसतात. त्यांच्या कठीण आणि खरबरीत हातांवरून हात फिरवून मीं तें पाहिलेलें आहे. त्यांचा जगण्याचा झगडा किती कंटाळवाणा आणि कठोर असेल याची मला कल्पनाहि आलेली आहे. तो जगण्यासाठीं केलेला प्रयत्न कसला? कांहीं तरी करून आस्तित्व टिकविण्याची तोकडी धडपड आहे ती. त्यांच्या जीवनामध्यें प्रयत्न आणि संधि यांमध्यें भलें मोठें अंतर पडलेलें दिसतें. सूर्यप्रकाश आणि हवा ह्या ईश्वराच्या सर्वांना सारख्या व फुकट मिळालेल्या देणग्या आहेत असें आपण म्हणतों; पण तें कितपत खरें आहे? शहराच्या ह्या भिकार वस्तींत सूर्य प्रकाशतच नाहीं आणि जी हवा आहे ती घाणेरडी असते. जो माणूस ही विषमता विसरतो व आपल्याच बांधवांच्या मार्गांत येतो, त्याला आपल्या रोजच्या प्रार्थनेंत "देवाधिदेवा, आज आमची भाकरी आम्हांला दे" हें म्हणवतें तरी कसें? पलीकडे आपला भाऊ उपाशी तडफडत असतांना त्याला हें तत्त्वज्ञान सुचतें तरी कसें? त्या वस्तींत राहणारीं हीं सारीं माणसें, शहराचें वैभव, झगडा

आणि संपत्तीचा मोह टाकून पुन्हा आपल्या शेतांत आणि रानावनांत येऊन नेकीचें जिणें जगतील काय? असें झालें तर रानांतील राजेशाही उमद्या वृक्षाप्रमाणें त्यांचीं मुलें आनंदांत वाढतील. रानांत उगवलेल्या फुलां-प्रमाणें त्यांचे विचार शुद्ध आणि मधुर होतील. हे विचार वेगळे आहेत खरें; पण एक वर्षभर शहरांत राहून आल्यानंतर अशा तऱ्हेचे विचार अगदीं स्वाभाविकपणें मनांत येतात.

पुन्हा एकदां माझ्या पायांखालील त्या मऊ मातीच्या स्पर्शाचें सुख मी अनुभवीत आहें. पुन्हा एकदां त्या ओढ्याच्या खळखळाटांत मी माझीं बोटें न्हाऊन घेऊं शकतें. त्या ओढ्याकडे जाणाऱ्या गवताळ रस्त्याकडे मी फिरायला जाऊं शकतें किंवा दगडी भिंत ओलांडून मी पलीकडच्या, नाच-णाऱ्या आणि डुलणाऱ्या हिरव्या शेतांत जाऊन माझ्या आनंदसागराला भरती आणूं शकतें.

गमतीत फिरायला जाण्याइतकेंच मला सायकल चालविण्याचें वेड आहे. चेहऱ्यावर समोरून झोंबणारा वारा किंवा माझ्या लोखंडी घोड्याची, सायकलची—स्प्रिंगसारखी हालचाल, याची मला फार गंमत वाटते. हवेंतून भरभर जाण्यानें मला एक प्रकारचा उसळत्या जीवनाचा आणि शक्तीचा अनुभव येत असतो. ह्या व्यायामानें माझ्या नाड्या आनंदानें उडूं लागतात आणि माझें हृदय गाऊं लागतें.

जेव्हां जेव्हां शक्य असतें तेव्हां तेव्हां फिरायला जातांना, बोटींतून जातांना अगर घोड्यावरून जातांना माझा कुत्रा माझ्याबरोबर असतो. आतांपर्यंत अनेक कुत्र्यांशीं मीं दोस्ती केलेली आहे. मोठे शक्तिमान् कुत्रे, मायाळू डोळ्यांनीं पाहणारे स्पॅनिअल्स, रानावनांतील माहिती असलेले शिकारी कुत्रे, इमानी आणि घरच्यासारखे बुलटेरिअर, सर्व प्रकारचे कुत्रे मीं एकेकदां पाळलेले आहेत. सध्यां माझ्या प्रेमांतला एक बुलटेरिअर कुत्रा आहे. त्याची वंशवेल प्रसिद्ध असून मोठी आहे. शेपूट वांकडी असून चेहरा मोठा मजेदार आहे. माझ्या ह्या मित्रांना बहुधा माझ्या पंगुपणाची जाणीव असते आणि त्यामुळें मी एकटी असतांना बहुधा ते मला चिकटून असतात. त्यांची वागायची प्रेमळ रीत आणि शेपूट हालवायची बोलकी पद्धत मला फार आवडते.

पावसाळ्यांत जेव्हां घरांत राहायचा प्रसंग येतो त्या वेळीं मी इतर सामान्य मुलींसारखाच माझा वेळ घालवतें. मला विणायची व भरतकामाची आवड आहे. थोडें इकडे, थोडें तिकडे असें सुखासीन वृत्तीनें वाचीत बसण्यांत मला फार मजा वाटते. केव्हां केव्हां मी एखाद्या स्नेह्याबरोबर बुद्धिबळें किंवा सारीपाटाचा डाव खेळतें. पटावरील चौकोन कोरून काढलेले असल्यामुळें प्यादीं त्यांत बरोबर बसतात. काळीं प्यादीं सपाट असून पांढऱ्यांच्या टोंकांवर कमानदार आकार केलेला असतो. प्रत्येक प्याद्यामध्यें एक भोंक केलेलें असून त्यांत पितळी खिळा घालतां येतो. ह्यायोगानें राजा इतरांहून वेगळा ओळखतां येतो. प्यादीं दोन आकाराचीं असून पांढरीं प्यादीं काळ्यापेक्षां मोठीं असतात. या सोयी केल्यामुळें प्रतिपक्षाची हालचाल सर्व प्याद्यांवर हलकेंच बोट फिरवून मला समजते. मोहरी एका चौकटींतून दुसऱ्या चौकटींत ठेवतांना होणाऱ्या आवाजामुळें माझी खेळायची पाळी केव्हां आली हें मला कळतें.

जर मी कधीं एकटीच आळसावलेली असलें तर मला आवडणारा पत्त्याचा सॉलिटिअरचा डाव मांडून बसतें. माझ्यासाठीं पत्त्यांवर कोपऱ्यांत ब्रेल खुणांनीं सर्व लिहिलेलें असतें. त्यामुळें मला खेळणें अवघड जात नाहीं.

जर माझ्याभोंवतीं मुलें असलीं तर त्यांच्याशीं मजा मजा करून खेळण्याइतकी गंमत मला दुसऱ्या कशांतच वाटत नाहीं. अगदीं लहानांतल्या लहान मुलांचीसुद्धां संगत मला आवडते. मला सांगायला आनंद वाटतो कीं, मुलांनासुद्धां मी आवडतें. माझें बोट धरून तीं मला इकडे तिकडे हिंडवितात व त्यांना आवडणाऱ्या वस्तु मला दाखवितात. छोटया मुलांना बोटांनीं खुणा करणें शक्य नसतें; पण मी त्यांच्या ओठावर बोटें ठेवून त्यांचें बोलणें समजूं शकतें. जर मला समजलें नाहीं तर तें मुक्यांच्या खुणा करतात. त्यांच्या खुणा न समजल्यामुळें खेळतांना कांहीं वेळां मी चुकतें, त्याबरोबर सारी बालगोपाळ मंडळी हंसायच्या धबधब्यांत वाहून जातात आणि आमचा खेळ पुन्हा सुरू होतो. पुष्कळदां मी त्यांना गोष्टी सांगतें, खेळ शिकवितें, वेळ कसा भुर्रकन जातो आणि आमच्या आनंदाला पारावार राहात नाहीं.

संग्रहालयें आणि दुकानें यांतूनहि मला आनंद आणि स्फूर्ति मिळते.

आंधळ्या मुलींच्या हाताला हालचाल, भावभावना, संगमरवरांतील सौंदर्य कसें कळतें यांचें पुष्कळ लोकांना आश्चर्य वाटतें; परंतु शिल्पकलेच्या थोर नमुन्यावरून हात फिरवितांना मला अक्षरशः ब्रह्मानंद होतो. माझ्या बोटांचीं टोकें रेषा आणि गोलाई यांवर फिरूं लागलीं कीं, शिल्पकारांनीं जो विचार, आणि ज्या भावना त्या कृतींतून व्यक्त केलेल्या आहेत त्या मला समजतात. कांहीं वेळेला जिवंत माणसांच्या चेहऱ्यावरून मला हात फिरवायला मिळाला म्हणजे त्यांचे जसे विकार कळतात, त्याचप्रमाणें देवता व महापुरुष यांच्या मूर्तींच्या चेहऱ्यावरील द्वेष, धैर्य आणि प्रेम ह्या भावना मला समजतात. डायनाच्या पुतळ्याला स्पर्श करतांच तिच्या उभें राहण्याच्या डौलांत माळरानाची स्वतंत्रता आणि रानटी सिंह आणि भयंकर वासना ह्यांना माणसाळवणारें तेज दिसून येतें. व्हीनसच्या पुतळ्याची प्रमाणबद्ध गोलाई आणि मोहकता यानें माझा आत्मा संतुष्ट होऊन जातो. बॅरेच्या ब्राँझच्या कलाकृतींतून जंगलांतील गूढ सौंदर्य उमगतें.

थोर अंधकवि होमरचें एक चित्र माझ्या खोलींत मला हात लावतां येईल इतक्या उंचीवर टांगून ठेवलेलें आहे आणि पुष्कळदां मी त्या चित्रांतील उदासवाण्या सुंदर चेहऱ्यावरून आदरभावानें हात फिरवीत असतें. त्यांवरील रेषा आणि रेषा जणूं जीवनमार्गावरील खुणा आहेत आणि तो चेहरा म्हणजे आयुष्यभर केलेल्या धडपडीचें आणि भोगलेल्या दुःखाचें प्रतीकच आहे असें मला वाटतें. त्याचे आंधळे डोळे जणूं त्या निर्जीव थंडगार प्लॅस्टरमधूनसुद्धां प्रकाशाच्या आणि आवडत्या "हेलासच्या" निळ्या आभाळाच्या शोधार्थ रोखलेले दिसतात; पण सारें निष्फळ ! ती दृढ निश्चयाची पण मृदु स्वभावाची प्रतीक असलेली जिवणी, खरें म्हणायचें तर सारा चेहराच दुःखाची पूर्णपणें ओळख झालेल्या श्रांत माणसाचा आणि खऱ्याखुऱ्या कवीचा आहे. त्याच्या दृष्टिहीनतेची वेदना केवळ मलाच प्रतीत होऊं शकते. बाकी त्याचेंहि सारें आयुष्य म्हणजे एक कधीं न संपणारी रात्रच नव्हती का ?

माझ्या कल्पनेमध्यें मी होमरचें मधुर संगीत ऐकतें. माझ्या कल्पनासाम्राज्यांत, आपल्या अस्थिर आणि चांचपडणाऱ्या पावलानें तो वस्ती-

बस्तींतून जीवनाचीं गाणीं गात फिरत असतो. प्रेमाची, युद्धाची, महान् वंशाच्या विजयाची सारीं अद्‌भुत वैभवशालीं गीतें गातो. या गीतांमुळेंच ह्या अंधकवीला अमरत्वाचा किरीट आणि युगायुगाची प्रशंसा लाभली.

मला पुष्कळदां असें वाटतें कीं, शिल्पकृतींचें सौंदर्य समजण्याबाबतींत डोळ्यांपेक्षां हात अधिक संवेदनाक्षम असतात. पुतळ्यांवरील रेषा आणि गोलाई यांनीं निर्माण होणारा नादमधुर प्रवाह डोळ्यांनीं बघण्यापेक्षां स्पर्शानें समजण्यांतच खरी माधुरी आहे. ह्या पाषाण-मूर्तींतील देवदेवतांच्यांतूनच मला ग्रीकांच्या हृदयाचीं स्पंदनें समजलेलीं आहेत.

आणखी एक क्वचित् मिळणारा आनंद म्हणजे नाटकाला जाण्याचा. नाटक वाचण्यापेक्षां तें समोर चाललें असतांना कुणीतरी खुणांनीं समजावून देणें मला आवडतें. कारण त्यायोगें घडणाऱ्या घटनांत आपण सहभागी आहोंत असें वाटूं लागतें. ज्यांच्या अभिनयाच्या सामर्थ्यानें आपण स्थळ-काळाचें भान विसरून जुन्या, सुंदर भूतकाळांत जातों अशा कांहीं थोर नट आणि नटींना भेटण्याचें भाग्य मला लाभलेलें आहे. कुमारी एलेन टेरी ह्यांची भूमिका म्हणजे राणीचा आदर्श जिवंत झाल्यासारखें मला वाटतें. त्यांच्या चेहऱ्याला आणि वेषभूषेला हात लावून पाहिल्यानंतर उदात्त अशा दुःखांतसुद्धां जें पावित्र्य आढळतें तें मिळाल्याचा भास मला झाला. त्यांच्या शेजारीं राजभूषणें परिधान करून सर हेन्री आयर्व्हिंग उभे होते. त्यांच्या प्रत्येक अभिनयांत बुद्धिमत्तेचा विलास आणि राजेशाही रुबाब होता. त्या रुबाबानें त्यांच्या भावनाशील चेहऱ्याची रेषान् रेषा भारून गेली होती. त्यांनीं तोंडावर आणलेल्या त्या राजमुद्रेनें त्या चेहऱ्यावर एक प्रकारची दुःखाची छाया आणि अविस्मरणीय असामान्यता आलेली होती.

मि. जेफर्सन् ह्यांना मी ओळखतें, किंवा ते माझे स्नेही आहेत असें म्हणायला मला अभिमान वाटतो. त्यांचें प्रयोग जेथें चालू असतील तेथें मी असलें तर जरूर नाटकाला जातें. मी न्यूयॉर्कच्या शाळेमध्यें असतांना पहिल्याप्रथम त्यांचे रिप् व्हॅन विंकलचें काम पाहिलें. ती गोष्ट मी पुष्कळदां वाचली होती. परंतु रिपच्या शांत आणि दयाळू वागण्याची गंमत मला

केवळ नाटकांतच पाहतां आली. त्या भूमिकेचें करुण आणि सुंदर दर्शन श्री. जेफर्सन् यांनीं घडविलें. त्या जुन्यापुराण्या रिपचें चित्र अजूनहि माझ्या मनांत आहे. मी तें कधींच विसरणार नाहीं. नाटक संपल्यावर सुलिव्हॅन बाईनीं मला पडद्यामागें नेलें आणि मी त्यांच्या त्या विचित्र झग्यांवरून, लांबसडक केसांवरून व लांब दाढीवरून हात फिरवून पाहिला. श्री. जेफर्सन् यांनीं त्यांच्या चेहऱ्याला मला हात लावूं दिल्यामुळें वीस वर्षांच्या महानिद्रेंतून जागे झालेल्या रिप् व्हॅन विंकलची मुद्रा मला समजावून घेतां आली. श्री. जेफर्सन् यांनीं बिचाऱ्या वृद्ध रिप व्हॅन विंकलचे पाय कसे थरथरत होते हेंहि मला दाखविलें.

"रायव्हल्स" या नाटकांत काम करतांना मीं त्यांना पाहिलें आहे. बॉस्टनला मी वारंवार त्यांच्या घरीं जात असे त्या वेळीं त्यांनीं त्या नाटकांतील एक बहारदार प्रसंग मला करून दाखविला होता. त्यांच्या घरांतील बैठकीच्या खोलीचीच रंगभूमि केली होती. ते आणि त्यांचा मुलगा एका मोठ्या टेबलापाशीं बसले आणि तेथें 'बॉब ॲकेरस' होऊन त्यांनीं आव्हानाचें पत्र लिहिलें. त्यांच्या सर्व हालचालींचा मी हातानें मागोवा घेतला आणि नाटकांतील भूमिकेचा चांचपडण्याचा, चुका करण्याचा स्वभाव त्यांच्या अभिनयांतून समजावून घेतला. दुसऱ्या कुणी या गोष्टी मला खुणांनीं समजावून देणें शक्यच झालें नसतें. नंतर त्या प्रवेशांत, ते दोघे उठले आणि द्वंद्वयुद्ध खेळले. तलवारीच्या फेकी आणि खणखणाट मला समजला. बिचाऱ्या बॉबचें धैर्य गळून जातांना त्याचे पाय कांपूं लागलेले मीं पाहिले. त्यानंतर त्या थोर नटानें आपला कोट ओढून सारखा केला, चेहरा थोडा बदलला आणि क्षणार्धांत, त्यांच्या अभिनयामुळें मी फॉलीन वॉटर या खेड्यांत असल्यासारखें वाटलें. श्री. जेफर्सन् यांनीं "रिप् व्हॅन विंकल" या नाटकांतील सुंदर संवाद मला म्हणून दाखविले आणि त्या संवादांतून होणारा हास्य आणि करुण रसाचा पाठशिवणीचा खेळ मीं अनुभवला. त्यांनीं वाचलेल्या ओळीला साजेसा अभिनय कसा असावा असें त्यांनीं मला विचारलें. नाटकांतील अभिनय म्हणजे काय ह्याची मला मुळींच कल्पना नाहीं आणि म्हणून मी वेडेवांकडे अंदाज करीत होते; परंतु त्या प्रत्येक शब्दाला योग्य असा अभिनय जेफर्सन् यांनीं करून दाखवला. "माणूस मेल्यावर त्याला

इतक्या लवकर लोक विसरतात का हो ?" ह्या वाक्याबरोबर त्यांनीं दुःखाचा उसासा टाकला व वीस वर्षांच्या झोपेंतून जागें झाल्यावर ज्या आश्चर्यचकित वृत्तीनें रिप् व्हॅन विंकलनें आपली बंदूक आणि कुत्रा शोधण्यांचा प्रयत्न केला. त्या वेळचा त्यांचा तो सारा अभिनय मला अगदीं खराखुरा आणि जिवंत वाटला.

बारा वर्षांपूर्वी पहिल्याप्रथम मी नाटकाला गेलें तें मला अजून आठवतें. एल्सी लेस्ली ही छोटी तारका त्या वेळीं बॉस्टनमध्यें होती आणि "प्रिन्स ॲण्ड दी पॉपर" या नाटकांतील तिचें काम पाहायला आम्ही गेलों होतों. त्या छोट्या नाटकांतील सुख आणि दुःख यांचा कथाप्रवाह अविस्मरणीय होता. त्या नाटकांत काम करणाऱ्या छोट्या बालिकेची भूमिकाहि तशीच अविस्मरणीय होती. नाटकानंतर त्या छोट्या अभिनेत्रीला भेटण्याची व तिच्या राजेशाही वेषभूषेला स्पर्श करण्याची संधि मला मिळाली होती. एल्सीपेक्षां अधिक गोड किंवा अधिक सुंदर मुलगी भेटणें दुरापास्तच आहे. तिच्या खांद्यावर तिचा सोनेरी केशकलाप रुळत होता. चेहऱ्यावर स्मिताची प्रभा पसरली होती. इतक्या मोठ्या समुदायापुढें काम केल्यानंतरहि संकोचाचा किंवा थकव्याचा मागमूसहि नव्हता. त्या वेळीं मी नुकतीच बोलायला शिकत होतें आणि तिचें नांव स्पष्टपणें म्हणतां येईपर्यंत मीं घोकलेलें होतें. माझे मोडकेतोडके शब्द तिला कळले आणि अत्यंत निःसंकोचपणें तिनें मैत्रीचा हात पुढें केला. त्या वेळीं मला झालेला आनंद कसा सांगूं ?

माझें आयुष्य पंगुपणानें जरी मर्यादित झालें असलें तरी अनेक वेळां अनेक ठिकाणीं ह्या सृष्टींतील सौंदर्याचा मला साक्षात्कार होतो. प्रत्येक गोष्टीच्या अनुभवांत एक वेगळीच मजा असते. आंधळ्यांचा अंधार किंवा मुक्यांची शांतता यामध्येंहि ती असते आणि त्यामुळेंच ज्या स्थितींत मी आहे त्यांतच संतुष्ट राहण्याचा धडा शिकलें आहें.

हिंवाळ्यांतील धुक्याप्रमाणें कांहीं कांहीं वेळां हा एकलेपणा मला गुरफटून टाकतो आणि मग खिन्नपणें आयुष्याच्या बंद दरवाजापाशीं मी वाट बघत बसून राहतें. त्या महाद्वारापलीकडे प्रकाश आहे, संगीत आहे, मधुर संगाति आणि स्नेह आहे; पण कदाचित् पलीकडे जाण्याची संधि मला मिळणार

नाहीं. निर्दय दैवानें माझा रस्ता अडवलेला आहे. त्याला त्याच्या या अन्यायाचा जाब केव्हांतरी मी विचारीन सुद्धां, कारण माझें मन अजून थोडें बेशिस्त आणि भावनात्मक आहे. तरीहि माझ्या ओठांवर आलेले कडु पण निष्फळ शब्द आणि ती शापवाणी माझी जीभ उच्चारत नाहीं व न ढाळलेल्या आंसवाप्रमाणें ते शब्द पुनः हृदयांत परततात. माझ्या मनावर भयाण शांततेचें दडपण असतें; पण हंसरी आशा हळूच कुजबुजत येते आणि सांगते कीं, "आपल्या अडचणींना व स्वतःला विसरण्यांतच खरा आनंद आहे." तेव्हांपासून मी इतरांच्या डोळ्यांतील ज्योतींना माझाच प्रकाश मानीत आलें आहे, इतरांच्या कानांवर येणाऱ्या स्वरलहरींना माझेंच संगीत मानलेलें आहे आणि इतरांच्या चेहेऱ्यावरील स्मितांतच माझ्या सुखाचा ठेवा पाहिलेला आहे.



# – २३ –

ज्यांनीं ज्यांनीं माझ्या जीवनांतील आनंद वाढविण्यासाठीं हातभार लावला, त्यांच्या नामनिर्देशानें ही कहाणी अधिक सरस व समृद्ध होणार आहे. त्यांतील कांहींजण साहित्यांत अमर स्थान मिळून, अनेकांना प्रिय झालेले असतील, तर ह्यांतील कांहीं नांवें, वाचकांना अगदींच अनोळखी वाटतील. त्यांच्या नांवांना कीर्तीचा लाभ झालेला नसला तरी त्या लोकांच्या सहवासानें अनेकांचीं जीवनें मधुर आणि उदात्त झालीं आहेत. त्यांच्या जीवनांत त्यांना अमर असें स्थान प्राप्त झालेलें आहे. एखाद्या सुंदर भावगीताप्रमाणें, हे लोक भेटतांच आपल्या भावना हेलावतात त्यांच्या हस्तांदोलनांत शब्दातीत सहानुभूति असते, त्यांच्या मूलतः अध्यात्मिक किंवा दैवी असणाऱ्या मधुर स्वभावामुळें, आपल्या आतुर आत्म्याला अपार शांति लाभते अशीं माणसें ज्या दिवशीं भेटतात तो सुवर्णदिनच म्हणायला हवा. गोंधळ, गुंतागुंती, राग, चिंता, आणि काळज्या, एखाद्या दुःखाप्रमाणें विसरून जातात आणि आपण जणूं जागें होऊन, ईश्वराची सुंदर सृष्टि नव्या डोळ्यांनीं पाहूं लागतों, नव्या कानांनीं ऐकूं लागतों. आपल्या जीवनांतील शून्यपणा एकाएकी नाहींसा होऊन तेथें नव्या व तेजस्वी आशा फुलूं लागतात, विकसूं लागतात. थोडक्यांत म्हणजे हे स्नेही जवळ असतांना, आपण सर्वसुखी असल्याचा प्रत्यय येतो. हीं माणसें आपल्या जीवनांत पूर्वी आलेलीं नसतात, आपल्या आयुष्याच्या मार्गावर पुन्हा त्यांची गांठभेट होण्याचा फारसा संभवहि नसतो; पण आपल्या असंतोषावर त्यांच्या अल्प पण शांत वृत्तीचा शीतल परिणाम होतो. डोंगरावरून खळाळत येणाऱ्या प्रवाहानें समुद्राला ताजेपणा प्राप्त व्हावा त्याप्रमाणें त्यांच्या संजीवक स्पर्शानें आपली स्थिति होते.

पुष्कळदां लोक विचारतात, "लोक तुम्हांला कंटाळा आणीत नाहींत का?" मला या प्रश्नाचा नीटसा अर्थच कळत नाहीं. मला वाटतें मूर्ख आणि अति-जिज्ञासु माणसांचे प्रश्न मोठे भलभलते आणि काळवेळ न पाहतां विचारलेले असतात. वृत्तपत्रांच्या वार्ताहरांचें कांहीं वेळां असेंच होतें. लोक मला समजणार नाहीं अशा कल्पनेनें मुद्दाम सोपें सोपें बोलायला लागले कीं मला राग येतो. आपल्या बरोबर चालतांना, आपली चाल जुळावी म्हणून मुद्दाम लहान लहान पावलें टाकणाऱ्या शिष्टांसारखे मला ते वाटतात. ह्या दोन्ही प्रकारांतला ढोंगीपणा मात्र मला अगदीं कंटाळवाणा वाटतो.

ज्या लोकांशीं मी हस्तांदोलन करतें, त्यांचे हात मुकेपणानें माझ्याशीं बोलतात. कांहीं हातांचा स्पर्श उद्धट असतो. कांहीं लोक इतके शुष्क आणि आनंदाला पारखे झालेले असतात कीं त्यांचा थंडगार हात, हातांत घेतांच, आपण आग्नेयेकडील वादळाशीं तर हातमिळवणी करीत नाहीं ना असें वाटतें. कांहीं लोकांच्या हातांत सूर्यप्रकाश असावा असें वाटतें, कारण त्यांच्या हस्तांदोलनांतील उदारपणा माझ्या हृदयाला जाणवतो. लहान मुलांच्या हाताचा स्पर्श ओझरता असतो; पण मुलांच्या दृष्टिक्षेपांत जें प्रेम इतरांना आढळतें, तितकीच प्रकाशमयता मला त्यांच्या त्या स्पर्शांत आढळते. मनापासून केलेलें हस्तांदोलन किंवा एखादें प्रेमळ पत्र ह्यापासून मला खरा-खुरा आनंद मिळतो.

ज्यांना मीं कधीं पाहिलेंसुद्धां नाहीं असे कित्येक दूरदूरचे माझे स्नेही आहेत. ते इतके आहेत कीं त्या सर्वांच्या पत्रांना उत्तरें सुद्धां मला धाडतां येत नाहींत. ज्यांना पुरेशीं उत्तरेंहि मी लिहूं शकत नाहीं त्यांच्या प्रेमळ पत्राबद्दल मी येथें कृतज्ञता व्यक्त करूं इच्छितें.

जगांतील कित्येक बुद्धिवंतांशीं ओळख करून घेण्याची व बोलण्याची संधि मला मिळाली हा एक मधुर योगच मी समजतें. बिशप ब्रुक्स यांच्या स्नेहाचा ज्यांना लाभ झाला आहे त्यांनाच त्यांतली गंमत कळेल. लहानपणीं त्यांच्या मांडीवर बसून माझ्या चिमुकल्या हातांत मी त्यांचा हात घेई आणि दुसऱ्या हातावर खुणा करून सुलिव्हॅन बाई, बिशप ब्रुक्स सांगत असलेले ईश्वर व अध्यात्म या विषयांवरचे विचार मला सांगत. एखाद्या लहान मुलाच्या उत्सुकतेनें व कौतुकानें मी त्यांचें बोलणें ऐकत राही. त्यांचें

बोलणें संपूर्णपणें समजण्याची पात्रता माझ्यांत नव्हती; परंतु जीवनांतील खरा आनंद त्यांनीं मला शिकविला. ज्या ज्या वेळीं मी त्यांना भेटे, त्या त्या वेळीं एखादा तरी नवा विचार मी घेऊन येई आणि जसजशी माझी वाढ होऊं लागली, तसतसे ते विचारहि मला अधिक सुंदर, अधिक सखोल व अर्थगंभीर वाटूं लागले. जगांत इतके धर्म कां आहेत असा मला एकदां प्रश्न पडला असतांना ते म्हणाले, " हेलन, या जगांत एकच विश्वधर्म आहे. आणि तो म्हणजे प्रेमाचा. तुझ्या संपूर्ण आत्म्यानें व मनानें तूं ईश्वरावर प्रेम कर. ईश्वराच्या लेकरांवर जास्तींत जास्त माया कर आणि लक्षांत ठेव कीं, जगांत वाइटापेक्षां चांगलें होण्याची शक्यताच जास्त आहे. हीच स्वर्गद्वाराची गुरुकिल्ली आहे. " बिशप ब्रुक्स यांचें जीवन म्हणजे ह्या महान् सत्याचें एक चालतें बोलतें उदाहरण होतें. त्यांच्या उदात्त आत्म्यामुळें, विशाल ज्ञान आणि प्रेम यांचा श्रद्धेंत समन्वय होऊन, त्यांना एक प्रकारची दिव्यदृष्टि प्राप्त झालेली होती.

त्यांनीं मला कोणत्याहि एका पंथाची अगर मताची शिकवण दिली नाहीं. उलट माझ्या मनावर दोन महान् कल्पना ठसविल्या. ईश्वराचें पितृवात्सल्य व मानवांतील बंधुभाव, ह्या कल्पनाच सर्व धर्मांच्या मुळाशीं आहेत. ईश्वर म्हणजे प्रेम. ईश्वर हा प्रेमळ पिता असून आपण सारीं लेकरें आहोंत. अत्यंत अंधारी रात्रसुद्धां केव्हांना केव्हां उजळेल आणि जरी सत्याची क्वचित् पायमल्ली केली गेली तरी असत्याचा विजय केव्हांहि होणार नाहीं. हे त्यांचे उज्ज्वल विचार होते.

भविष्यकालाचा विचार करतांना मला फार आनंद होतो. मात्र एकच बोच खटकते कीं दूरवर, ईश्वराच्या त्या सुंदर ' कुठेंतरी, ' माझे कांहीं दिवंगत स्नेही माझी वाट पाहात आहेत. इतकीं वर्षे झाल्यानंतरहि ते मला इतके निकट वाटतात कीं, केव्हांतरी अचानक येऊन त्यांनीं माझा हात धरला व त्यांच्या निधनापूर्वी ते बोलत तसे चार प्रेमळ शब्द बोलले तर मला मुळींच आश्चर्य वाटणार नाहीं.

बिशप वारल्यानंतर मीं समग्र बायबल पुन्हा वाचून काढलें. स्वीडन बोर्गचे ' हेव्हन अँड हेल, ' ड्रमॉंडचे ' अॅसेंट ऑफ मॅन ' वगैरे धर्म-

विषयक ग्रंथहि मीं वाचून काढले; परंतु बिशप ब्रुक्सच्या प्रेमाच्या शिकवणी इतकी कुठलीहि धर्मपद्धत आत्मशांति देणारी वाटली नाहीं. माझी आणि हेन्री ड्रमॉंड यांची ओळख होती. त्यांच्या हाताचा स्पर्श मला नेहमींच आशीर्वादात्मक वाटे. माझ्या सुहृदांपैकीं सर्वांत सहानुभूतिपूर्ण ते होते. त्यांचें ज्ञान इतकें विशाल होतें व त्यांचा स्वभाव इतका मनमोकळा होता कीं त्यांच्या सहवासांत कंटाळा म्हणून कधीं येत नसे.

डा. ऑलिव्हर वेंडेल होम्स यांना आम्ही प्रथम भेटलों त्या वेळची आठवण अजूनहि ताजी आहे. रविवारीं दुपारीं त्यांनीं सुलिव्हन बाईंना व मला बोलावलें होतें. त्या वसंतऋतूच्या सुरुवातीला मी नुकतीच बोलायला शिकलें होतें. त्यांच्या घरी जाताच, आम्हांला लगेंच त्यांच्याकडे नेण्यांत आलें. त्यांच्या वाचनालयांत, मोठ्या आरामखुर्चीवर बसून, शेगडीच्या तडतडत्या जाळाशीं शेकत आणि भूतकालाच्या विचारांत मग्न होऊन ते बसले होते. मीं सुचविलें कीं, आपण भूतकाळाच्या विचारांत चार्ल्स नदीचें गुंजन ऐकत बसलां असाल. "होय" ते म्हणाले, "चार्ल्स नदीच्या कैक स्मृति माझ्या मनांत घर करून राहिलेल्या आहेत. त्या खोलींत दरवळणाऱ्या चामड्याच्या आणि छपाईच्या वासानें त्या खोलींत पुस्तकेंच पुस्तकें होतीं हें मला समजलें आणि मीं नकळतच पुस्तकासाठीं हात पुढें केला. माझ्या बोटांना टेनिसनच्या कवितांचा सुंदर संग्रह लागला. तें पुस्तक कोणतें आहे हें सुलिव्हन बाईंनीं सांगताच मीं कविता म्हणायला सुरवात केली; पण म्हणतां म्हणतां मी एकदम थांबलें. माझ्या हातांवर अश्रु पडल्यासारखें मला वाटलें. मी माझ्या आवडत्या कवीला आंसवें ढाळायला लावलें होतें याचा मला भारी खेद झाला. पुढें त्यांनीं मला आरामखुर्चीत बसायला लावलें व तऱ्हेतऱ्हेच्या वस्तु मला दाखवायला आणल्या. त्यांच्या विनंतीवरून मी 'चेम्बर्ड नॉटिलस' ही कविता म्हटली. त्यानंतर मी त्यांना अनेक वेळां भेटलें व कवि म्हणून नव्हे तर एक माणूस म्हणून त्यांच्यावर प्रेम करूं लागलें.

डॉ. होम्स यांना भेटल्यानंतर थोड्याच दिवसांत सुलिव्हन बाई व मी श्री. व्हिटिअर यांना त्यांच्या मेरीमॅक येथील घरीं भेटायला गेलों.

त्यांच्यापाशीं त्यांच्या कवितांचा उठावाच्या लिपींत छापलेला एक संग्रह होता. त्यांतून मी 'इन स्कूल-डेज' ही कविता म्हणून दाखविली. माझे उच्चार स्पष्ट झालेले पाहून त्यांना फार समाधान वाटलें व माझें बोलणें समजायला त्यांना फारशी अडचण पडली नाहीं असेंहि ते म्हणाले. त्यानंतर त्यांना मीं पुष्कळ प्रश्न विचारले व त्यांच्या ओठांवर बोटें ठेवून उत्तरें समजावून घेतलीं. त्या कवितेबाबत ते म्हणाले कीं, कवितेंतील छोटा मुलगा म्हणजे ते स्वतः. त्या छोट्या मुलीचें नांव सॅली. कवितेबाबत आणखी बरेंच त्यांनीं सांगितलें; पण तें सारें मला आठवत नाहीं. नंतर मी दुसरी कविता म्हटली आणि त्यांतील शेवटले चरण म्हणत असतांना त्यांनीं माझ्या हातांत एक मूर्ति दिली. गुलामाच्या मूर्तीच्या शृंखला गळून पडत असलेल्या त्यांत दाखविण्यांत आल्या होत्या. जेव्हां यक्षानें पीटरला तुरुंगाच्या बाहेर आणलें तेव्हां त्याच्या बेड्या अशाच गळाल्या होत्या. त्यानंतर आम्ही त्यांच्या अभ्यासिकेंत गेलों. तेथें त्यानीं बाईच्या कार्याची प्रशंसा करून त्यांना आपली स्वाक्षरी दिली. व मला म्हणाले, "या बाई तुझ्या मोक्षदात्या व उद्धारकर्त्या आहेत." नंतर त्यांनीं आम्हांला दारापर्यंत पोंचवलें व मायाळूपणें माझ्या कपाळाचा मुका घेतला. पुढील उन्हाळ्यांत त्यांच्याकडे जायचें मीं कबूल केलें, परंतु माझा शब्द पुरा करण्यापूर्वीच त्यांचा देहान्त झाला.

डॉ. एडवर्ड एव्हरेट् हेल हे माझे फार जुने स्नेही आहेत. मी आठ वर्षांची असल्यापासून त्यांना ओळखतें आहे आणि प्रतिवर्षी आमचा स्नेह वृद्धिंगतच होत गेला आहे. त्यांच्या पोक्त सहानुभूतीचा मला व बाईंना अनेक दुःखाच्या व कसोटीच्या वेळीं उपयोग झाला आहे आणि त्यांच्या कणखर हाताचा आधार आम्हांला अनेक वेळां मिळाला आहे. त्यांनीं आमच्याकरितां जें केलें तेंच त्यांनीं, ज्यांना ज्यांना अवघड ईप्सित साध्य करायची ईर्षा आहे, त्यांच्या त्यांच्याकरितां केलें आहे. त्यांनीं जुन्या पंथांना प्रेमाचा मुलामा दिला आहे व श्रद्धा, जीवन व स्वातंत्र्य यांचा घडा घालून दिला आहे. त्यांचें जीवन म्हणजे त्यांच्या शिकवणुकीचें उत्कृष्ट उदाहरण आहे. देशप्रेम, क्षुद्रांतल्या क्षुद्राविषयींचा बंधुभाव, अधिक अधिक उंच व एकसारखें पुढें जाण्याची धडपड हीं त्यांच्या जीवनाचीं उपांगें आहेत. ते एक प्रकारचे प्रेषित, स्फूर्तिदाते व कृतिशील असून, सर्वांचे स्नेही आहेत. देव त्यांचे भले करो.

मी डॉ. अलॅक्झांडर ग्रॅहॅम बेल यांना प्रथम भेटलें, त्याविषयीं पूर्वीच लिहिलें आहे. चार्ल्स वॉर्नरच्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या केप ब्रेटन बेटाच्या मध्यभागीं असलेल्या व बेडॅकजवळच्या त्यांच्या खेड्यांत किंवा वॉशिंग्टन-मधील घरांत मी नंतर पुष्कळ दिवस गमतींत घालवले आहेत. तेथें डॉ. बेल यांच्या प्रयोगशाळेंत, शेतांत अगर किनाऱ्यावर त्यांच्या प्रयोगाविषयीं माहिती ऐकत अगर भविष्यकाळीं ज्या नियमान्वयें विमानांचें नियंत्रण होणार आहे, त्या नियमांच्या शोधासाठीं ते पतंग उडवीत असत, त्यांत त्यांना मदत करत घटकान् घटका घालवल्या आहेत. डॉ. बेल हे अनेक शास्त्रांत पारंगत आहेत आणि प्रत्येक विषय, मोठमोठे शास्त्रीय सिद्धान्तसुद्धां मनोरंजक करण्याची हातोटी त्यांना साधली आहे. ते तुम्हांला असें भासवतात कीं, तुम्ही आणखी थोडा वेळ त्याकरितां खर्च केला तर तुम्हीसुद्धां संशोधक होऊं शकाल. त्यांच्या स्वभावाला एक गमतीदार व काव्यात्म-कतेची बाजूहि आहे. त्यांची प्रमुख प्रवृत्ति म्हणजे मुलांवरचें प्रेम. एखादें बहिरें मूल कडेवर असलें म्हणजे तें जेवढे आनंदी असतात तेवढे एरवीं क्वचितच. त्यांनीं बहिऱ्यांकरितां केलेले ते महान् प्रयत्न चिरंतन राहून, पुढच्या पिढींतील मुलांचें कल्याण करतील. त्यांनीं स्वत: केलेल्या कार्याबद्दल व त्यांनीं इतरांना कार्यप्रवृत्त केल्याबद्दल आम्हांला त्यांच्याविषयीं भारी प्रेम वाटतें.

मी न्यूयॉर्कमध्यें दोन वर्षें होतें, त्या काळांत मी ज्यांचीं नांवें पुष्कळदां ऐकलीं होतीं, पण ज्यांना भेटायचा योग मला एरवीं आला नसता अशा अनेक नामवंत लोकांना भेटण्याची संधि मला मिळाली. आमचे स्नेही श्री. हटन यांच्या घरांतच त्यांतील बहुतेकांच्या गांठी पडल्या. श्री. हटन व प्रेमळ स्वभावाच्या सौ. हटन यांच्या घरीं जाण्याचा, त्यांच्या वाचनालयांत जाऊन, अनेक गुणी मित्रांनीं त्यांच्याविषयीं लिहिलेले मूल्यवान् विचार व सुंदर भावना वाचण्याचा हा एक मोठा योगच होता. खरोखर, प्रत्येक व्यक्तींतील उत्तम विचार व भावना फुलवण्याची श्री. हटन यांची हातोटी मोठी विलक्षण आहे. त्यांना ओळखण्यासाठीं 'द बॉय आय न्यू' वाचायची गरजच नाहीं—अत्यंत उदार, सुस्वभावी, सर्व परिस्थितींत बरोबर राहणारा आदर्श स्नेही आणि स्नेह्यांच्या संगतींत प्रेमाचा मागोवा घेणारा मित्र असें त्यांना सार्थपणें म्हणतां येईल.

सौ. हटन खऱ्याखुऱ्या व पारखलेल्या स्नेही आहेत. माझ्या जीवनांतील अत्यंत मधुर व मौल्यवान् भाग त्यांनीं दिलेला आहे. माझ्या कॉलेजांतील शिक्षणांत त्यांनीं मला वारंवार सल्लामसलत दिलेली आहे. माझें काम जेव्हां मला त्रासदायक व निराशाजनक वाटतें त्या वेळीं मला धीराचीं पत्रें त्या लिहितात. त्यांच्यापासूनच आम्ही एक धडा शिकलों आहों कीं, एक त्रासदायक कर्तव्य पार पाडलें कीं, पुढलें अधिक सुकर व सोपें होतें.

श्री. हटन यांनीं त्यांच्या कित्येक साहित्यिक स्नेह्यांशीं माझा परिचय करून दिला. श्री. विल्यम डीन हॉवेल्स व मार्क ट्वेन हे त्यांपैकींच होत. त्यांनीं स्वतःइतकेंच स्वतःच्या शेजाऱ्यापाजाऱ्यावर किंबहुना साऱ्याच जीवनसृष्टीवर प्रेम केलें असें त्यांच्याविषयीं म्हणतां येतें. ज्यांच्या गोष्टी सांगण्याचा लौकिक मोठा आहे असे आमचे जवळचे स्नेही चार्ल्स वॉर्नर यांची व माझी ओळख तेथेंच झाली. एके दिवशीं श्री. वॉर्नर यांनीं निसर्गाचे कवि जॉन बरो यांना मला भेटायला आणलें. त्यांच्या कवितेंतील किंवा निबंधांतील तेजस्वीपणा इतकीच त्यांची वागायची पद्धत मला मोहक वाटली. त्यांच्या गप्पांत ते ह्या विषयावरून त्या विषयावर जात, वादविवाद करीत आणि त्यांचें संभाषण, कोट्या आणि उपमाउत्प्रेक्षांनीं लकाके. पण त्यांच्या बरोबरीनें तें सारें समजणें मला शक्य नव्हतें. प्रचंड अशा ध्येयाकडे चाललेल्या 'ऐनसच्या' झेपे-बरोबर, छोटा, 'अॅसानियस' चिमुकलीं पावलें टाकीत धावे, तशी माझी अवस्था त्यांच्याशीं बोलतांना झाली. त्यांनीं माझ्याविषयीं प्रशंसेचे उद्‌गारच काढले. श्री गिल्डर यांनीं, चांदण्या रात्रीं प्रचंड वाळवंटांतून पिरॅमिडकडे जातांना केलेल्या प्रवासाचें वर्णन केलें. त्यांनीं मला पाठविलेल्या एका पत्रांत आपल्या सहीखालीं, मला स्पर्श करून पाहतां यावी म्हणून सहीची खूण दाबून उठवली. यावरून मला डॉ. हेल यांची आठवण येते. मला लिहिलेल्या पत्रांना वैयक्तिक स्वरूप यावें म्हणून ते आपली सही 'ब्रेल' मध्यें उठवून काढीत. मार्क ट्वेनच्या तोंडून मी त्यांच्याविषयीं एक दोन गोष्टीहि ऐकल्या आहेत. प्रत्येक बाबतींत विचार करण्याची, बोलण्याची, वागण्याची त्यांची एक स्वतंत्र तऱ्हा आहे. त्यांच्या हस्तांदोलनांत मला त्यांच्या डोळ्यांतील चमक दिसते. ते जेव्हां आपल्या विचित्र आवाजांत प्रथमदर्शनीं फटकळ, हास्यास्पद वाटणारे विचार सांगतात, त्या वेळींहि त्यांच्या मनांत सहानुभूतीचा ओलावा आहे हें आपल्याला समजतें.

न्यूयॉर्कमध्यें ह्याशिवाय अनेक इतर लोकांना मी भेटलें. सेंट निको-लसच्या संपादिका— सौ. डॉज, 'पॅस्टी'च्यां लेखिका सौ.रिग्ज इ. इ. त्यांनीं मला अनेकदां त्यांच्या हृदयांतील संवेदनांशीं सुसंगत असणाऱ्या व त्यांचे प्रतीक असणाऱ्या भेटी दिलेल्या आहेत. त्यांचे विचार सांगणारीं पुस्तकें, मनाला प्रकाश देणारीं पत्रें, आणि ज्यांचें पुन्हा पुन्हा वर्णन ऐकावेसें वाटतें, अशीं छायाचित्रें त्या स्नेह्यांकडूनच आलेलीं आहेत. याशिवाय कितीतरी आणखी स्नेही आहेत; पण आतां साऱ्या स्नेह्यांच्याविषयीं सांगायला येथें अवसर नाहीं. बालपणाच्या पंखाखालीं त्यांतील कित्येकांच्या आठवणी लपलेल्या आहेत. त्यातील कित्येक आठवणी इतक्या नाजूक व पवित्र आहेत कीं निष्प्राण छपाईत त्या गुदमरूनच जावयाच्या खरोखर म्हणजे सौ. हटन यांच्याविषयीं सुद्धां थोडेंच व अत्यंत संकोचानें मी लिहिलें आहे.

मी आतां फक्त दोनच स्नेह्यांचा उल्लेख करणार आहें. एक म्हणजे सौ. विल्यम थॉ; त्यांच्या ' लॅंढर्स्ट ' या घरीं मी अनेकदां गेलेली आहें. नेहमीं कुणाकरितां तरी त्या धडपडत असतात. आमच्या परिचयाच्या या काळांत त्यांच्या उदार अंतःकरणाचा व पोक्त सल्लामसलतीचा मला सदैव उपयोग झाला आहे.

दुसऱ्या एका अनामिक स्नेह्यांविषयींहि मी कृतज्ञ आहें. त्यांच्या शक्तिशाली हाताखालील अनेक धंद्यांनां त्यांचें मार्गदर्शन मिळतें आहे त्यांच्या कर्तृत्वामुळें साऱ्यांच्या आदराला ते पात्र झाले आहेत. दयाळूपणानें गाजावाजा न करतां, इतरांना मदत करण्याचें त्यांचें कार्य अविरत चालू असतें. इथें मात्र, ज्या सन्माननीय नामावलीचा उल्लेख मीं करतां कामा नये तिला मी स्पर्श करूं पाहतें आहे. माझें कॉलेजांत जाणें ज्यांच्या उदारतेमुळें व प्रेमळ-पणामुळें शक्य झालें त्यांचा ऋणनिर्देश नांव सांगून करतां आला असता तर किती बरें झालें असतें.

माझ्या स्नेह्यांनींच, ही माझी कहाणी घडवलेली आहे. हजारों मार्गांनीं त्यांनीं माझ्या दुबळेपणालाच आकर्षक गुणांचें स्वरूप दिलें आहे. त्यामुळेंच माझ्या दुबळेपणाच्या छायेंत सुद्धां, जीवनपथावर, सुखानें व शांतपणें वाटचाल करणें मला शक्य झालें.

◆◆ ◆◆ ◆◆